भारत-गौरव-ग्रंथमाला–पुष्प सव्विसावें.

# सुखाचा शोध.



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।

—भगवान् श्रीकृष्ण.

१९१७.



प्रत [illegible]

कापडी प्रत एक रुपया.

PUBLISHER :

P. S. BHASE,

*Manager,*

**BHARAT GOURAV GRANTHA MALA,**

**Girgaon, Bombay.**



Printed by

Keshav Ravaji Gondhalekar

at his

*JAGADHITECHU PRESS,*

432 Shanwar Peth, Poona.

# प्रकाशकाचे दोन शब्द.



ागवान् श्रीकृष्ण यांच्या आशीर्वादानें भारत-गौरव-ग्रंथमालेचें हे सव्विसावें ष्प तयार झालें असून तें आह्मी आमच्या आश्रयदात्यांना प्रेमपूर्वक ादर करीत आहों. प्रिन्स बिस्मार्क हें बावीसावें पुष्प प्रसिद्ध झाल्यावर धली तीन पुष्पें न मिळतां हें सव्विसावें पुष्प एकदम कोठून आलें, ाचें कित्येकास आश्चर्य वाटून कित्येकांचा निष्कारण घोटाळा होण्याचाहि भव आहे. प्रिन्स बिस्मार्क या पुस्तकाचा पहिला भाग जेव्हां प्रसिद्ध ला, तेव्हां त्या सोबत एक सूचना पत्र जोडून आह्मी आमच्या आश्रय-ात्यांना एक कादंबरी आणि प्रिन्स बिस्मार्क यांच्या चरित्राचा दुसरा ाग अशा दोन पुस्तकांचा स्वीकार करण्यासंबधानें विनंति केली होती. ही ामची विनंति पुष्कळ आश्रयदात्यांनीं मान्य करून आह्मांस योग्य असें त्साहनहि दिलें; परंतु कांहीं थोड्या आश्रयदात्यांनीं या बाबतींत आपला गच गैरसमज करून घेतला आहे, असें आह्मांस दिसून आलें आणि ्णून या वेळीं आह्मास आमची योजना बदलणें भाग आलें. कांहीं ाड्या आश्रयदात्यांचा देखील ग्रंथमालेवर रोष होऊं नये, अशी आमची च्छा असल्यामुळें प्रिन्स बिस्मार्क यांच्या चरित्राचा दुसरा भाग तयार ाण्यास अगदीं थोडा अवकाश उरला असतांहि त्या अगोदर तयार ालेलें 'सुखाचा शोध' हें पुस्तक आश्रयदात्याकडे प्रथम पाठविलें आहे.

प्रिन्स बिस्मार्कचा दुसरा भाग आणि सुखाचा-शोध, हीं दोन पुस्तकें ्काच व्ही. पी. नें पाठविण्याचा उद्देश कोणता, हें आह्मी विनंतिपत्रांत ष्ट नमूद केलें होतें. युरोपांतल्या महायुद्धानें मुद्रण सामग्री प्रत्येक क्षणीं हाग होत असून ग्रंथप्रकाशनाचा धंदा अधिकाधिक बिकट होत चालला ाहे. युद्धापूर्वी जो कागद दोन अडीच आणे रत्तल होता, तोच आतां ाठ नऊ आणे रत्तल मिळतो: आणि याच न्यायानें बाकीच्या वस्तूहि हाग झाल्या आहेत. अशा स्थितींत आठ आण्यांस दोनशें सव्वा दोनशें ानांचें पुस्तक देणें अशक्य असल्यामुळें आश्रयदात्यांवर किंमतीचा बोजा ा वाढवितां एकदम दोन पुस्तकें पाठवून आह्मी आमचें नुकसान थोडें

फार भरून काढणार होतों. जर आह्मी दोन पुस्तकें सव्वा रुपयांच्या व्ही. पी. नें पाठविलीं असतीं, तर ग्रंथमालेचा खालीं लिहिल्याप्रमाणें फायदा झाला असताः—१ आश्रयदात्यांचें नांव लिहिलेला वेष्टणाचा कागद जितका एका पुस्तकाला लागतो, तितकाच दोन पुस्तकांना लागला असता. २ एक वेळच्या पत्ते वगैरे लिहिण्याच्या श्रमांतच दोन पुस्तकें गेलीं असतीं. ३ प्रत्येक आश्रयदात्यांच्या मागें टपालखर्चाच्या दृष्टीनें सुमारें एक आण्याचा फायदा झाला असता. ४ मागें रेंगाळत पडलेलीं पुस्तकें लवकर लवकर छापून निघालीं असतीं; आणि ५ दोन पुस्तकांची किंमत एकाच वेळीं आमच्या हातीं पडल्यानें आह्मांस पुढील पुस्तकांसाठीं पुष्कळसा कागदहि खरेदी करून ठेवतां आला असता. या इतक्या फायद्यांना मुकावें लागल्यामुळें ग्रथमालेचें किती नुकसान झालें आहे, याची कोणासहि अटकळ करतां येईल. कांहीं थोड्या आश्रयदात्यांनीं भलत्याच शंका घेतल्यामुळें आणि कित्येकांनीं कांहीं विलक्षण सूचना केल्यामुळें आज आह्मांस हें एकच पुस्तक आश्रयदात्यांच्या भेटीला पाठवावें लागत आहे. एकदम दोन पुस्तकें येतील अशी आशा बाळगणारांची यामुळें पुष्कळ निराशा झाली असेल; परंतु वर लिहिलेल्या कारणांचा विचार करून ते आह्मास क्षमा करतील असा भरंवसा आहे.

आह्मी एका नव्या पुस्तकाबरोबर एक जुनें पुस्तक पाठविणार आहों, असा कित्येकांनीं गैरसमज करून घेतला, तर कित्येकांनीं एका नव्या पुस्तकाबरोबर बाजारांतल्या दुसऱ्यांच्या कादंबऱ्या पाठविणार कीं काय? असाहि प्रश्न केला. वास्तविक कादंबरी व चरित्र हीं दोन्हीं पुस्तकें ग्रंथमालेंतूनच प्रसिद्ध होणार व तीं दोन्हीहि नवीं असणार, हें आह्मी त्या सूचनेंत स्पष्ट जाहीर केलें होतें. तसेंच कित्येकांनीं सूचनाहि मोठ्या गमतीच्या केल्या आहेत. मी चरित्रांचा भोक्ता आहें, तेव्हां माझ्याकडे फक्त चरित्रेंच पाठवीत जा किंवा मी कादंबरीचा भोक्ता आहे, तेव्हां माझ्याकडे फक्त कादंबऱ्याच पाठवीत जा; अशाहि कित्येकांनीं सूचना केल्या आहेत. परंतु या व्यवस्थेनें ग्रंथमालेचें किती नुकसान होणार आहे, याचा मात्र कोणीं विचार केला नाहीं. ग्रंथमालेंतून जें प्रत्येक पुस्तक प्रसिद्ध होईल,

कावयास गेले होते आणि सहा सात विद्यार्थी नाना विषयांवर बोलत बसले होते. एखाद्या विषयास रंग चढावयाचा, एकादा विषय मागें पडावयाचा आणि केव्हां केव्हां अगदीं क्षुल्लक विषयावर देखील रणें माजावयाचीं, असें या विद्यार्थ्यांच्या बैठकींत हरहमेश होत असे. एकानें शेक्सपीयरला चांगलें ह्मणावें, तर एकानें गटेला वर चढवावें. जणूं काय हे दोघेहि महा कवि या विद्यार्थ्यांच्या प्रशंसेची वाट पहातच बसले आहेत. एकानें केसरीची स्तुति करावी तर दुसऱ्यानें सुधारकाची करावी. घटकेंत ह्या विपय बाजूला पडून मराठींतील ग्रंथकारांवर ही विद्यार्थी मंडळी घसरावयाची. वाईट पुस्तकावर चांगले अभिप्राय वर्तमानपत्रांत कसे येतात ? गचाळ ग्रंथकारांना हे वर्तमानपत्राचे संपादक स्कॉट किंवा डॉ. जानसनच्या पंक्तीला नेऊन कसे बसवितात वगैरे अमुक एका विषयावर हे विद्यार्थी चर्चा करीत नसत, असें शपथ वाहून सांगण्यास कोणींहि तयार होणार नाहीं. त्या दिवशीं नाटकें आणि नट हा विषय मोठा रंगांत आला होता. 'नटांचा दर्जा' असें एक विद्यार्थी ह्मणाल्याबरोबर दुसरा विद्यार्थी 'चार दोन आणे दिले असतां तोंडाला रंग लावून नाचण्याइतका' असें ओरडला. त्याबरोबर अर्थातच साऱ्या विद्यार्थ्यांत हंशा पिकला. इतक्यांत एक विद्यार्थी गंभीर चेहरा करून ह्मणाला, 'आपण एक सुवर्णपदक देण्याचें योजिलें आहे' तेव्हां 'कोणाला ? कशाला ?' ह्मणून सगळ्या विद्यार्थ्यांनीं प्रश्नांचा भडिमार केला. उपरि निर्दिष्ट विद्यार्थी पुन्हां गंभीर चेहरा करून ह्मणाला, 'कोणत्याहि नाटकमंडळींतला प्रसिद्ध नट दारूबाज आणि विश्वयोषितांच्या घरीं भटकणारा नसल्यास, त्याला हें सुवर्णपदक मिळेल.' पुन्हा सगळे विद्यार्थी खो खो हंसले. दुसरा एक विद्यार्थी ह्मणाला, 'वा ! ही वर्तमानपत्री कीर्ति संपादन करण्याची खूप नामी युक्ति शोधून काढली, आणि शिवाय नुकसान मुळींच नाहीं. कारण सुवर्णपदकाला हात लावावयाला कोणताहि नट पुढें येणार नाहीं.

ज्याबद्दल आमचा नटवर्ग अभिमान बाळगीत आहे, आणि नाट्यक उन्नतीसाठीं या दोन गोष्टींची ज्यांना खरोखर आवश्यकता वाटते गानकुशल व अभिनयकुशल नटवर्ग तुझ्या या सुवर्णपदकाचा धि

करील.’ तिसरा एक विद्यार्थी मध्येंच तोंड खुपसून ह्मणाला, ‘तर मग जो कित्येक नटांवर सुवर्णपदकांचा वर्षाव होतो, तो या दोन दुर्गुणांमुळें होतो, हें उघड दिसतें, आणि ह्मणूनच मोठे मोठे लोक हीं पदकें देण्यासाठीं धांवतात!’ या विद्यार्थ्याला पुढें बोलूं न देतां एक विद्यार्थी चटकन् एका टेबलावर चढून एकाद्या बड्या वक्त्याप्रमाणें हावभाव करीत ह्मणाला, ‘सभ्य गृहस्थहो, आपल्या राष्ट्राच्या कल्याणासाठीं, देशाच्या हितासाठीं आणि समाजाच्या उन्नतीसाठीं आपल्या महाराष्ट्रीय नाटक्यांनी या दोन दुर्गुणांचा संग्रह केला, याबद्दल आपण त्यांचे अभिनंदनच केलें पाहिजे.’ हें व्याख्यान आणखीहि रंगास आलें असतें; पण तितक्यांत पोस्टाचा शिपाई पत्रें घेऊन आल्यामुळें हा विषय तितकाच राहिला आणि त्यामुळें नटवर्गाची बरीच अब्रु वांचली.

पोष्टाच्या शिपायाची आणि विद्यार्थ्यांची बरीच गट्टी जमली होती तो पत्रें घेऊन आला म्हणजे सर्व विद्यार्थ्यांची त्याच्यावर टोळधाड पडे आजहि तो आंत शिरतांच सर्व विद्यार्थ्यांनी त्याच्यावर हल्ला चढविला पोष्टाच्या शिपायानेंहि ही आपत्ति टाळण्याची युक्ति योजून ठेवलेली होती तो सगळ्यांची पत्रें दाराच्या आंत फेकून चटकन चालता होई. या क्रमा प्रमाणें आजहि त्यानें आंत पत्रें टाकतांच एका विद्यार्थ्यानें बुभुक्षित याचका प्रमाणें तीं घाईनें उचलून घेतलीं आणि पोष्टाच्या शिपायाचें बाकीचें काम तोच करूं लागला. ‘रामचंद्र नारायण देशपांडे’ पांडुरंग सदाशिव भावे’ वगैरे नांवें तो मोठ्यानें वांचूं लागला व एकेक विद्यार्थी पुढें येऊन आपलें आपलें पत्र घेऊं लागला. ज्यांना घरून पत्र आलें नाहीं, ते अर्थातच थोडे हिरमुसले झाले. जे विद्यार्थी बाहेर भटकावयाला गेले होते, त्यांचीं पत्रें त्या विद्यार्थ्यानें टेबलावर ठेवलीं. इतक्यांत एका विद्यार्थ्यानें टेबलावरचें एक पत्र पाहून मोठ्यानें हंसण्यास सुरुवात केली. अर्थात े विद्यार्थी त्याच्याभोंवतीं गोळा झाले आणि “कायरे रामभाऊ, हंसतोस का?” ह्मणून त्याला विचारूं लागले. तो पुन्हा हंसून , “दिनकर विश्वंभर देशमुख यांच्या पत्रांतला मजकूर वाचून मला ालें. त्याचे वडील लिहितात, ‘येत्या उन्हाळ्याच्या सुटींत तुझें

हळू हळू सगळे विद्यार्थी पानांवरून उठून आपापल्या खोलींत जाऊन अभ्यासाच्या वगैरे उद्योगास लागले. दिनकरचें मन मात्र थोडेसें अस्वस्थ झाल्यामुळें तो अभ्यास न करतां एका खुर्चीवर सचिंत बसला होता. रामभाऊ, विश्वनाथ व पांडुरंग हे तीन विद्यार्थी त्याचे विशेष स्नेही असून ते त्याच्या गांवाकडचेच राहणारे होते. दिनकराच्या वडिलांनीं पाठविलेलें पत्र आतां दिनकराच्या हातीं असून त्यासंबधानेंच तो विचार करीत होता. तो बी. ए. चा अभ्यास करण्यासाठीं जेव्हां मुंबईला आला, तेव्हांपासून त्याच्या विचारांत बराच पालट होऊन समाजसुधारणेकडे तो बरेंच लक्ष पुरवीत असे. हळू हळू केवळ सुधारकांच्या भाषणां वगैरेवरून विवाहाच्या बाबतींत त्याचीं कांहीं मतें दृढ झालीं होतीं. आपला विवाह एका प्रौढ व सुंदर मुलीबरोबर व्हावा, तिला चांगलें लिहितां वाचतां येत असावें, बाजाची पेटी वाजवितां यावी, थोडेंसें गातांहि यावें, आपल्या समवेत तिनें बाहेर हिंडावयास यावें. वगैरे गोष्टींनीं अलंकृत अशी आपली भावी पत्नी असावी, असें दिनकरला वाटत असे.

दिनकरला असें वाटत होतें, याबद्दल त्याला विशेष नांवें ठेवण्यांत कांहीं अर्थ नाहीं. समाजसंस्कृतीविषयीं खोल व दूरवर दृष्टि न पोहोचवितां जे विचार करतात, त्या सर्व तरुणांना व हौशी गृहस्थांना असेंच वाटत असतें. असें वाटण्याचें कारण त्यांच्या अंतःकरणांत एक विलक्षण इच्छा उत्पन्न झालेली असते, हे होय. ही त्यांची इच्छा म्हणजे ‘सुखाचा शोध’ ही होय. ऐहिक सौख्यासाठीं स्त्रीची जोड सर्वथा योग्य अशी मिळावी, असें प्रत्येकास वाटत असतें; परंतु त्यासाठीं समाज-सुधारक तरूण नशिबावर हवाला ठेवण्यास कबूल नसून प्रयत्नानें हें सुख मिळविलें पाहिजे, असा त्यांचा अट्टाहास आहे. आपल्या पसंतीप्रमाणें स्त्री मिळवूनहि जर यांच्या संसाराचे नऊतेरा नि पावणेबारा झाले, तर मात्र हे नशिबावर हात ठेवण्यास कबूल होतात. आपणास प्रति स्वर्गसुख मिळावें, ही इच्छा प्रत्येकाची असणे स्वाभाविक आहे; पण त्या बरोबर स्वतःच्या योग्यतेचाहि विचार जमेस धरावयाला पाहिजे. प्रत्येक तरुणानें रंभेसारख्या सुंदर स्त्रीचें पाणीग्रहण करण्याची प्रतिज्ञा करणें आणि प्रत्येक तरुणीनेंहि

केवळ मदनाच्या पुतळ्यांसाठींच वरमाळ तयार करणें या दोन्ही गोष्टीहि अव्यवहार्य होत. याच दृष्टीनें विद्या व संगितादि ललित कलांविषयींहि परस्परांचे विचार केवळ काव्यमय किंवा स्वप्नसृष्टींतलें असूनहि भागावयाचें नाहीं. स्वप्नसृष्टि आणि व्यवहार यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे आणि ह्मणूनच केवळ सुखाच्या काव्यमय कल्पनेंत दंग होणें ह्मणजे व्यवहार सोडणें होय. व्यवहार ह्मणजेच समाजाची संस्कृति. विवाह हे समाजाच्या संस्कृतीसाठीं न होतां ते जर केवळ काव्यमय सुखाच्या कल्पनेनें होऊं लागले, तर विवाहांतला सत्वांश निघून जाऊन बाकस मात्र हातीं लागेल आणि अशा अत्यंत निकृष्ट ऐहिक सुखाच्या बाकुसापासून कोणताहि समाज उन्नतीस पोहोंचणार नाहीं. निरनिराळ्या राष्ट्रांचे इतिहास हेच शिकवीत आहेत, पण स्वभावतःच मोहासक्त मनुष्य इतक्या ठेचा खात असूनहि पुन्हां त्याच मार्गानें सुखाचा शोध करतांना आढळून येतो.

दिनकर चिकित्सक बुद्धीचा नव्हता असें कांहीं नाहीं; तथापि त्याची सुखाची कल्पना बरीच दृढ झाली होती. आपल्या भावी पत्नीचें चित्र त्यानें आपल्या मनोभूमीवर रंगवून ठेवलें होतें. पतीबरोबर विनयानें वागून स्वभावतःच लाजणारी मुरडणारी पत्नी त्याला नको होती, तर पुरुषां इतक्याच धीटपणें समाजांत वावरणारी पत्नी त्याला पाहिजे होती. अंगावर गोठपाटल्या घालून देवालयाच्या भोंवतालीं प्रदिक्षणा घालणारी लक्ष्मी त्याला नको होती, तर पायांत बूट घालून पतीबरोबर सहल करणारी मेनका त्याला पाहिजे होती. ताकाच्या भांड्यांत रवी घुसळून ते कर्णकटू सूर काढणारी गृहकृत्यांत दक्ष अशी स्त्री त्याला नको होती, तर दिवाणखान्यात खुर्चीवर बसून 'हर्मोनियम' चे गोड स्वर काढणारी ललिता त्याला पाहिजे होती. 'इकडे प्रकृतीला जपत जावें,' हें पत्रांत विनयानें लिहि..री लज्जावती त्याला नको होती, तर 'प्रियकराची तब्यत बरी आहे ना?' असें विचारणारी विदुषी त्याला पाहिजे होती. पतीचें दर्शन होतांच गालांतल्या गालांत हंसून सरकन माजघरांत जाणारी भित्री पोर त्याला नको होती, तर पतीचें घरांत पाऊल पडतांच त्याच्याशीं हस्तांदोलन करण्यासाठीं धांवणारी धैर्यशालिनी त्याला पाहिजे होती. दिनकर अशा विचारांत दंग

झाला ह्मणजे तो स्वतःशींच ह्मणे, 'माझी ही एवढी इच्छा पूर्ण झाली, तर स्वर्गसुखहि मी तुच्छ मानीन!' पण—

एका लहानशा कागदाच्या चिठोऱ्यावर त्याच्या बापानें अवघ्या चार दोन ओळीच लिहिल्या होत्या; पण तेवढ्यानें त्याच्या अंतःकरणांत सागराप्रमाणे खळबळ उडाली होती. 'माझें लग्न करण्याचा माझ्या बापाला काय अधिकार? मी वाटल्यास लग्न करीन अथवा असाच राहीन. बापानें पसत केलेल्या मुलीबरोबर मी जन्म कंठावयाचा ह्मणजे ती एक शिक्षाच होय. गोपाळराव भागवत ह्मणजे कुलीन व घरंदाज घरण्यापैकीं एक बडे गृहस्थ, हे मला माहीत आहे; पण मुलगी कुलीन असली ह्मणजे बाकीचे सगळे गुण तिच्या आंगी असतातच, असें कांहीं नाहीं. 'मुलगी सुस्वरूप आहे' असें आमचे वडील ह्मणतात; पण नाकडोळे साधारण बरे असले, ह्मणजे त्या मुलीला सुस्वरूप ह्मणण्याचा प्रघातच आहे! खरें सौंदर्य ह्मणजे काय, हे तरी या मंडळींना कोठें समजतें आहे? पुष्कळ स्त्रिया सुंदर असूनहि योग्य अभिनयाच्या (एटिकेट) अभावामुळें त्या सुंदर आहेत, असें समजून देखील येत नाहीं. छेः! बाबांनीं मला खरोखर मोठ्या सकटांत टाकलें. कॉलेजांत शिकणाऱ्या एकाद्या मुलीशीं विवाह करून खरें वैवाहिक सुख मिळविण्याचा माझा निश्चय त्यांना कसेंहि करून कळविलाच पाहिजे.' अशा प्रकारचे अनेक विचार दिनकरच्या चित्तांत त्या पत्रानें घोळूं लागले.

दिनकरच्या एकंदर स्वभाव वैचित्र्यांतील ही वैवाहिक सुखाची काव्यमय कल्पना सोडून दिली, तर बाकीच्या दृष्टीनें, तो मोठा बाणेदार व उदार प्रकृतीचा होता, असेंच कोणाला ह्मणावें लागेल. त्याची बुद्धि तीक्ष्ण अ[illegible] वाचनहि दांडगें होतें. मातृभूमीबद्दल त्याला विलक्षण अभिमान होता व तिच्या कल्याणासाठीं तो वाटेल ते कष्ट सोसण्यास तयार होता. स्वदेश व स्वदेशबांधव यांविषयीं तो बोलूं लागला म्हणजे त्याचें हृदय गहिंवरून येत असे. त्याचें त्याच्या कुटुंबांतील मंडळींवर विलक्षण प्रेम होतें [illegible] आईबापांविषयीं त्याच्या मनांत पूज्यभावहि दांडगा होता. दिनकरचा [illegible] असा विसंगत स्वभाव असल्यामुळें वडिलांच्या पत्राचा त्याच्यावर

मोठा विलक्षण परिणाम झाला होता. वडिलांना हो ह्मणून कळवावें, तर एका शेंबड्या लेंबड्या गृहिणीबरोबर जन्म कंठावा लागणार आणि त्यांना नाहीं ह्मणून कळवावें, तर त्यांची विलक्षण अवज्ञा केल्यासारखें होणार! अशा अडचणींत या वेळीं दिनकर सांपडला होता. शिवाय वडिलांचा स्वभाव त्याला माहीत नव्हता असें कांहीं नाही. त्याच्या बापाचा स्वभाव त्याच्या हिपेक्षां बाणेदार वृत्तीचा असल्यामुळे आपलें नकारार्थी उत्तर वडिलांच्या मानी स्वभावाला अर्थातच पसत पडणार नाहीं आणि त्याचा परिणाम कांहीं भलताच झाल्यावांचून राहणार नाहीं, हीहि भीति दिनकरला वाटत होती. वडिलांची समजूत घालण्यासाठीं ह्मणून त्यानें विद्वत्ताप्रचूर शब्दांनीं एकदोन तरजुमे तयार केले; पण ते पाठविण्याचें त्यास धैर्य झालें नाहीं. शेवटीं गांवीं गेल्यावर आईच्या मध्यस्थीनें हे लग्न मोडावयाचें असें त्यानें ठरविलें आणि झोंप घेण्यासाठीं तो अथरुणावर पडला. पण तें मनोव्यथेचें भूत त्याच्या छातिवर रात्रभर नाचत राहिल्यामुळे त्याला चांगलीशीं झोंप लागली नाहीं. ती रात्र त्यानें स्वप्नसृष्टींतच घालविली.

अशा विलक्षण चिंतातुरावस्थेंत दिनकरचा एकेक दिवस जाऊं लागला. त्याला ही एक मोटी आपत्तीच वाटली; पण ती कशी टाळावी हें मात्र त्याला समजेना. विशेष परिचित अशा स्नेह्यांजवळ तो जेव्हां बोलूं लागे, तेव्हां त्या मुलीबरोबर लग्न न करण्याचा त्यानें जणूं कृतनिश्चय केला आहे, असें दृष्टोत्पतीस येई. अशा स्थितींत दिनकरचे कांहीं दिवस गेले आणि उन्हाळ्याच्या सुटीमुळें कॉलेज बंद झाल्यावर तो आपल्या घरीं निघून गेला. वडील बंधु व मातोश्री या दोघांच्या मध्यस्थीनें हें लग्न आपण मोडूं असा त्याला मोठा विश्वास होता. आपला युक्तिवाद आपल्या आईबापास पसंत पडेल, अशी त्याला फार आशा होती; पण तो घरीं जाऊन आठदहा दिवस झाले नाहींत, तोंच त्यानें स्वतःच आपल्या मित्र मंडळीस लग्नाची पत्रिका पाठविली. रामभाऊ, विश्वनाथ व पांडुरंग या तिघांच्या हातीं जेव्हां आमंत्रणपत्रिका पडल्या, तेव्हां त्यांना पराकाष्ठेचें आश्चर्य वाटलें व ते तिघेहि मोठ्या आनंदानें दिनकरच्या गांवीं त्याच्या लग्नासाठीं हजर झाले.

# प्रकरण दुसरें.



वऱ्हाडांतल्या प्रसिद्ध उमरावती शहरापासून जवळच असलेल्या रामपूर गांवीं दिनकराचे वडील रहात होते. त्यांचे नांव विश्वंभर देशमुख असें असून त्यांचे सगळे घराणे सदाचारसपन्न असल्याबद्दल फार प्रसिद्धी होती. त्यांचे बरेंच शेतीचें उत्पन्न असून थोडे देशमुखीचें इनामहि होतें. याशिवाय त्यांच्या स्वतःच्या विठ्ठल मंदिरासहि थोडें कायमचें उत्पन्न होतें. हें मंदिर त्यांच्याच घराण्यांतील कोणी पूर्वजाने बांधलेले असून त्याची व्यवस्था चांगली रहावी ह्मणून कित्येक धनिक गृहस्थांनीं मंदिरास कांहीं शेतजमिनी इनाम दिलेल्या आहेत. रामपूर हे गांव जरी लहानसेच आहे, तरी तेथील हवापाणी उत्कृष्ट असल्यामुळें थोडी बाहेरच्या श्रीमान लोकाची वस्ती नवीनच झाल्याने ते गांव आतां कांही अगदीं खेड्यांत मोडत नाहीं. या गांवच्या जमिनी जात्याच सुपीक असल्यामुळे लोक साधारण सुखी आहेत, असें म्हणावयास कांहीं हरकत नाहीं. गांवाच्या मानाने गांवांत देशमुखांचेच घर मोटें असून शेकडो वर्षांपासून या देशमुखांच्या घराण्यानें जो लौकिक मिळविला आहे, तो अद्यापीहि कायम असल्याचे दिसून येते. निदान या कादबरीच्या कथानकाच्या काळापर्यंत तरी खऱ्या गृहस्थधर्माचा नमूना ह्मणून जो तो रामपुराच्या देशमुखांच्या घराकडे बोट दाखवीत असे. कुटुब फार मोठें असून त्या मानाने आदा होता असें नाहीं. पण असें असूनहि या कुटुंबांत केव्हां तटाबखेडा झाल्याचें कोणासहि समजलें नाहीं. एके वेळीं या घराण्यांत चार चार पांच पांच कर्ते पुरुष असूनहि त्यांच्यांत कुरबुर न होतां सर्वांनी एकमेकांच्या विचारानें काळ काढल्याचें लोक सांगतात. काळाच्या ओघांत हें पन्नास साठ माणसांचें कुटुंब रोडून आतां अवघीं दहा पांच माणसे या कुटुंबांत होतीं. देशमुखांच्या दाराशीं आलेला अतिथी विन्मुख जावयाचा नाहीं, अशी प्रसिद्धी होती व तो क्रम विश्वंभर देशमुखांनींहि कायम ठेविला होता. गांवांत त्यांना सगळे विसूकाका ह्मणत. विसूकाका फार सालस, शांतवृत्तीचें व दयार्द्र अंतःकर-

णाचे होते. विठ्ठलमंदिराची व्यवस्था ते फार चांगल्या प्रकारें ठेवीत व वाडवडिलांनीं घालून दिलेल्या नियमाप्रमाणें आल्या गेल्या आतिथअभ्यागताचा यथाशक्ति सत्कारहि करीत. पुष्कळ गांवच्या लोकांचा उमरावतीस जाण्याचा रस्ता रामपुरावरूनच असल्यामुळें त्यांच्या घरीं पाहुण्यांची नेहमीं गर्दी असे. घरांतील बायकामंडळींना यामुळें फार श्रम होत; पण त्याबद्दल त्यांनीं कधीं कुरकुर न करतां त्या नेहमीं आनदानें आल्यागेल्यांचा सत्कार करीत असत. या कारणामुळें विसूकाकांविषयीं सर्वांच्या मनांत आदर वसत असे. याशिवाय ते लेखणीचे पक्के कारकून असून विद्वानहि होते. त्यांनी संस्कृताचा चांगला अभ्यास केलेला असून थोडेंसे इंग्रजीहि त्यांना येत होतें. तसेंच ते फार भाविक होते. श्रीविठ्ठल मंदिराचे जे कांहीं वार्षिक उत्सव होते, ते उत्सव ते अत्यंत श्रद्धेनें करीत. ते वारकरी सांप्रदायापैकी असल्यामुळें त्यांचें प्रेमळ भजन श्रीविठ्ठलापुढें नेहमींच होई; पण ते उत्कृष्ट कीर्तनहि करीत आणि पुराणहि फार चांगलें सांगत. अशा अनेक कारणांमुळें विसूकाकांविषयीं सर्वांच्या मनांत प्रेम वसत होतें. त्यांच्या स्वतःच्या कुटुंबांत कधीं तंटा बखेडा होत नसेच; पण तो गांवांतहि होतां कामा नये असा त्यांचा वचक होता. उमरावतीच्या कचेरींत रामपूरचा दिवाणी किंवा फौजदारी कोणताहि तंटा नसावयाचा, असा विसूकाकांचा लौकिक होता. गरिबांविषयीं त्यांच्या अंतःकरणांत फार दया होती. कोणाचें दुखलें खुपलें म्हणजे विसूकाका त्याच्या घरीं हजर व्हावयाचे. केवळ औषधपाणीच नव्हे, तर रोग्याची सेवा करण्याची देखील त्यांची तयारी असावयाची. प्रसंगीं महार आणि मुसलमान यांच्यासारख्या रोग्याजवळ जेव्हां या कर्मठ ब्राह्मणाची स्वारी दृष्टीस पडे, तेव्हां पुष्कळांना आश्चर्य वाटे आणि कित्येकांचे डोळे अश्रूंनीं भरून येत. विसूकाकांचा हात अंगावर फिरला म्हणजे रोग्यासहि फार समाधान वाटत असे. अगदीं गरीबाच्या घरच्या लग्नकार्यासहि विसूकाका हजर असवयाचे. एकंदरींत विसूकाका म्हणजे रामपूरच्या लोकांना देवाप्रमाणें पूज्य वाटत होते.

हेच विसूकाका आमच्या दिनकरचे वडील होत. विसूकाकांचें वय

सुमारें पंचावन्न वर्षांचें असून त्यांचे वडील बंधु सात आठ वर्षांपूर्वींच वारले होते. वडील बंधूस एक मुलगा व एक मुलगी अशीं दोनच अपत्यें असून मुलगा उमरावतीस नौकर होता. या मुलाचें नांव भास्कर. त्याचें वय तीस पस्तीस वर्षांचें असून त्याला उमरावतीस कोर्टांत पन्नास रुपये पगार मिळत होता. मुलीचें नांव यमुना. ती नेहमीं सासरींच असे. केव्हां केव्हां माहेरीं येत असे. वडील बधूची स्त्री अद्याप जिवंत होती. तिचें नांव अन्नपूर्णा. घरांत सगळ्यांत वडील अशी तीच असून तिच्या आज्ञेंत घरांतील सर्व लहानमोठीं माणसें वागत असत. ती खरोखरच नांवाप्रमाणें अन्नपूर्णा होती. दाराशीं कोणींहि येवो, त्याला ती संतुष्ट करून मार्गस्थ करीत असे. दररोज पांडुरंगाची पूजा करून ती जेव्हां देवाजवळ आशीर्वाद मागें, तेव्हां म्हणे, 'देवा,मला दुसरें कांहीं देऊ नकोस. दाराशीं येणारा अतीथ अभ्यागत विन्मुख जाऊं देऊं नकोस म्हणजे झालें;' या माऊलीची ही इच्छा देवानेंहि पूर्ण केली. विसूकाकांच्या स्त्रीचें नांव यशोदा असें होतें. ही यशोदा स्वभावानें अन्नपूर्णेचीच बहीण होती. विसूकाकांना तीन अपत्यें होतीं. दोन मुलगे आणि एक मुलगी. वडील मुलाचे नांव दिनकर असें असून तो मुंबईस कॉलेजांत शिकत होता. धाकट्याचें नांव दिवाकर. तो उमरावतीस भास्करजवळ राहून हायस्कुलांत शिकत होता. सगळ्यांत धाकटी मुलगी बारा वर्षांची असून तिचें नांव सत्यभामा असें होतें. तिचें लग्न झालें असून तीहि केव्हां केव्हां माहेरीं येत असे. भास्करचें लग्न झालें असून त्याला एक दोन लहान मुलंबाळेंहि होतीं. भास्करच्या बायकोचें नांव उमा असें होतें. असें एकंदर सात आठ माणसांचें हें कुटुंब असून तें मोठ्या गुण्यागोविंदानें रहात होतें.

[illegible] गांवांत एक मराठी शाळा असून फौजदारकचेरी होती. याशिवाय पोस्ट ऑफीसहि होतें. गांवांत पंचवीस तीस घरें ब्राह्मणांचीं असून बाकी तीन चारशें घरें अन्य जातीचीं होतीं. या गांवाजवळून चार दोन मोठाले रहदारीचे रस्ते गेलेले असल्यामुळें व्यापारहि बरा चालत असे. कापूस वटविण्याचा व दाबण्याचा एका गुजराथ्याचा एक कार-

खानाहि या गांवीं होता. देशमुखाच्या घराला घर म्हणण्यापेक्षां वाडा म्हणणे अधिक सयुक्तिक होईल. अगदीं पुढच्या बाजूला मोठें थोरलें अंगण असून त्यांत नाना प्रकारचीं फुलझाडें व तुळशी, बेलाचींहि कांहीं झाडें होतीं. या अंगणांतच मध्यभागीं विठ्ठलमंदिर असून मागच्या बाजूला विसूकाकांचा वाडा होता. हें अंगण, मंदिर व वाडा नेहमी स्वच्छ व व्यवस्थित असे. स्वभावतःच विसूकाकांच्या घरांत ओंगळपणा असा कोणासहि खपत नसे. त्यांच्या वाड्यांत परक्याचें पाऊल पडलें, म्हणजे तेथें लक्ष्मीचा व सरस्वतीचा वास आहे, हें सहज कळून येऊन त्यास साहजिक आनंद होई.

विसूकाकांनीं दिनकरच्या लग्नाच्या बाबतीत त्याला नुसतें सुचवून इकडे त्यांनीं लग्नाची तयारी हळू हळू चालविली होती. यमुना व सत्यभामा तेवढ्याचसाठीं माहेरीं आल्या होत्या. यमुनेनें आपलीं तिन्ही मुलेंहि बरोबर आणलीं होतीं. भास्करची स्त्री उमा हीहि आपलीं मुलें घेऊन उमरावतीहून आली होती. अर्थात् या वेळीं पोराबाळांनीं घर भरलेलें असल्यामुळे विसूकाकांच्या घराला अधिकच सौंदर्य प्राप्त झालें होतें. गोपाळराव भागवत यांची मुलगी त्यांनीं दिवाकरसाठीं पसंत केली होती. रामपुरापासून पंधरा सोळा कोसांवर असलेल्या मांडवगड गावाचे गोपाळराव भागवत हे रहिवाशी होत. त्यांचें घराणें फार जुनें, कुलीन व खानदानीचें असल्याबद्दल प्रसिद्धि होती. तसेंच ते घरचे खाऊन पिऊनहि सुखी होते. विशेषतः मुलगी सुस्वरूप व बाळबोध वळणाची असल्यामुळें ती विसूकाकांना फारच पसंत पडली व गोपाळरावांनाहि दिनकरची एकंदर वृत्ति आवडल्यामुळें हें लग्न अगदीं निश्चित झालें होतें. तिथीनिश्चय देखील झाला होता.

दिनकर मुंबईहून निघाला तो उमरावतीस आला. तेथें दिवाकराला बरोबर घेऊन रामपुरास आला. घराचें एकंदर पालटलेलें स्वरूप पाहून त्याची स्थिति अधिकच चमत्करिक झाली. आपले विचार वडिलांस कसे कळवावेत याचा तो सारखा विचार करीत होता; पण या बाबतींत त्याला कांहींच करतां आलें नाहीं. अखेरीस ही गोष्ट त्याच्या वडिलांकडूनच

वटाघाटीस निघाली. पोस्टाच्या शिपायानें एके दिवशीं कांहीं पत्रें विसूकाकांच्या हातीं दिल्यावर ते तीं पत्रें पहात असतां त्यांनीं दिवाकराला आंत पाठवून अन्नपूर्णाबाईंना बाहेर बोलावून आणलें. ते म्हणाले, " अन्नपूर्णा, गोपाळराव भागवत आपल्या सर्व मंडळींना बरोबर घेऊन उमरावतीस लग्नाला गेले होते. ते लग्न आटोपून उद्यां आपल्या येथें सगळ्या मंडळीसह येणार आहेत आणि येथें एक दिवस मुक्काम करून मग मांडवगडाला जाणार आहेत. घरांत कांहीं कमजास्त आहे नाहीं ते पहा. त्यांच्या पंक्तीला गांवांतील चार गृहस्थांना जेवावयालाहि बोलावतों. मुलगी त्यांच्याबरोबरच आहे. ती युक्तीनें दिनकरच्या दृष्टीस पडेल अशी मुलींकडून कांहीं तजवीज कर. हो, नाहीं तर मुलगी मला पसंत नव्हती, असें तसें कांहीं म्हणावयाला नको. ज्याची वस्तु त्यानें पाहिलेली बरी."

असें ह्मणून विसूकाका हसूं लागले. अन्नपूर्णाबाईंनाहि हंसू आलें. त्या ह्मणाल्या, " मुलगी नक्षत्रासारखी आहे, ती त्याला नापसंत पडावयाला काय झालें ? आणि नावडणाऱ्या मुली देखील पुढे आपोआप आवडतात. आपल्या घराण्यांत कोणाचींच लग्नें इतक्या कसोशीनें झालीं नाहींत, असें असून कोणाचाच संसार बिघडला नाहीं. मग दिनकरच्याबद्दल एवढी चवकशी कां ? "

विसूकाका ह्मणाले, " वैनी, आमच्या वेळचा कालमान आतां राहिला नाहीं. आतांच्या तरुण मंडळींना काय वाटते आणि काय नाहीं, तें कोणीं सांगावें ? "

अन्नपूर्णाबाई यावर अधिक कांहीं न बोलतां घरांत गेल्या आणि विसूकाकाहि दुसऱ्या उद्योगास लागले. दुसऱ्या दिवशीं पत्राप्रमाणें गोपाळराव भागवत मंडळीसह विसूकाकांच्या घरीं येऊन दाखल झाले. या मंडळींत लग्नाची मुलगीहि होती. गोपाळरावांचा येण्याचा हेतु वास्तविक अगदीं निराळा होता. त्यांच्या सौभाग्यवतीच्या मनांतून जांवईबुवांना पहावयाचें होतें व त्याप्रमाणें तिला जांवई पसंतहि पडला. या संधीचा फायदा दिनकरनेंहि घेऊन आपल्या भावी पत्नीचें दर्शन त्यानें घेतलें. मुलीचा गौर

वर्ण, सुबक बांधा आणि रेखलेले अवयव हीं पाहून दिनकर कांहींसा मुग्ध झाला होता, असें ह्मणावयास कांहीं हरकत नाहीं. घरांतल्या बायकांनीं तर या संधीचा चांगलाच फायदा घेतला. कोणीं तिच्याकडून गाणीं ह्मणून घेतलीं, कोणीं तिला चटण्याकोशींबिरी करण्यास सांगितल्या आणि अन्नपूर्णाबाईनीं तर तिला युक्तीनें पंक्तींत वाढावयाला देखील पाठविलें. या परीक्षणामुळें मुलगी अर्थातच सर्वांना पसंत पडली होती; पण दिनकरची अवस्था मात्र वेड्यासारखी झाली होती. मुलगी सुंदर असून गृहकृत्यांत दक्ष आहे, हें त्यानें स्वतःच पाहिलें होतें; पण एवढ्यानें त्याचें समाधान होण्यासारखें नव्हते. आपल्या भावी पत्नीचें मन किती सखोल आहे, तिचे विचार किती उदात्त आहेत, तिची बुद्धिमत्ता किती दांडगी आहे, ज्ञान संपादनाची तिला कितपत हौस आहे आणि ललितकलांची तिला कितीशी गोडी आहे, हें त्याला कळावयाला पाहिजे होतें; पण तें न कळल्यामुळें त्याचा निश्चय असा कांहींच झाला नव्हता. केवळ मुग्धावस्थेमुळें एकेक दिवस गमावणें म्हणजे जाणूनबुजून आपत्ति ओढून घेणें होय, असें वाटून वरील गोष्टीस तीन चार दिवस झाल्यावर अन्नपूर्णाकाकूची त्यानें गांठ घेतली आणि इकडच्या तिकडच्या गोष्टी काढून त्यानें आपले ‘ उदात्त ’ विचार तिला कळविले. दिनकरचें हे अज्ञान पाहून काकूला त्याची दया आली; पण तिने त्याच्याजवळ कांहीं न सांगतां चिरंजिवाचा मनोदय विसूकाकांना कळविला. विसूकाकांना दिनकरच्या या विचारांचा राग न येतां उलट हसूंच आलें. ते दिनकरला बोलावून म्हणाले, “ दिनकर, घरांतल्या आम्हां सर्वांच्या मतें तुला योग्य अशी मुलगी आम्हीं पसंत केली आहे. आतां तुझ्या दृष्टीनें तिला कांहीं कांहीं गोष्टी येत नाहीं म्हणतोस, त्या तूं तिला शिकव म्हणजे झालें. आम्ही उत्कृष्ट प्रकारचें सुवर्ण तुझ्या स्वाधीन करणार आहों. त्याचा तूं तुला आवडेल तसा अलंकार तयार कर म्हणजे झालें. एकादा आइता तयार केलेला अलंकार मोठा मनोहर दिसतो; पण अशा वेळीं हिणकस सोनें पदरांत पडण्याचा फार संभव असतो. तुझा काय विचार आहे, तें मला आतांच सांग, म्हणजे त्या गृहस्थास तोंडघशीं पाडल्याचें पातक तरी मला

लागणार नाहीं." असें ह्मणून विसूकाका दिनकरच्या उत्तराची वाट पाहूं लागले; पण दिनकर कांहींच बोलला नाहीं. तेव्हां विसूकाका पुन्हा म्हणाले, "मग वैशाख शु॥ १० चा मुहूर्त कायम करण्याबद्दल मी गोपाळरावांना लिहूं ना ?"

"हो." एवढेंच उत्तर देऊन दिनकर घरांत निघून गेला. वडिलांचें म्हणणें त्याला सर्वथा पटलें. आपल्या मनांतल्या सर्व गोष्टी शिकण्यासारखी मुलगी आहे, हें त्यानें स्वतःच पाहिलेलें असल्यामुळे वाडिलांचेंच म्हणणें त्याला सर्वथा पसंत पडलें. अशा रीतीनें लग्नाला त्याचें मन तयार झाल्या-वर आपल्या मित्रमंडळीस त्यानें स्वतःच आमंत्रणपत्रिका पाठवून त्यांना रामपुरास बोलावून घेतलें. त्याचे ते तिघेहि मित्र उमरावतीचेच राहणारे असल्यामुळें ते पत्राप्रमाणें एक दोन दिवसांतच रामपुराला येऊन दाखल झाले. विसूकाका देशमुखांच्या घरांतील एकदर व्यवस्था, टापटीप व आल्यागेल्यांचा सत्कार पाहून त्या तिघांहि स्नेह्यांना खऱ्या गृहस्थाश्रमाचें दर्शन झाल्याप्रमाणें वाटलें व त्यामुळें त्यांचे तेथें मोठ्या आनंदानें दिवस जात होते.

दिनकराच्या लग्नाला दोन दिवस राहिल्यावर विसूकाकांनीं गांवांतील विशेष ओळखीच्या अशा पांचपन्नास गृहस्थांना सहकुटुंब सहपरिवार बरो-बर घेतलें आणि ते मांडवगड येथें येऊन दाखल झाले. गोपाळराव भाग-वतांनीं त्यांची सर्व व्यवस्था फार चांगल्या प्रकारें अगोदरच करून ठेवली होती. जुन्या पद्धतीप्रमाणें सर्व लग्नसोहाळे योग्य प्रकारें होऊन हा विवाह समारंभ मोठ्या थाटानें पार पडला. तंटाभांडण वगैरे कांहीं एक झालें नाहीं. इतक्या थाटानें व आनंदानें पार पडलेला असा विवाहसमारंभ हा मांडवगडला पहिलाच होय, असें तेथल्या लोकांना वाटल्यावांचून राहिलें नाहीं. या सर्वांचें कारण विसूकाकांची विलक्षण दक्षता हें होय. दिन-करच्या पत्नीचें नांव सर्वांच्या विचारानें लक्ष्मी असें ठेवण्यांत आलें. स्वतः दिनकरला हें नांव कितपत आवडलें असेल तें असो; पण स्वतः अन्नपूर्णा-काकूंनीं 'आज आमच्या घरांत ही लक्ष्मीच येत आहे' असें म्हटल्यावर त्यालाहि तें नांव आवडून घ्यावें लागलें. इंदिरा, सरोजिनी किंवा असेंच

कांहीं तरी ‘ रोम्यांटिक ’ नांव पत्नीचें ठेवावयाचें त्याच्या मनांत होतें; पण त्याच्याच बहिणी वगैरे विरुद्ध गेल्यामुळें लक्ष्मी या निरस नांवानेंच त्याला लग्नांतले व्यवहार करावे लागले. लग्नसमारंभ आटोपल्यावर बरोबर लक्ष्मीला घेऊन ही सर्व मंडळी रामपुराला परत आली. गांवांतल्या ओळखीच्या लोकांचा रुसवा राहूं नये ह्मणून विसूकाकांनीं एक मोठी गांवजेवणावळ देण्याचें ठरविलें होतें व ती जेवणावळ होईपर्यंत दिनकराने आपल्या तिघां स्नेह्यांना ठेवून घेतलें होतें. आदितवारीं ही जेवणावळ फारच संतोषकारक रीतीनें पार पडली. विसूकाकांची दक्षता व थोरपणा हीं या वेळीं या तिघां स्नेह्यांच्या चांगलीं नजरेस आलीं. गांवांतील ब्राह्मण, वाणी, उदमी, मराठे वगैरे झाडून साऱ्या परिचित गृहस्थांना जेवण्यास बोलावण्यांत आले होतें. जातीरिवाजाप्रमाणें निरनिराळ्या पंक्ती केल्या असून जागेच्या अडचणीमुळें त्या निरनिराळ्या वेळीं बसविण्यांत आल्या होत्या. आमंत्रणें देण्याचे काम भास्कर व दिवाकर या दोघांवर सोंपविण्यांत आले होतें. विसूकाका वेळोवेळीं याद्या तपासून कोण आला, कोण नाही, ते पहात होते. इतक्यांत त्या गांवचा रामा धोबी अद्याप जेवण्यास आला नाही, असें त्यांच्या लक्षांत आलें. त्याबरोबर ते दिवाकराला हांक मारून म्हणाले, “ अरे दिवाकर, त्या रामा धोब्याला बोलावणें केले होतेंस ना ? ”

दिवाकर उमरावतीस हायस्कुलात सातव्या इयत्तेत शिकत असल्यामुळें आणि प्रत्येक परीक्षेंत पहिल्या नंबरांत पास होत गेल्यामुळे उच्च नीच भावनांनीं बराच शेफारून गेला होता. तो ह्मणाला, “ तो आपल्या घरीं रोज येतो, तसा आजहि येईल आणि जेऊन जाईल. त्याला निराळे असे आमंत्रण कशाला द्यावयाला पाहिजे ? ”

विसूकाका जरा रागावून म्हणाले, “ अरे शहाण्या, तो आपल्या घरचा नौकर झाला, ह्मणून त्याला कांहीं मानापमान नाहीं वाटतें ? जा, अगोदर जा आणि त्याला जेवावयाला घेऊन ये.”

दिवाकरानें लागलीच डोक्यावर टोपी ठेवली आणि तो तसाच रामा धोब्याच्या घरीं गेला. बोलावल्याबरोबर रामा येईल असें त्याला वाटलें

होतें; पण त्याला अनुभव निराळाच आला. रामाच्या घरांत तो पाऊल टाकतो, तों रामा भाजीभाकर खात बसलेला त्याला दिसला. तो ह्मणाला, " रामा, घरीं चल. बाबांनीं तुला जेवावयाला बोलाविलें आहे."

रामा ह्मणाला, " भाऊसाहेब, हें मी कोणाचें खात आहे? आपलेंच खात आहें. घरीं येऊन जेवण्यांतच अधिक तें काय आहे ? "

आतां मात्र दिवाकराला मानापमान ही काय चीज काहे, तें कळून आलें. त्यानें रामाला पुष्कळ विनविलें; पण रामानें जेवण झाल्याचें निमित्त करून जाण्याचें टाळलें. निरुपाय होऊन रामाचा नकार विसू-काकांना दिवाकरानें कळविला. विसूकाका दिवाकरावर पुष्कळ रागावले आणि स्वतः रामाला बोलावण्यास गेले. विसूकाकांना दाराशीं पाहतांच रामाचा सगळा अभिमान विलयाला गेला आणि तो मोठ्या आनंदानें जेवण्यास आला. विसूकाकांची ही थोर वृत्ती पाहून कॉलेजांत शिकणाऱ्या त्या तिघांहि विद्यार्थ्यांना मोठें नवल वाटलें. ही जेवणावळ होऊन दोन तीन दिवस झाले, तरी वरील विद्यार्थ्यांना उमरावतीस जाण्याला परवानगी मिळेना. आणखी आठ दिवस तरी रहावें, असा विसूकाकांनीं आग्रह धरल्यामुळें ते तिघेहि त्याप्रमाणें राहिले होते. लग्नासाठीं आलेल्या पाहुणेमंडळींतहि त्यांच्या वयाचे समवयस्क असे कांहीं तरुण होते. ही सर्व तरुण मंडळी बरोबर फराळाचें वगैरे घेऊन सायंकाळच्या वेळीं दूर-वर फिरावयाला जात असे. एके दिवशीं रोजच्याप्रमाणें ही मंडळी दिन-करसह बाहेर फिरावयास गेली असतां वाटेनें दिनकरच्या लग्नासंबंधानेंच बोलणें निघालें. रामभाऊ ह्मणाला, " कांरे दिनकर, स्त्री म्हणजे अशी असली पाहिजे नी तिला अमुक गोष्टी समजल्या पाहिजेत, वगैरे तू बरीच बडबड करीत होतास. मला वाटते, तुझ्या समजुतीपेक्षांहि तुला अधिक चांगली बायको मिळाली. खरें ना ? "

दिनकर कांहींसा गंभीर होऊन ह्मणाला, " चांगली म्हणजे कशी ? स्वरूपानेंच ना ? "

पांडुरंग ह्मणाला, " आणि गृहकृत्यांतहि ती फार दक्ष आहे."

विश्वनाथ चेष्टेनें ह्मणाला, " पांडुरंग, तुला कांहीं समजत नाहीं. चटण्याकोशिंबिरी करतां आल्या म्हणजे कांहीं गृहिणीपदाची योग्यता येत नाहीं. "

रामभाऊ कुचेष्टेनें ह्मणाला, " हां, हे खरे. आपला संसार करतां आला नाहीं तरी हरकत नाहीं; पण बाजाची पेटी वाजवितां आली किंवा एकाद्या सभेंत भाषण करून टाळ्या मिळविल्या, तरच गृहिणीपदाची योग्यता येते. मग घरांतलीं मुलेबाळे कच्चें अन्न खाऊन अजारी पडलीं तरी हरकत नाहीं. "

पांडुरंग ह्मणाला, " अरे; पण दिनकरचें म्हणणे ऐकून घेतल्यावांचूनच ही एवढी त्याच्यावर टीका कां ? दिनकर, तुझे या बाबतींत काय म्हणणें आहे ? "

दिनकर ह्मणाला, " तुम्हां चेष्टा करणारांना माझे म्हणणे पटावयाचें नाहीं. स्त्री गृहकृत्यांत दक्ष असली आणि ती सुंदर असली म्हणजे तुह्मांला सर्व कांहीं मिळाले, असे वाटते; पण ही केवळ बाह्य दृष्टि होय. मुख्यतः मानसिक सौंदर्याकडे पाहिलें पाहिजे—ॲकॉम्प्लीझमेंट--पाहिजे. "

विश्वनाथ ह्मणाला, " मग त्याबद्दल तूं आतां खटपट कर. तुला पाहिजे तसे तिचें मानसिक सौंदर्य घडीव म्हणजे झाले. तू तसा प्रतिभासंपन्न आहेसच आणि तीहि कांहीं अज्ञान नाहीं. तिच्या बापानें तिचें वय अकराबारा वर्षांचे सांगितले; पण ती खरोखर तेरा चवदा वर्षांची असावी. तिच्या गुरूचे नातें तुझ्याकडे आतां आलें आहेच. "

दिनकर मनःपूर्वक ह्मणाला, " तें खरें; पण मला तरी वेळ कोठें आहे! तिला एकाद्या बोर्डिंग स्कूल मध्यें ठेवावें असें मला वाटतें; पण घरांत कोणाला माझें हें म्हणणें पसंत पडावयाचे नाहीं. "

दिनकरचे हे शब्द ऐकून रामभाऊ एकदम रागानें ह्मणाला, " बोर्डिंगस्कूल म्हणजे नीति देवतेचें मंदिर आणि आह्मां गृहस्थांचीं घरें म्हणजे हमालखाने ! दिनकर, या असल्या काव्यमय विचारांनीं वेडा होऊन त्या निर्बोध बालिकेची माती करूं नकोस. वेड्या, आपणासारख्या गृहस्थांचीं

घरें ह्याच खरोखर स्त्रियांच्या शाळा होत. त्यांतून तुझें घर तर अगदीं कित्ता घेण्यासारखें आहे. कुटुंबवत्सल गृहस्थांच्या घरांत जें विविध शिक्षण मुलींना सहज मिळतें, तें कोणत्याहि शाळेंत मिळणार नाहीं. अन्नपूर्णा-काकू आणि विसूकाका यांसारखीं शिकविणारीं माणसें ज्या घरांत आहेत, त्या घरांतल्या मुलींना मानसिक सौंदर्यासाठीं शाळेत पाठविणे म्हणजे अमृत सोडून मोरींतला गाळ चाटावयाला जाणें होय. ''

विश्वनाथ ह्मणाला, '' रामभाऊ, तूं ह्मणतोस ते खरें; पण हल्लींच्या युगांत केवळ गृहशिक्षणानें कसें भागेल ? जुलियस सीझरच्या बापाचें नांव काय ? सॅघालीन बेट कोठे आहे ? यांसारख्या प्रश्नांचीं उत्तरें जर अली-कडच्या मुलींना देतां आलीं नाहींत,तर आमच्या समाजांत कोण अनर्थ उडेल, याची कांहीं तुला कल्पना आहे ? ''

दिनकर कांहीच बोलत नाहीं, असें पाहून पांडुरंग ह्मणाला, '' दिन-कर, तुझी काकू आणि वडील हीं दोघेंहि वृद्ध झालीं आहेत, तेव्हां त्या बिचाऱ्यांच्या मनाला वाईट वाटेल, असें कांहीं करूं नकोस म्हणजे झालें. त्यांच्या पश्चात् तुला काय करावयाचें असेल, तें खुशाल कर. या पाश्चात्त्य शिक्षणापासून जें तेज आम्हीं संपादन करावयाला पाहिजे होतें, तें तर कांहीं केलें नाहीं; पण त्यांतलें विष तेवढें घेतलें आहे. बेपर्वाई, स्वार्थ आणि विलासलोलुपता या विषांनीं आह्मां पुरुषांचीं शरीरें कुजलीं आहेत, तेवढीं पुरें. आणखी हें विष स्त्रियांत तरी आतां कालवूं नका. त्यांना तरी सुखा-समाधानानें आपलीं गृहकृत्यें करूं द्या. ''

रामभाऊ ह्मणाला, '' पण स्त्रियांनीं गृहकृत्यें करणें म्हणजे हमाली करणें, असें आमच्या दिनकरला वाटतें. स्वयंपाक ! छेः ! कोण हें निंद्य-कृत्य ! दळणकांडण ! ही तर शुद्ध हमाली ! त्यापेक्षां स्वयंपाकी ठेवून हीं कामें भागवावींत किंवा दुकानांतले कुजकेंनासकें अन्न खावून आनंदानें दिवस काढावेत; पण स्त्रियांवर जुलूम होतां कामा नये. अहो, यत्र नार्य-स्तु पूज्यंते रमंते तत्र देवताः हें तत्त्व विसरून चालेल कसें ? ''

पांडुरंग ह्मणाला, '' तो बिचारा ब्रह्मदेव एकाद्या ऑनररी म्याजिस्ट्रेट-सारखा कोठें दृष्टीस पडत नाहीं, हें नशीब ! नाहीं तर स्त्रियांच्या मानसिक

सौंदर्यासाठीं दिनकरसारखे प्रतिभासंपन्न गृहस्थ गर्भारपणाचें ओझें पुरुषांवर टाकावें ह्मणून अर्ज करावयाचे. ”

या विद्यार्थ्यांचा अशा रीतीनें चालतां चालतां बराच विनोद चालला होता. दिनकरहि मधून मधून त्यांना योग्य तीं उत्तरें देत होता. अखेरीस ही सर्व मंडळी एका लहानशा नदीच्या कांठीं बसली व तेथें बरोबर आणलेलें फराळाचें फस्त करून नंतर रमत रमत घरीं परत आली. दिनकरच्या आग्रहानें ही विद्यार्थी मंडळी आणखी सात आठ दिवस त्याच्या घरीं राहिली आणि नंतर ते सर्व उमरावतीस गेले. उन्हाळ्याची सुटी संपून कॉलेज सुरू झाल्यावर पुन्हा हे सर्व विद्यार्थी दिनकरसह मुंबईस येऊन दाखल झाले. मुंबईस आल्यावर त्याच चाळींतल्या जेवण्याच्या जागेंत एक थाटाची मेजवानी विद्यार्थ्यांनीं झोडली, हें निराळें सांगावयाला नको. खर्च मात्र दिनकराला करावा लागला.

---

## प्रकरण तिसरें.



विसूकाकांचें वय बरेंच झालें होतें. अन्नपूर्णाकाकू तर त्यांच्याहि पेक्षां वृद्ध होत्या. हीं दोन पिकलेलीं पानें केव्हां गळून पडतील, याचा कांहीं आतां भरंवसा उरला नव्हता आणि झालेहि तसेंच. दिनकरचें लग्न मनाप्रमाणें पार पडल्यामुळें विसूकाकांच्या जीवावरचें दडपण निघाल्यासारखें झालें होतें आणि अशा रीतीनें मन स्वस्थ झाल्यामुळें सर्व मंडळीसह काशीयात्रेला जाण्याचा त्यांचा विचार चालला होता. एकदां विश्वेश्वराचें दर्शन आणि गंगेचें स्नान घडावें अशी अन्नपूर्णाकाकूंचीहि फार इच्छा होती; पण पैशाच्या अडचणीमुळें त्यांनीं या बाबतींत विसूकाकांना फारसा तगादा केला नाहीं. दिनकरच्या लग्नाला अजमासापेक्षां बराच कमी खर्च लागल्यामुळें हा काशीयात्रेचा बेत विसूकाकांनीं ताबडतोब ठरविला व ते बरोबर अन्नपूर्णाकाकू, पत्नी व दिवाकर यांना घेऊन यात्रेला निघून गेले. प्रथम ही सर्व मंडळी हरिद्वारला गेली आणि तेथून यात्रा करीत करीत काशीला

परत आली. हा प्रवास अन्नपूर्णाकाकू आणि विसूकाका यांना न मानवतां उलट त्या दोघांनाहि दुखण्यांनीं घेरलें. विसूकाकांचा मुक्काम काशीस असतां रोजच्या प्रमाणें गंगेचें स्नान करून व विश्वेश्वराचें दर्शन घेऊन अन्नपूर्णाकाकू परत येऊन थोडी विश्रांति घेतात तोंच त्यांचें देहावसान झालें. ह्मातारी मोठी पुण्यवान् ह्मणून काशीक्षेत्रीं तिचीं हडके पडलीं, असें जो तो ह्मणूं लागला; पण विसूकाकांना फार दुःख झाले. आपला मोठा आधार गेला, असें त्यांना वाटलें. या आघातानें आणि प्रवासाच्या श्रमानें त्यानींहि अंथरुण धरलें आणि पंधरावीस दिवसांनीं सर्व मुलेंबाळें जवळ असतां त्यांनीं शांतवृत्तीनें इहलोकचा निरोप घेतला. प्राणोत्क्रमणाच्या वेळीं भास्करला जवळ बोलावून ते ह्मणाले, "भास्कर, सर्व प्रपंचाचा भार आतां तुझ्यावर पडला आहे. व्यवस्थेनें वागलां, तर भाजी भाकरीला कांहीं कमी नाहीं. आपले कुलाचार यथाशक्ति चालवा. आल्यागेल्याला अन्नपाण्यासाठीं नाहीं ह्मणूं नका. त्यांच्या आशीर्वादाने तुह्मांला कांहीं कमी पडावयाचें नाहीं. दिनकरला आणि दिवाकरला सांभाळ." विसूकाकांचे हे शब्द ऐकून सर्वांचे डोळे अश्रूंनीं भरून आले आणि विसूकाकांचें प्राणोत्क्रमण झाल्यावर त्या घरात एकच आकांत उडाला. गांवांत ही बातमी समजतांच सगळें गांव त्यांच्या दाराशीं लोटलें आणि विशेष परिचयाचे लोक पोरासोरांप्रमाणें रडूं लागले. गांवांत त्या दिवशीं कोणाच्याहि घरीं चूल पेटली नाहीं, एवढे सांगितले, ह्मणजे विसूकाकांविषयीं तेथल्या लोकांना किती वाईट वाटलें, याची सहज, कल्पना होईल.

काळाच्या ओघांत हें दुःख एकेक दिवसाने हलकें होऊन सर्वांचें लक्ष पुढील परिस्थितीकडे लागलें. आतां प्रपचाची सर्व व्यवस्था पाहण्याचें काम भास्कर व विसूकाकांची पत्नी यशोदा या दोघांवर पडले होतें. अन्नपूर्णाकाकूप्रमाणे यशोदाहि गृह कृत्यांत अत्यंत दक्ष व दूरवर दृष्टि पुरविणारी होती. भास्करहि व्यवस्थित व काटकसरीनें वागणारा होता. सुदैवानें याच वेळीं दिनकरची बी. ए. ची परीक्षा पास होऊन त्याला वीस रुपयांची स्कालरशिपहि मिळाली होती. म्याट्रिकच्या परीक्षेंत दिवाकरहि पास झाला होता; पण त्याला स्कॉलरशिप मिळाली नाहीं. दिनकराच्या मनांतून एम.

ए. चा अभ्यास करावयाचा होता आणि दिवाकराची इच्छाहि मुंबईच्या कॉलेजांत अभ्यास करण्याची होती. दोघांचा खर्च कसा काय निभेल याची भास्कराला मोठी काळजी होती; पण त्या बाबतींत त्या दोघांनाहि निरुत्साह न करतां त्यांच्या खर्चाची शक्य ती तजवीज त्यानें करून ठेवली.

दिनकर आणि दिवाकर या दोघांच्याहि परीक्षा झाल्यामुळें विश्रांतीचे दिवस शांतपणें ते रामपुराला घालवीत होते. वडिलांच्या मृत्यूमुळे त्यांचीं मनें कांहींशीं उद्विग्न झालीं होती हे खरें; पण दोघेहि समजूतदार असल्यामुळें दुःख गिळून संसाराकडे लक्ष पुरवीत होते. भास्कर, दिनकर व दिवाकर यां तिघांचे स्वभाव पाहून गांवांतले लोक निराश झाले नव्हते. हीं मुलें विसूकाकांचें नांव बुडूं देणार नाहींत, अशी त्यांनाहि आशा वाटत होती. दिनकराची पत्नी लक्ष्मी हिच्या तीन चार खेपा सासरीं झाल्या होत्या व गेल्या चार पांच महिन्यांपासून ती एकसारखी सासरींच होती. तिची आणि दिनकरची आतां बरीच ओळख झाली होती आणि दोघांनाहि एकमेकांच्या स्वभावाची ओळख पटत चालली होती. आपली स्त्री सुस्वरूप, सुस्वभावी व कार्यदक्ष आहे, हे दिनकराला थोड्याच अवधींत समजून चुकलें होतें; पण स्त्री गृहांत गृहिणीप्रमाणे असून बाहेर ती मित्राप्रमाणे असावी व एरव्ही विनयशील असून विश्रांतीच्या वेळीं तिनें ललितकलेतहि नैपुण्य दाखविलें पाहिजे. असें दिनकरला मनापासून वाटत होतें. आमच्या वाचकांनीं दिनकराच्या या इच्छेबद्दल त्याला दोष देण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण ही इच्छा ज्यांच्या मनांत उद्भवणार नाहीं, असे किती वाचक असतील! गृहिणीला लिहिण्यावाचण्यांत तरबेज करावी ह्मणून दिनकरनें मुंबईहून कांहीं पुस्तकें बरोबर नेलीं होतीं; पण या खानदानीच्या घरांत तिला शिकविण्याला दिनकरला संधीच मिळेना. रात्रीं अर्धा पाऊण तास वेळ मिळे; पण तो त्याला अगदींच अपुरा वाटे. एकेदिवशीं दुपारच्या वेळीं उमा कांहीं विणकाम करीत असून तिच्या जवळच लक्ष्मी तें विणकाम मोठ्या उत्सुकतेनें पहात होती. ती ह्मणाली, "उमाताई, तुह्मी इतकीं बारीक फुलें आणि पानें कशी छान काढतां, मला नाहीं अशीं काढतां येत."

उमाची सुई भराभर चालली होती. ती आपलें काम करीत असतां ह्मणाली, " त्यांत काय मोठेंसें आहे. माझ्या जवळ शीक म्हणजे माझ्याहि पेक्षां चांगलीं फुलें काढशील."

लक्ष्मी ह्मणाली, " माझ्या आईला किती तरी तऱ्हेतऱ्हेचे विणकाम करतां येतें. मला ती कांहीं तरी शीक ह्मणून दररोज ह्मणावयाची; पण माझा हातच चांगला चालत नाहीं. उमाताई, माझी आई या वेळीं काय करीत असेल, बरें ? "

" तें मी काय सांगू बरे बाळ. तूं सांग पाहूं. "

" बिचारी माझ्यासाठीं सारखे अश्रू गाळीत असेल. " हे ह्मणतां ह्मणतांच लक्ष्मीचे डोळे पाण्यानें भरून आले. उमानें लक्ष्मीला आपल्या जवळ घेतलें आणि तिच्या पाठीवर हात फिरवून ती ह्मणाली, " लक्ष्मी, आतां तूं लहान का आहेस आईसाठीं असें डोळ्यांतून पाणी काढावयाला! मी तर पहिल्या बोळवणीला देखील डोळ्यांतून पाणी काढले नाहीं."

इतक्यांत तेथें हंसत हंसत सत्यभामा आली आणि उमाच्या पुढें एक पुस्तक करून ह्मणाली, " उमावैनी, तुला एक गंमत सांगावयाची आहे. ओळख बरें हें कोणाचें पुस्तक ? "

ते पुस्तक हातांत घेऊन उमा ह्मणाली, " अगे, ही इसापनीति. समजलें. लक्ष्मीचें वाटते हें पुस्तक? स्वतः भावोजीच शिकवीत असतील?"

हें ऐकून लक्ष्मीचा चेहरा लज्जेनें अगदीं लाल झाला. सत्यभामा ह्मणाली, " लक्ष्मीवैनी, आतां मराठी संपल्यावर इंग्रजीहि शिकावयाचें असेल ? घरचाच मास्तर. पगार बिगार कांहीं नको. "

लक्ष्मी बरीच ओशाळली होती. तरी ती उसने अवसान आणून ह्मणाली, " आणि आपल्याला शिकवायला मास्तर ठेवला आहे कीं, स्वतःच शिकवितात ? "

आतां सत्यभामाहि लाजली. ती ह्मणाली, " मला नाहीं बाई एवढी शिकण्याची हौस. बायकांना शिकून नौकरी थोडीच करावयाची आहे!"

उमा हंसत हंसत ह्मणाली, " नौकरी करावयाची नाहीं; पण त्यांना

पत्र पाठवून कुशल तर कळवितां आलें पाहिजे ना? 'प्राणनाथ' 'प्रियकर' हें सगळें शिकल्यावांचून कसें समजणार?"

हें ऐकून सत्यभामा अधिकच लाजली आणि तेथून दुसरीकडे गेली. इतक्यांत बाहेरून उमाचा चार पांच वर्षांचा मुलगा सदू आंत दुडदुड धांवत आला आणि लक्ष्मीच्या पाठिवर आपटून 'काकू, मला भूक लागली' असें ह्मणून रडूं लागला. तेव्हां उमा त्याचा हात धरून ह्मणाली, 'चल, मी तुला जेवायला घालते.' पण सदूनें आपला हात हिसकून घेतला आणि तो रडण्याच्या सुरांत ह्मणाला, "जा, आं. तूं नको, मी लक्ष्मीकाकूच्या हातानें जेवीन."

उमा हंसत हंसत ह्मणाली, "अरे गुलामा. लक्ष्मीकाकूंवर एवढें प्रेम बसलें का? आई कोणीच नव्हे." असें ह्मणून ती लक्ष्मीकडे वळून ह्मणाली, "लक्ष्मी, अशी तुझ्याकडे मोहनी तरी काय आहे? ज्याला त्याला आपली लक्ष्मी पाहिजे. घरांतल्या पोरांना तर लक्ष्मीकाकूवांचून घांसहि गिळेनासा झाला आहे."

लक्ष्मी यावर कांहींच बोलली नाहीं. ती सदूला घेऊन स्वयंपाक घरांत गेली. इतक्यांत उमाकडे यमुना आली आणि लक्ष्मी कोठें ह्मणून विचारूं लागली. तेव्हां उमा सहज थट्टेनें ह्मणाली, "ज्याला त्याला आतां धाकट्या वैनीसाहेब पाहिजेत. खरेंना यमूनावन्सं?"

यमूना हंसून ह्मणाली, "उमावैनी, खरेंच सांगा, पोर मोठी गोड आहे, नाहीं? चतुर आणि शहाणी असून इतक्या सालस स्वभावाची मुलगी मीं बाई कुठें बघितली नाहीं. पूर्व जन्मीचें सुकृत ह्मणून ही आपल्या घरांत लक्ष्मी आली हो!"

उमा ह्मणाली, "तें खरेंच. वन्सं, मी तिची किती चेष्टा करतें, पण तिला राग ह्मणून नाहीं. कोणतेंहि काम कसें चोख आणि निर्मळ करते. स्वयंपाक तरी किती रुचकर करते."

यमुना ह्मणाली, "आणि पुनः कामाचा कंटाळा ह्मणून नाहीं. कितीहि काम असलें, तरी सदां हंसत मुख असते."

लक्ष्मीची ही स्तुति आणखीहि चालली असती; पण तितक्यांत ती

स्वतः तेथें आल्यामुळें हें स्तुतिस्तोत्र तितकेंच थांबलें. विसूकाकांच्या घरांत लक्ष्मीनें पाऊल टाकल्यापासून तिच्या विषयीं सगळ्यांनाच मोठें कौतुक वाटत होतें. तिचा निरालसी व निरभिमानी स्वभाव, सुहास्य मुद्रा, गोड भाषण, सर्वांविषयीं आदरभाव, गरीबांविषयीं वसत असलेली वात्सल्यबुद्धि, कामकाजाची टापटीप आणि स्वच्छतेची आवड यामुळें विसुकाकांच्या घरांतील प्रत्येकास आमच्या घरांत ही प्रत्यक्ष लक्ष्मीच आली, असें वाटावे यांत कांहीं नवल नाहीं. पण स्वतः दिनकरला ही रत्नकाणिका ज्यामानानें आवडावयाला पाहिजे होती, त्यामानानें आवडली नाहीं. नाना प्रकारच्या रंगांचें किरण फेकणारी बिलोरी कांच त्याला पाहिजे होती. असल्या कांचेनें दुसऱ्याकडून उसना प्रकाश घेऊन मग नानारंगांचे किरण फेकले असते आणि ही रत्नकाणिका स्वतःच्याच तेजानें चमकत आहे, हें जणूं तो विसरूनच गेला होता. काव्यमय विचारामुळें तो स्वप्नसृष्टींत वावरत असल्यामुळें त्याच्या समोर प्रत्यक्ष सौख्याची मूर्ति उभी असूनहि तो सुखाचा शोध करीत हिंडत होता. दिनकरच्या हे लवकरच लक्षांत आलें कीं, आपली पत्नी सुंदर आहे, कर्तव्यदक्ष आहे; पण लिहिणेंवाचणें बेताचेंच येत आहे. तेव्हां दिनकरनें लक्ष्मीला स्वतःच शिकविण्यास आरंभ केला. लक्ष्मीचा स्वभाव अगोदरच विनयशील. त्यांतून पतीचा परिचय होण्यास नुकताच आरंभ झाला होता; तेव्हां तिनें विशेष आढेवेढे न घेतां शिकण्यास आरंभ केला; पण दिनकरची व तिची चांगली ओळख झाल्यावर ती हळूच हंसत हंसत दिनकरला ह्मणाली, " बायकांना लिहिणे शिकून काय करावयाचे कोण जाणे? त्यांना पतीची योग्य प्रकारें सेवा करतां आली म्हणजे झालें."

पतीचे पाय रगडून हमालीचें काम करण्यांत समाधान मानणारी ही 'थर्डक्लास' बायको आहे, असे विचार दिनकरच्या मनांत आले. हे विचार तसेच दाबून ठेवून तो ह्मणाला, "स्त्रियांना लिहितां वाचतां अवश्य आलें पाहिजे. पति बाहेरगांवीं असतां पत्र पाठवून त्याला आपलें कुशल कळवितां आलें पाहिजे, तसेंच पतीकडून आलेलें पत्रहि वाचतां आले पाहिजे."

लक्ष्मी शालीनतेनें ह्मणाली, " तितकें मला येतें. "

दिनकरला मोठें आश्चर्य वाटलें. तिला मुळींच लिहिणेंवाचणें येत नाहीं, अशी त्याची समजूत होती, आणि ह्मणून त्याने अगदीं लहान मुलांचीं पुस्तकें तिच्यासाठीं आणलीं होतीं. तो ह्मणाला, " घरांत सगळ्यांची समजूत तुला मुळींच लिहिणें वाचणें येत नाहीं, अशी आहे. त्यांना तूं हें सांगितलें कां नाहींस ? "

" यांत सांगण्यासारखें काय आहे? अमुक येतें, तमुक येतें, असें सांगणें मला आवडत नाहीं. "

" हें फार चांगलें. पण तुला अधिक शिकावयाला पाहिजे. प्रपंचाचा भार बायकांवर असतो, तेव्हां खर्चाच्या काटकसरीसाठीं त्यांना हिशोब-ठिशोब अवश्य ठेवतां आले पाहिजेत. "

" हिशोबाठिशोब ठेवण्याची मजवर पाळी आली, तर तेहि मी चांगलें ठेवीन. "

आतां तर दिनकर अधिकच निरुत्तर झाला. तो ह्मणाला, " हे पहा, हल्लींचा काळ फार झपाट्यानें बदलत आहे. बायकांना इंग्रजी देखील तेवढ्यासाठीं फार चांगलें आलें पाहिजे. "

" ते कशाला ? "

" कशाला म्हणजे! आतां इंग्रजीची जरूर अगदीं हरघडी पडते. "

"अथवा ही जरूर आम्हींच आमच्या मूर्खपणामुळें उत्पन्न करून घेतली असेल. प्रत्येक व्यवहार मातृभाषेंतच करावयाचा, असा लोकांनीं जर निर्धार कायम ठेवला असतां, तर उगीच निष्कारण उठल्याबसल्या इंग्र-जीचें कारण उरलें नसतें. "

सहज विद्युत चमकावी त्याप्रमाणें लक्ष्मीचे हे चमकलेले विचार पाहून निमिषमात्र दिनकरच्या डोळ्यापुढें लक्क झालें. क्षणभर स्तब्ध राहून तो म्हणाला, " तें कांहीं असो, तुला माझ्यासाठीं तरी इंग्रजी शिकावयाला पाहिजे. "

" मी शिकेन; पण मी बुद्धीनें फार जड आहें."

" कांहीं हरकत नाहीं. प्रयत्नानें सगळें कांहीं साध्य होतें. " यानंतर

दोघेंहि थोडा वेळ स्तब्ध होतीं. नंतर दिनकर म्हणाला, " मी आतां मुंबईला जाऊन उन्हाळ्याच्या रजेंत लवकरच परत येईन. येतांना तुझ्या-साठीं मुंबईहून काय आणूं ? "

" आपल्या घरांत काय कमी आहे ? उगीच अनावश्यक वस्तु आण-ण्यांत काय फायदा ? पोरासोरांना कांहीं खाऊ आणा म्हणजे झालें. त्यांच्या बरोबर आम्हां सगळ्यांना थोडा थोडा मिळेलच. "

लक्ष्मीच्या या अशा भाषणापासून तिला रसिक ठरवावें कीं, अरसिक ठरवावें, तें दिनकरला समजेना. त्याला पाहिजे होतें, ते हास्य, तें लास्य तें मुरडणें, ते नटणें आणि विनोदानें, लाडानें बोलणें हें त्याच्या कांहींच दृष्टीस न पडल्यामुळें तो कांहींसा निराशच झाला. एकाद्या रसिक मुलीला तुला मुंबईहून काय आणूं ह्मणून विचारलें असतें, तर तिनें किती तरी वस्तूंचीं नांवें सांगितली असतीं; पण त्या अजाण मुलीनें मुलांसाठीं खाऊ आणण्यास सांगितला. दुर्दैव दिनकराचें. तो तिला कुरवाळून पुन्हा ह्मणाला, " मला मधून मधून पत्र पाठवीत जाशील ना ? "

" मी कशाला पाठवूं ? अह्मां सर्वांची खुशाली मधून मधून भास्कर भावोजी कळवितील, आणि तुम्हींहि मला निराळें असें पत्र पाठवूं नकाहो. आपल्या कुटुंबाच्या एकोप्याविषयीं त्यामुळें लोकांना निष्कारण संशय येईल आणि तुह्मी घरांतल्या माणसांपासून कांहीं चोरूं इच्छित आहां, असें घरांतल्या माणसांना देखील वाटावयाचें. "

जिला अमुक शिकवावयाचें, तमुक शिकवावयाचें, असें दिनकर ह्मणत होता, तीच अल्पवयस्क बालिका जेव्हां दिनकरला शिकवूं लागली, तेव्हां दिनकरच्या काव्यमय विचारांचा मोठा घोंटाळा झाला. मुंबईस असतांना पत्रवाहक हंसाप्रमाणें पोस्टाच्या शिपायानें आणून दिलेली प्रियेची प्रेम-पत्रिका वक्षस्थळावर ठेवून तिचीं पारायणें करण्याचा त्यानें संकल्प योजून ठेवला होता; पण ही प्रिया—' पत्राचें—कारणच नाहीं ' ह्मणून जेव्हां दिनकरला शिकवूं लागली; तेव्हां दिनकरला काय वाटलें असेल, याची कल्प-नाच केली पाहिजे. त्याची स्वप्नसृष्टि जवळ जवळ ढांसळल्यासारखी झाली आणि केवळ व्यवहाराच्या मागें लागलेलें जग त्याला निरस दिसूं लागलें.

आपली स्त्री बुद्धिवान्, चतुर व दक्ष आहे, हें त्याच्या लक्ष्यांत आलें; पण ती उच्च भावनांनीं अलंकृत नाहीं, काव्यमय विचार तिला ठाऊक नाहींत आणि तिची प्रतिभा अगदींच हलक्या प्रतीची आहे, असें त्याला वाटूं लागलें. या बाबतींत त्याच्या अंतःकरणांत समाधानापेक्षां उद्वेगच अधिक उत्पन्न झाला. आशेपेक्षां निराशाच अधिक दिसूं लागली आणि भावी दांपत्यसुखाचा चित्रपट त्याला चित्ताकर्षक न दिसतां भेसूरच अधिक दिसूं लागला. स्वप्नसृष्टींत संचार करणारा दिनकर कोणीकडे आणि व्यवहारांत अगदीं कांटेतोलपणानें वागणारी लक्ष्मी कोणीकडे. दोघांत किती तरी तफावत होती.

## प्रकरण चवथें.



दिनकर व दिवाकर हे दोघेहि मुंबईस आल्यावर बरोबर आणलेल्या पैशांतून त्यांनीं अगोदर कॉलेजची फी भरून एक लहानशी खोली भाड्यानें घेतली व एका साधारण प्रतीच्या खाणावळींत ते जेवण्यास जाऊं लागले. दिनकरनें एकंदर पैशांचा हिशोब करून जरा दूरवर दृष्टि देऊन पाहिल्यावर त्याच्या डोळ्यापुढची स्वप्नसृष्टि हळूहळू नाहींशी होऊन प्रत्यक्ष व्यवहाराशीं त्याचें तादात्म्य होऊं लागलें. दिनकरच्या स्वभावांत अनेक प्रकारच्या मनोवृत्तींचें मिश्रण झालें होतें, हें मागें सांगितलेंच आहे. आपली पत्नी अशा अशा प्रकारची असावी, असें त्याला वाटे हें खरें; पण तेवढ्यावरून तो स्वार्थी किंवा विलासलोलुप होता, असें अनुमान करणें मात्र चुकीचें होईल. वडील त्याच्या शिरावर होते, तेव्हां देखील तो अगदीं साधेपणानें वागत असे. त्याची प्रकृति पूर्वींपासूनच कंटक असून संवयीनें ती त्यानें अगदीं निकोप केली होती. व्यसन असें त्याला सुपारीच्या खांडाचें देखील नव्हतें. आपल्या गोरगरीब स्वदेशबांधवांविषयीं त्याच्या मनांत फार कळकळ असून आपल्या मातृभूमीवर त्याचें विलक्षण

प्रेम होतें. पाश्चात्त्य संस्कृतीचें आणि आर्य संस्कृतीचें संमिश्रण झालें पाहिजे, असें त्याचें मत असून त्याच्या एकंदर स्वभावांतील विशेष हाच होता. प्रपंचाचा खर्च बराच आहे, तेव्हां आपल्या व आपल्या भावाच्या शिक्षणाचा बोजा वडील बंधूवर पडूं नये अशी त्याची इच्छा होती या बाबीचा विचार करीत असतां सकाळीं तास दोनतासांची कोठें तरी शिकवणी पत्करावी असें त्याला वाटूं लागलें. त्याचे स्नेही रामभाऊ, पांडुरंग व विश्वनाथ यांनाहि हा दिनकरचा बेत पसंत पडला आणि तेहि एकादी चांगलीशी शिकवणी त्याच्यासाठीं शोधूं लागले. सुदैवाने लवकरच दिनकरला एक शिकवणी लागली; पण दिनकरला तेथें लवकरच निरोप मिळाला. याचें कारण दिनकरचा तेजस्वी स्वभाव हें होय. मुंबईला एक बडे गृहस्थ ब्यारिस्टरीचा धंदा करीत असून सुधारक ह्मणूनहि प्रसिद्ध होते. यांच्या दोन मुलांना दिनकर दररोज शिकवावयाला जात असे. एके दिवशीं ब्यारिस्टरसाहेबांचा आणि त्यांच्या स्नेह्यांचा स्वदेशी वस्तु वापरण्याच्या निग्रहासंबंधाने वाद चालला होता. ब्यारिस्टरसाहेब एकंदर पाश्चात्त्य वस्तूंची तारीफ करीत असून स्वदेशी चळवळ हें एका प्रकारचे खूळ आहे, असें प्रतिपादन करीत होते आणि त्यांचे स्नेही देशातल्या गोरगरीबांना अन्न मिळावें ह्मणून ही चळवळ पाहिजे, असें प्रतिपादन करीत होते. या वादांत ब्यारिस्टरसाहेबांचा पराभव होण्याची वेळ आल्यामुळें ते दिनकरला ह्मणाले, “ काय हो, तुमचें या बाबतींत काय मत आहे ? ”

ब्यारिस्टरसाहेबांना वाटलें, दिनकर आपला नोकर आहे, तेव्हां आपल्याच बाजूचें मत देईल; पण तसें झालें नाही. तो ह्मणाला, “ आमच्या स्वदेश बांधवांनीं उपाशी मरूं नये अशी इच्छा असल्यास या स्वदेशी चळवळीचें संगोपन आम्हीं आवश्य करावयाला पाहिजे. ”

दिनकराच्या या उत्तरानें ब्यारिस्टरसाहेब अर्थातच गरम झाले. त्या वेळेस ते कांहीं बोलले नाहींत; पण दुसऱ्या दिवशीं त्यांनीं दिनकरला हळूच रजा दिली. पाश्चात्त्य संस्कृतीचा अभिमान बाळगणारीं माणसें किती उदार प्रकृतीचीं असतात, याचा दिनकरला हा पहिला अनुभव आला. यानंतर दुसऱ्या एका ठिकाणीं दिनकराला शिकवणी मिळाली; पण तेथेंहि

त्याचें जमलें नाहीं. त्या घरांत ज्या मुलाला दिनकर शिकवीत असे, त्याला सख्खी आई नसून सावत्र आई होती. ती त्या मुलाचा निष्कारण द्वेष करी. प्रसंगवशात् दिनकरनें तिच्यावर यथास्थित तोंडसुख घेऊन त्या मुलाचा कैवार घेतला. पण हें मुलाच्या बापाला पसंत पडलें नाहीं. द्वितीयसंबंधाच्या लाडक्या स्त्रीचा हा अपमान त्याला सहन न होऊन त्यानें दिनकरला रजा दिली. या वेळींहि दिनकर एक नवा धडा शिकला. दिनकरच्या या अशा स्वभावामुळे त्याच्या स्नेह्यांनीं त्याला शिकवणी शोधण्याच्या नाद अर्थातच सोडला. दिनकराला मात्र आणखी निदान दहा रुपयांची तरी सोय करणे भाग झाल्यामुळे त्याचा शिकवणी शोधण्याचा प्रयत्न चालला होता आणि सुमारें दहापंधरा दिवस गेल्यावर त्याला एक चांगली शिकवणीहि मिळाली. ही शिकवणी मिळून सात आठ दिवस झाल्यावर एका रविवारीं त्याच्या खोलीत रामभाऊ, विश्वनाथ आणि पांडुरंग हे तिघे हजर झाले. चौघे एकत्र झाल्यावर अर्थातच मग निरनिराळ्या विषयांवर वादविवाद सुरू झाले. अनेक प्रकारचे वितंड वाद झाल्यावर मुद्यावर गोष्ट आली. रामभाऊ ह्मणाला, " बरें दिनकर, ही तुझी नवी शिकवणी तरी बरी आहे का ? येथें तरी कांहीं दिवस टिकून राहशील का ? "

दिनकर ह्मणाला, " तें आतांच मी काय सांगूं; पण येथून मला लवकर अर्धचंद्र मिळणार नाहीं, असें वाटतें. कारण ज्या गृहस्थांच्या घरीं मी शिकवावयाला जात असतों, त्यांच्या आणि माझ्या स्वभावांत बरेंच साम्य आहे. गृहस्थ मोठा दिलदार व विद्वान् दिसतो. आतां हा त्याचा दिलदारपणा वरकांती आहे कीं, खरा आहे, तें हळूहळू प्रत्ययास येईलच. "

" म्हणजे येथेंहि दोन हात करण्याचा प्रसंग आला, तर तुझी तयारी आहे, असें दिसते? "

"होय. ही तयारी तर सगळ्या ठिकाणीं पाहिजे. तुह्मांला एकदां अन्याय सहन करण्याची संवय झाली, म्हणजे तुमच्या डोक्यावर ओझींच्या ओझीं येऊन पडतील. "

पांडुरंग ह्मणाला, " तें असो; पण तुला येथें किती मुलांना शिकवावें लागतें ? "

दिनकर हंसत हंसत ह्मणाला, " अडीच मुलांना. "

त्याबरोबर सगळे विद्यार्थी खो खो हंसूं लागले. विश्वनाथ ह्मणाला, " हें अडीच मुलांचें काय गौडबंगाल आहे ? "

दिनकर ह्मणाला, " येथें चौपाटीच्या बाजूला एक लहानसा स्वतंत्र बंगला आहे, तेथें माझी ही शिकवणी आहे. त्या गृहस्थाचें नांव वामनराव. ते मोठे सुधारक ह्मणून येथें प्रसिद्ध आहेत. त्यांच्या एका मुलाचें नांव वसंत आणि दुसऱ्याचें नांव मदन. एक इंग्रजी पहिलींत असून दुसरा तिसरींत आहे. या दोघांना रोजच्याप्रमाणे शिकवीत असतां तीन चार दिवसांनीं बरोबर एका पंधरा सोळा वर्षांच्या मुलीला घेऊन वामनराव मुलांना शिकवावयाच्या खोलीत आले आणि ह्मणाले, ' मास्तर, ही माझी सगळ्यांत वडील मुलगी. हिचें नांव मालती. ही येथील झनानामिशनच्या हायस्कुलांत जाते. यंदा ती चवथींतून पांचवीत गेली असून तिनें पहिल्या नंबरचें बक्षीसहि मिळविलें आहे. हिला कांहीं रोज नियमानें शिकवायला नको. तिनें कांहीं विचारलें, तर तेवढें तिला नीट समजावून सांगत जा म्हणजे झालें. मीहि त्यांना बरें ह्मणून ह्मणालों. आतां या अडीच विद्यार्थ्यांचा अर्थ आला ना तुमच्या लक्षांत ? "

विश्वनाथ ह्मणाला, " तूं हें मग आम्हांला इतके दिवस सांगितलें कां नाहींस ? छेः ! अगदींच अरसिक ! "

रामभाऊ ह्मणाला, " वा ! मोस्ट् रोम्यांटिक. ही शिकवणी तुला मग मोठी काव्यमय मिळाली म्हणावयाची. मुलीचें वय किती ह्मणालास ?"

पांडुरंग ह्मणाला, " पंधरा सोळा वर्षांचें ह्मणून त्यानें मघांच नाहीं का सांगितलें ? "

विश्वनाथ ह्मणाला, " हो हो; त्यानें मघांच सांगितलें खरें. कारे दिनकर, मुलगी दिसावयाला कशी आहे ? "

दिनकर ह्मणाला, " तिच्याकडे जितकी नजर पुरवायला पाहिजे होती, तितकी कांहीं मीं पुरवली नाहीं. तिच्याकडे तशा रीतीनें पाहणें मला चमत्कारिक वाटलें. पण मला वाटतें, ती सुस्वरूपच असावी. वर्णानें ती गोरी असून बांध्यानेंहि ती मला सुबक दिसली. "

रामभाऊ ह्मणाला, " तूं कांहीं तिच्याकडे पाहिलें नाहींस; पण तिनें तुझ्याकडे पाहण्यास कमी केलें नसेल ? "

दिनकर जरा रागानें ह्मणाला, " चेष्टा कोठें करावी आणि कोठें करूं नये, हें तरी तुम्हांला समजतें कारे ? "

पांडुरंग ह्मणाला, " यांत चेष्टा ती कसली ? घडलेली एकंदर हकीकत आमच्याजवळ सांगावयाला एवढा लाजतोस कां? सांग, ती तुझ्याकडे पहात होती ना ? "

दिनकर ह्मणाला, " छे ! तीहि खालीं मान घालूनच उभी होती. ती माझ्या पायाकडे पहात होती आणि मीं तिच्या पायाकडे पहात होतों. वामनराव तेथून निघून गेल्यावर मी तिला एका खुर्चीवर बसण्याविषयीं सुचविलें. ती लाजत लाजतच खुर्चीवर बसली. ही तिच्याकडे पाहण्यास संधी बरी होती; पण मीं एका पुस्तकावर नजर ठेवून तिला एक दोन प्रश्न केले. शाळेत कोणकोणतीं पुस्तके अभ्यासासाठीं नेमलेलीं आहेत, असें मीं तिला विचारलें, तेव्हां तिने गोड स्वरानें आणि मोजक्या शब्दांत मला त्या पुस्तकांचीं नांवे सांगितलीं. "

विश्वनाथ ह्मणाला, " तुझे कान त्या वेळीं तिचे ते वीणानिनादित शब्द ऐकून फार संतुष्ट झाले असतील ? कोणकोणत्या पुस्तकांचीं नांवें तिने सांगितलीं, हे कांही त्या वेळीं तुझ्या लक्षांत आलें नसेल ? "

दिनकर ह्मणाला, " तुमच्या या चेष्टेचा प्रतिध्वनि बाहेर पसरला, तर माझ्या शिकवणीवर पाणी पडावयाचें. "

पांडुरंग ह्मणाला, " त्याबद्दल तुला काळजी नको, आणि रसिक माणसांना स्वतःची चेष्टा देखील फार आवडते. ती देखील तुझ्याचसारखी रसिक असेल नाहीं ? तूं तेथून उठेपर्यंत ती तशीच खुर्चीवर बसली होती का ? "

दिनकर ह्मणाला, " नाहीं. ' तुम्हांला जे काय विचारावेंसे वाटेल, तें मला खुशाल विचारीत जा ' असें मीं म्हटल्यावर ती ' बरें ' म्हणून तेथून चालती झाली. "

रामभाऊ म्हणाला, " मी जर तेथें असतों, तर मला असें वाटलें

असतें कीं, माझ्या मानससरोवरावरून राजहंस दूर दूर जाऊन जणूं अदृश्य झाला. तें जाऊं दे दिनकर; पण ही शिष्यीण सुस्वरूप आहे कीं, ती घरची शिष्यीण सुस्वरूप आहे ?"

दिनकर म्हणाला, "पुन्हां तुमची चेष्टा सुरू झाली. ही असली सौंदर्याची तुलना करून काय करावयाचें आहे ?"

विश्वनाथ म्हणाला, "कां बरें, एका फुलाबरोबर दुसऱ्या फुलाची तुलना करण्यास काय हरकत आहे ? सांग, लाजू नकोस. या दोघांत अधिक सुंदर कोण आहे ?"

दिनकरचा नाइलाज झाला; तो म्हणाला; "केवळ शरीरसौंदर्याच्या दृष्टीनें म्हणाल, तर आमच्याच राणीसरकार श्रेष्ठ ठरतील; पण मानसिक सौंदर्याच्या दृष्टीनें मालतीचाच नंबर वर लागेल."

पांडुरंग म्हणाला, "आणि तूं शरीरसौंदर्यापेक्षां, हें मानासिक सौंदर्यच अधिक पसंत करतोस ?"

दिनकर म्हणाला, "होय. माझ्या मनाचा ओढा त्याच बाजूला आहे."

रामभाऊ म्हणाला, "दिनकर, नीट विचार करून वाग. त्या घरच्या लक्ष्मीची माती करूं नकोस."

दिनकर त्रासून म्हणाला, "तुमच्या थट्टेला कांहीं मर्यादा आहे कारे!"

विश्वनाथ म्हणाला, "दिनकर, आमच्या थट्टेला मर्यादा असो वा नसो; पण लक्षांत ठेव. डोन्ट फॉल इन लव्ह वुइथ हर." असें म्हणून विश्वनाथ उठला आणि बरोबरच्या स्नेह्यांसह आपल्या बिऱ्हाडीं निघून गेला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं रोजच्याप्रमाणें वामनरावांच्या बंगल्यावर मुलांना शिकविण्यासाठीं दिनकर गेला. वामनरावांचा बंगला लहानसाच पण सोइस्कर व शोभिवंत होता. बंगल्याच्या सभोंवतीं सुंदर बगीचा असून त्यांत नाना प्रकारचीं फुलझाडें लावलेलीं होतीं. हा बंगला दुमजली असून खालच्याच मुख्य दिवाणखान्याच्या शेजारच्या खोलींत दिनकर मुलांना शिकवीत असे. या बंगल्यांतील प्रत्येक खोली व प्रत्येक दिवाण-खाना अगदीं अलीकडच्या पद्धतीप्रमाणें शृंगारलेला होता. बहुतेक खोल्यां-तून व दिवाणखान्यांतून खुर्च्या, टेबलांची बैठक असून भिंतीवर अनेक

प्रकारच्या देखाव्यांचीं वगैरे चित्रें टांगलेलीं होतीं. हा बंगला वामनरावांच्या वडिलांनीं बांधलेला असून बंगल्याला हें पाश्चात्य पद्धतीचें स्वरूप वामनरावांनीं आणलें होतें. दरवाजांतून आंत पाऊल टाकल्याबरोबर मुख्य दिवाणखान्यांत प्रवेश होई. याच दिवाणखान्यांत वामनराव आपल्या स्नेह्यांसोबत्यांसह बोलत बसत व सकाळचा चहाहि ते याच दिवाणखान्यांत घेत. या दिवाणखान्याच्या डाव्या बाजूला एकसारख्या चार खोल्या होत्या. पहिल्या खोलींत वामनरावांची लायब्ररी असून त्याच खोलींत ते लिहिण्यावाचण्यास बसत. शेजारची खोली मुलांना अभ्यासासाठीं दिलेली असून याच खोलींत बसून दिनकर मुलांना शिकवीत असे. पलीकडच्या खोलींत मालती अभ्यास वगैरे करीत असे व त्याच्या पलीकडच्या खोलीत घरधनीणबाईचा मुक्काम असे. उजव्या बाजूला एकच मोठी खोली असून ती दिवाणखान्याप्रमाणेच सजविलेली होती. या खोलीत एक बाजाची पेटी व एक पियानो नांवाचें वाद्यहि होतें. हीं दोन्ही वाद्यें वाजविण्यांत मालती बरीच तरबेज झाली होती. वरच्या मजल्यावरहि इतक्याच खोल्या होत्या. आणि तेथील एकंदर सामानावरून कुटुंबांतली मंडळी रात्रीची तेथें निजत असावी हें कोणाच्याहि लक्षांत येई.

दिनकरची जेव्हां वामनरावांकडे वर्णी लागली, तेव्हां वामनरावांचें वय सुमारें पंचेचाळीस वर्षांचें होतें. ते दिसण्यांत रुबाबदार असून बोलण्यांत फार मिठास होते. शरीर बांध्यानें उंच असून मजबूत होतें. त्यांचे वडील करमठ होते; पण वामनरावांची वागणूक पूर्ण सुधारक पद्धतीची होती. त्यांचे वडील मोठे अम्मलदार होते व त्यांनीं वामनरावांना स्वतःचें घर वगैरे बरीच संपत्ति ठेवली होती. स्वतः वामनराव इंजिनियर असून दरमहा तीनशें रुपयाची प्राप्ति त्यांना होत असे. त्यांचा प्रथम विवाह त्यांच्या वडिलांनींच केला होता आणि त्या स्त्रीपासून त्यांना एक मुलगीहि झाली. वर सांगितलेली मालती हीच त्यांच्या प्रथमपत्नीची मुलगी होय. प्रथम पत्नी वारल्यावर त्यांनीं एका विधवेशीं पुनर्विवाह केला. या पुनर्विवाहित स्त्रीपासून त्यांना मदन व वसंत हीं दोन मुलें झालीं होती. वामनराव स्वभावतःच दिलदार वृत्तीचे असून ते फार बहुश्रुत होते.

त्यांची वाणी फार मोहक होती. ते बोलू लागले म्हणजे त्यांच्याजवळून कोणाला उठावेंसें वाटत नसे. कोणाचा विनोदहि ते फार मार्मिकपणें करीत. त्यांच्या पुनर्विवाहित स्त्रीचें नांव कमळाबाई. या स्त्रीच्या कोण त्या गुणावर लुब्ध होऊन वामनरावांनीं तिच्याशीं विवाह केला होता, ते ईश्वरास माहीत ! हा विवाह झाला, त्या वेळीं लोकांत या संबंधानें अनेक तर्कवितर्क पसरले होते. कांहीं विलक्षण कारणामुळे हा विवाह करणें वामनरावांना भाग झालें होते, असें लोक ह्मणत; पण या लोकापवादांत कितपत तथ्य होतें, ते वामनराव व कमळाबाई या दोघांनाच माहीत. कबळाबाई वर्णानें काळ्यासांवळ्या असून शरीरानेंहि स्थूल होत्या. चेहऱ्यांत मोठी आकर्षण शक्ति होती, असेंहि नाहीं. एकाद्या पंडिताप्रमाणें त्या विद्वान् होत्या, असेंहि कांहीं कोठें दिसून आलें नाहीं. स्वतः कमळाबाईला देखील या एकंदर परिस्थितीबद्दल फार वाईट वाटे. विशेषतः तिचे वरचे दोन दांत जरा पुढे असल्यामुळें तिला फारच वाईट वाटें. ती आपल्याकडून नटण्याथटण्याचा पुष्कळ यत्न करी; परतु ऐश्वर्य आणि सौंदर्य यांतला फरक लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आल्यावांचून रहात नसे. बिचारीला या दोन दातांमुळें मोठें आत्मसंयमन करावें लागे. लोक कुचेष्टेनें असे ह्मणत कीं, कमळाबाई महिन्यांतून चार दोन वेळां बोलतात व क्वचितच हंसतात ! पण आह्मांला तर असें वाटतें कीं, हे दोन दांत कमळाबाईला शालीनतेचा धडा शिकवीत होते. मालतीवर कमळाबाईचें अर्थातच प्रेम नव्हतें. एक तर ती सवतीची मुलगी आणि दुसरें हें कीं, वामनराव उठल्या बसल्या प्रत्येक बाबींत मालतीचा सल्ला घेत. गृहिणीचा मान कमळाबाईकडे, पण पेटीची चावी मालतीकडे ! अशी परिस्थिति असल्यामुळें कमळबाईला मालतीचा फार राग येई; पण वामनरावांच्या एकंदर वागणुकीचे धोरण ओळखून ती आपला राग आंतल्या आंत ठेवीत असे.

या शिवाय या कुटुंबांत त्यांच्या स्वभावाची ओळख करून घ्यावयास पाहिजे, असें कोणीहि नव्हतें. वामनरावांना साधारण तीनशें रुपयांची प्राप्ति होती, हें मागें सांगितलेंच आहे. शिवाय त्यांच्या वडिलांनीं बऱ्याच

हजारांच्या प्रामिसरी नोटा ठेवल्या होत्या, त्याचेंहि कांहीं व्याज मिळत होतें. दिनकर त्या दिवशीं रोजच्याप्रमाणें मुलांना शिकविण्यासाठीं गेला असतां सर्व मंडळी मुख्य दिवाणखान्यांत चहाच्या टेबलाभोंवतीं चहाची मार्गप्रतीक्षा करीत बसलेली दिसली. रोज दिनकर येण्याच्या आधींच सर्वांचा चहा होत असे; पण त्या दिवशीं कांहीं कारणामुळें उशीर झाला आणि तो चहाचा थाट दिनकरला पहावयाला मिळाला. दिवाणखान्यांत मध्यभागीं एक वाटोळें पांढऱ्या स्वच्छ दगडाचें टेबल असून त्यावर कप-बशा ठेवलेल्या होत्या आणि सर्व मंडळी भोंवताली बसली होती. दिनकर त्याच दिवाणखान्यांतून मुलांना शिकवावयाच्या खोलींत जात असतां वामनराव ह्मणाले, "मास्तर, बसा जरा येथेंच. मुलांचा चहा पिऊन झाला ह्मणजे त्यांना बरोबरच घेऊन जा." दिनकर विशेष आढेवेढे न घेतां भिंतीला लावून ठेवलेल्या एका खुर्चीवर जाऊन बसला. बसलेली सर्व मंडळी दिनकरच्या पाहण्यांतली होती; परंतु एक गृहस्थ मात्र त्याला नवखे असे होते.

दिनकरला हे गृहस्थ जरी नवखे असले, तरी त्यांचा वामनरावांच्या कुटुंबाशीं चांगला परिचय होता. ह्या गृहस्थाचें नांव डॉक्टर निळकंठराव असें होतें. वामनरावांकडे त्यांची प्रथम कुटुंब वैद्य ह्मणून वर्णी लागली आणि नंतर परिचय वाढत वाढत ते आतां रोज सकाळच्या चहाला वाम-नरावांकडे येत असत. यांचा धंदा आपला बेताबातीच चालला होता. हे सात वेळां एल. एम. ॲंड एसच्या परीक्षेला बसले, तेव्हां आठव्या वर्षी यांच्या मागची सप्तग्रही सुटून हे डॉक्टर झाले. हे शरीरानें ठेंगू असून बरेच स्थूल असल्यामुळें दुरून फुटबॉलप्रमाणें वाटोळे दिसत. चेहेऱ्याचें वळणहि वाटोळेंच होतें. डोळेहि वाटोळे असून नाक म्हणजे ओंठाच्या जरावर लांबट सुपारी ठेवल्याप्रमाणें दिसत होतें. पोट बरेंच पुढें आलेलें होतें; परंतु पोषाख युरोपियन पद्धतीचा असल्यामुळें या पोटानें डॉक्टर-साहेबांना थोडी शोभाच आली होती. डॉक्टर 'जॉनबुल' प्रमाणें दिस-तात, असें कांहीं टवाळ म्हणत; पण त्यांत कांहीं विशेष तथ्य नाहीं. डॉक्टर साहेबांच्या डोक्याला टक्कल पडलेलें असून ते मिशाहि काढीत असत.

रोपांतील तत्त्वदर्शीत्वाची ही ट्रेडमार्क मुंबईंत प्रथम याच डॉक्टरसाहे-
ांनीं सुरू केली, असें कित्येकांचें म्हणणें आहे. कसेंहि असो, इतकें मात्र
रें कीं, व्यवस्थित पोशाकांत डॉक्तर असले म्हणजे ते कांहीं कुरूप
दसत नसत. उलट थोडे रुबाबदारच दिसत. ते मोठे वाक्पटु आणि
ानोदी होते आणि या दोन हत्यारांनीं ते आपला मार्ग वेळोवेळीं निष्कं-
क करून घेत असत. त्यांचें प्रत्येक वाक्य इंग्रजी मराठी शब्दांच्या भेस-
ळीचें असावयाचें, हे अगदीं ठरून गेलें होतें. निव्वळ मराठी बोलणें हें
ांना कमीपणाचें वाटे. डॉक्तरसाहेबांचा तो पोशाक व बोलण्याचाल-
ण्याची ती ऐट पाहून दिनकरला साहजिक थोडें आश्चर्य वाटलें. मोठ्या
कौतुकानें डॉक्तरसाहेबांच्या मूर्तीचे तो निरीक्षण करीत असतां घरांत काम
करणाऱ्या एका बाईनें मालतीच्या हातांत एक मोठी केटली आणून दिली
आणि मालती सर्वांच्या पेल्यांतून चहा ओतूं लागली. सर्व पेले भरून
ाल्यावर आपापला पेला उचलून प्रत्येकानें चहा पिण्यास आरंभ केला.
चहावर एक फुंक मारून कमलाबाई ह्मणाल्या, “ माले, ( मालती या
नांवाचें संक्षिप्त स्वरूप ) एक पेला चहा मास्तरांना दे. ”

मालती हळूच हंसून ह्मणाली, “ ते चहा घेत नाहींत. ”

हें ऐकून डॉ० निळकंठरावनीं चहाच्या बशीपासून आपलें तोंड वर
केलें आणि ते म्हणाले, “ आपण चहा घेत नाहीं, हें मोठें आश्चर्य म्हणा-
याचें ! वास्तविक चहा हे मोठें उपकारी पेय आहे. सर्दी, पडसें,
खोकला, थंडीताप यां रोगांचा जोर चहानें पुष्कळ कमी होतो. सकाळीं
उठून एक पेला चहा पिणें हें खरोखरच फायदेशीर आहे. श्रमानें आलेली
ग्लानि दूर करण्यास तर चहासारखें दुसरें पेय नाहीं. ”

दिनकर नम्रपणें ह्मणाला, “ आपलें म्हणणें कदाचित् खरें असेल; पण
मला चहा पिण्याचा अभ्यास नाहीं आणि औषध ह्मणून पिण्यासारखी माझी
प्रकृतीहि नाजुक नाही. ”

असल्या सयुक्तिक उत्तरांनीं शांत बसण्याइतका डॉक्तरसाहेबांचा स्वभाव
शिथिल नव्हता, ते ह्मणाले, “ आपली शरीर प्रकृति अशी निकोप अस-
यास फार चांगलें. पण चहापानामुळें असले रोग शरीरावर केव्हांहि हल्ला

करीत नाहींत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. रोग झाल्यावर औषध घेण्यापेक्षां तो होऊं न देणें हें सगळ्यांत उत्तम. ”

दिनकर ह्मणाला, “ भवितव्यतेबद्दल इतकी सावधगिरी बाळगण्याची माझी इच्छा नाहीं. याशिवायहि चहा न पिण्यास दुसरें एक कारण आहे. आमच्या घरांत चहा पिणे हें अव्यवहार्य समजलें जाते आणि यामुळें कोणीच चहा पीत नाहींत. तेव्हां जी गोष्ट मी त्यांच्या समक्ष करीत नाहीं, ती त्यांच्या मागें तरी कां करावी ? ”

डॉक्तर मोठ्यानें हंसून ह्मणाले, “ आपण पुराणमताभिमानी आहां. घरांत कोणी चहा घेत नाहीं, ह्मणून आपणहि न घेणें हे तुमच्यासारख्या सुशिक्षितास हास्यास्पद होय. ”

हे ऐकून दिनकरनेंहि आपल्या आवाजाची तार जरा चढविली. तो ह्मणाला, “ आमच्या घराण्याच्या ज्या उपयुक्त चालीरीती आहेत, त्या पाळणें हें मी कर्तव्य समजतो. एकच गोष्ट पुष्कळांच्या मते हास्यास्पदहि असते आणि अभिमानस्पदहि असते. ”

डॉक्तर म्हणाले, “ हा प्रश्न—मॉरलकरेज-नीति धैर्याचा आहे. जुन्या चाली रीति मोडण्यासाठीं नीति धैर्याची फार आवश्यकता आहे. ”

दिनकर ह्मणाला, “ या चालीरीति मोडण्यापेक्षां राखण्यालाच अधिक नीति धैर्याची गरज आहे. आमच्या सगळ्याच चालीरीति चांगल्या आहेत, असें मी म्हणत नाहीं; पण प्रत्येक बाबतींत कांहीं एक कारण नसतां पाश्चात्त्यांच्या पावलावर पाऊल ठेवणे समाजाच्या हितास कारणीभूत न होतां अहितासच कारण होईल. ”

दिनकरचे हे शब्द ऐकून वामनरावांना थोडें समाधान वाटल्यासारखें दिसलें. ते म्हणाले, “ मास्तरचेंच ह्मणणें खरे दिसतें. त्यांचें म्हणणें प्रामाणिक आणि सरळ आहे. त्यांचा हा अभिमान वृथा नाहीं.” असें ह्मणून वामनरावांनीं आपला रिकामा पेला खालीं ठेवला आणि ते डोक्याला साहेबी टोपी घालून बाहेर उद्योगासाठीं गाडींत बसून निघून गेले. दिनकरहि आपल्या शिष्यवर्गास घेऊन शिकविण्याच्या खोलींत गेला. मागें अर्थातच कमळाबाई, मालती आणि डॉक्तर असे तिघे राहिले. मालतीनें

सगळ्यांच्या मागून चहा पिण्यास आरंभ केल्यामुळें ती अजूनहि बशींत ओतलेल्या चहावर फुंकर मारीत होती. डॉक्तरनीं मात्र आपला चहा केव्हांच उदरस्थ केला होता. डॉक्तरच्या संवयी कमळाबाईंना माहीत असल्यामुळे त्या हंसत हंसत मालतीला ह्मणाल्या, " माले, केटलींत चहा असेल, तर तेवढा डॉक्तरांच्या पेल्यांत ओत बरें."

मालती कांहीं बोलली नाही. तिनें मुकाट्यानें केटलीतला सगळा चहा डॉक्तरांच्या पेल्यांत ओतला. त्या पेल्यांतल्या चहाचा एक घोट घेऊन डॉक्तर ह्मणाले, " थोडी साखर पाहिजे."

लागलीच कमळाबाईनीं 'माले, थोडी साखर त्यांच्या पेल्यांत घाल बरें' ह्मणून हुकूम फर्माविला. त्रासिक मुद्रा करून मालतीनें एक चमचा साखर डॉक्तरच्या पेल्यात घातली; पण ती घालतांना सहज थोडी साखर खालीं सांडली. त्याबरोबर डोळे वटारून कमळाबाई ह्मणाल्या, "माले, कोणतेंहि काम तुला टापटिपीनें कांहीं करतां येत नाहीं."

मालतीनें या बोलण्याकडे लक्षच दिलें नाही. तिनें आपली पुस्तकें घेतलीं आणि ती मास्तरच्या खोलींत जाऊन बसली. ती गेल्यावर आपली खुर्ची जरा कमळाबाईकडे सरकावून डॉक्तर ह्मणाले, " काल रात्रीं आपली तब्येत कशी काय होती? झोप चांगली लागली होती कीं, मधून मधून पोट दुखत होतें? "

कमळाबाईहि आपले दोन्ही दांत न दिसतील अशा बेतानें हंसून ह्मणाल्या, " काल प्रकृति बरी होती; पण आतां ही व्याधि जन्माचीच माझ्या मागें लागली आहे. ही पोटदुखी कायमची बरी होईल, असें कांहीं मला वाटत नाहीं."

" छे! छे! आपणास असें निराश होण्याचें कांहीं कारण नाही. माझें औषध आपण नियमितपणें घेऊन पथ्यपाण्याला जपत जा, ह्मणजे झालें."

" अहो, तेंच तर मोठें कठिण आहे. आमच्या घरांत सुधारकी डौल नुसता लोकांना दाखविण्यापुरता आहे, बाकी मला घरांत एकाद्या हमालासारखें काम करावें लागतें."

" तें मी दररोज पाहतोंच; पण आपण दररोज निदान एक तासभर

तरी सायंकाळच्या वेळीं समुद्राकडे फिरावयास जात जा. बरें, येतों. ” असें ह्मणून डॉक्तरांनींहि आपली साहेबी टोपी डोक्याला घालून व हातांतली छडी गरगर फिरवीत तेथून प्रयाण केलें.

इकडे दिनकरचें शिकविण्याचें काम अद्याप चाललेंच होतें. कोणतीहि गोष्ट मुलांना समजावून सांगण्यांत दिनकर फार तरबेज असल्यामुळें मुलांचा अभ्यास फार चांगल्या रीतीनें चालला होता. मदन, वसंत व मालती हीं दिनकर जवळ बसून अभ्यास करण्यांत मोठीं खुष असत. या खोलींत एक लांकडी मोठें टेबल असून त्याच्या भोंवतीं चार पांच खुर्च्या ठेवलेल्या होत्या. एका खुर्चीवर दिनकर बसे आणि त्याच्या समोर हे विद्यार्थी बसत. मुलांना शिकवून झाल्यावर आपली गणिताची चोपडी दिनकरपुढें ठेवून मालती ह्मणाली, “ मास्तर, मला हें गणित कांहीं सोडवितां येत नाहीं. यांत कोठें चुकतें तें मला सांगा. ” दिनकरनें ती चोपडी तपासली आणि तिची चूक शोधून काढून ती तिला समजावून दिली. तेव्हां मालती हंसत हंसत ह्मणाली, “ छे! अगदीं क्षुल्लक चूक होती. एवढें देखील मला कसें समजलें नाहीं कोण जाणे ? ”

दिनकर ह्मणाला, “ त्यांत मोठेंसें नवल तें काय? मोठाले प्रोफेसर देखील असल्या क्षुल्लक चुका पुष्कळ वेळां करतात. मजकडून देखील अशा अनेक चुका झाल्या आहेत. त्यांची जेव्हां मला आठवण होते, तेव्हां माझें मलाच हंसू येतें. ”

“ आपण एम. ए. च्या परीक्षेला कोणते विषय मुख्य असे घेतले आहेत ? ”

“ मी गणित, तत्त्वज्ञान आणि संस्कृत असे तीन विषय घेतले आहेत.”

“ आपण वुइलसनूपेक्षां एलफिन्स्टन कॉलेजांत जातां, तर फार चांगलें झालें असतें. ”

“ माझ्याहि मनांतून तसेंच होतें; पण माझ्या धाकट्या भावाला स्कालरशिप न मिळाल्यामुळें आह्मां दोघांनाहि वुइलसनमध्यें नांवें दाखल करावीं लागलीं.”

" तें मला बाबांनीं सांगितलें. या संबंधानें आपली ते फार प्रशंसा करतात. "

" वास्तविक यांत प्रशंसेसारखें कांहीं नाहीं. माझें कर्तव्य तेंच मी करीत आहें. "

" पण पुष्कळांना कर्तव्याची ओळख नसते. आपण आपल्या कर्तव्याला जागतां, ह्मणूनच आपली प्रशंसा करावयाची."

याच वेळीं भिंतीवर टांगलेल्या एका तजबिरीकडे दिनकरची नजर गेली. भोंवताली जाईच्या पानासह फुलांची वेलपत्ती असून मध्यभागीं चार चरणाचा एक मराठी श्लोक विणकामानें तयार केलेला या तजबिरींत होता. त्या तजबिरीकडे बोट करून दिनकर ह्मणाला, " हें विणकाम मोठें नामी झाले आहे. हा श्लोक आपण स्वतः रचलेला वाटतें ? "

दिनकरच्या या प्रश्नाला मालतीनें कांहींच उत्तर दिले नाहीं. ती किंचित् लाजून स्तब्ध उभी राहिली. तेव्हां वसंत ह्मणाला, " तो मालतीनेच रचलेला श्लोक. तिनें पुष्कळ कविता केल्या आहेत. त्यांतल्या कांहीं मासिक पुस्तकांतून प्रसिद्धहि झाल्या आहेत. "

दिनकर हंसून ह्मणाला, " हें मला माहितच नाहीं. मी काव्याचा मोठा भोक्ता आहे. आपल्या कविता मला पहावयाला मिळतील का ? "

मालती कांहीं न बोलतां आंत गेली आणि तिनें 'राष्ट्रदीप' नांवाच्या मासिक पुस्तकाचे कांहीं अंक आणून दिनकराच्या होतीं दिले. ती ह्मणाली, " माझ्या कवितेच्या खालीं मीं मालती ह्मणून सही केली आहे. माझ्या या कविता वाचून तुह्मी हंसाल मात्र. "

" हंसणें हें आनंदाचें दृश्य स्वरूप होय. अर्थात् आपल्या कविता वाचून मला आनंद वाटेल असें दिसतें. बरें, येतों. नऊ वाजून गेले. " असें ह्मणून दिनकरानें मालतीचा निरोप घेतला आणि तो आपल्या बिऱ्हाडीं निघून गेला.



## प्रकरण पांचवें.



वामनरावांच्या एकंदर कुटुंबाशीं दिनकरचा परिचय वाढत चालला होता. दिनकरचा एकंदर वर्तनक्रम व त्याचा सरळ स्वभाव पाहून वामनराव त्याच्यावर फार खुष होते व दिनकरलाहि तेथील शिकवणी विशेष पसंत पडली होती. प्रारंभीं प्रारंभीं दिनकर व मालती या उभयतांत स्वाभाविक सलज्ज भावांचा एक पडदा होता; परंतु परिचयानें हा सलज्ज भाव नाहींसा होऊन साधारण दोन अडीच महिन्यांच्या अवधींत मालती निःशंक मनाने दिनकरजवळ बसून स्वतःच्या विद्यार्जनाच्या बाबतींत त्याची सल्ला घेत असे. एका सोळा वर्षांच्या तरुण मुलीनें इतक्या जवळ बसून अभ्यास करावा, याबद्दल दिनकराला प्रथम थोडें चमत्कारिक वाटे; पण त्यामुळें त्याचे काव्यमय विचार जागृत होत व स्त्रियांनीं अशाच रीतीनें वागावयास पाहिजे, असें त्याला वाटे. प्रत्येक बाबतींत लाज बाळगून हें समाजाचे अर्धे अंग बाजूला रहात आल्यामुळें आपल्या समाजाचा फायदा न होतां नुकसानच होत आहे, अशी त्याची समजूत होती. मालतीचें एकंदर वर्तन त्याच्या काव्यमय विचारांस परिपोषक असल्यामुळें त्याला साहजिक मालतीचा अभिमान वाटत होता.

एके दिवशीं रोजच्याप्रमाणें दिनकर मुलांना शिकविण्यासाठीं गेला असतां दिवाणखान्यांत वामनराव एकटेच ‘ टाईम्स ’ वर्तमानपत्र वाचीत बसलेले त्याला दिसले. त्याला पाहतांच वामनराव म्हणाले, “ बसा मास्तर, आज मुलें बाहेर गेलीं आहेत. तेव्हां संध्याकाळीं या अथवा उद्यां आलां तरी चालेल. ” यावर दिनकर कांहीं ह्मणाला नाहीं. तो ‘ बरें ’ ह्मणून घरीं आला आणि संध्याकाळीं मुलांना शिकविण्यासाठीं गेला. दिनकर दिवाणखान्यांत जातो तों रोजच्यापेक्षां निराळाच प्रकार त्याच्या दृष्टीस पडला. दिवाणखान्यांत घरचीच मंडळी व्यवस्थित बसलेली असून वामनरावांच्या सौभाग्यवती कमलाबाई बाजाची पेटी वाजवीत असून मालती गात होती. या प्रसंगासहि डॉक्तरसाहेबांची स्वारी हजर होती, हें निराळें

सांगावयाला नको. दिनकरकडे प्रथम वामनरावांची नजर गेली आणि त्यांनीं दिनकरला एका खुर्चीवर बसण्याविषयीं सुचविलें. थोड्याच वेळांत मालतीचें तें गाणें ऐकून दिनकर अगदीं तल्लीन होऊन गेला. तिचा तो गोड आवाज आणि म्हणण्याची पद्धत यांमुळे दिनकरला मोठा आनंद झाला. विशेषतः तें गाणें ईश्वराची करुणा भाकणारें असल्यामुळें दिनकरचें चित्त गहिंवरून आलें होतें. आणखी दोन अशींच सुंदर पद्यें तिनें ह्मटलीं. मालती इतकें उत्कृष्ट गात असेल, अशी दिनकरची कल्पनाच नव्हती. कांहीं शाळेंत जाणाऱ्या मुलींचीं गाणीं त्यानें ऐकलीं होतीं; पण मालतीच्या गाण्यांत गायन कलेचा बराच अंश असल्यामुळें तें गाणें अर्थातच डौलदार वाटत होतें. गाणें लवकरच संपलें. पेटी बंद करीत असतां कमलाबाईची नजर दिनकरवर गेली. त्याबरोबर ती हंसत हंसत म्हणाली, " आं ! मास्तर केव्हां आले? मास्तर, आज सकाळीं येऊन तुह्मांला परत जावें लागलें ? "

त्या गाण्याच्या विचारांत मग्न असणाऱ्या दिनकरला कमलाबाईचा हा प्रश्न ऐकून नक्षत्र लोकांतून पृथ्वीवर आपटल्याप्रमाणें झालें. तो अडखळत ह्मणाला, " मलाहि सकाळीं रजा पाहिजेच होती."

वामनराव म्हणाले " कां ? "

सकाळीं बरीच सर्दी झाली होती आणि त्यामुळें डोकेंहि जड पडलें होतें. "

त्याबरोबर डॉक्तर म्हणाले, " ह्मणूनच मी ह्मणतों, आपण चहा पिण्याचा नियम ठेवा. अलीकडच्या दिवसांत चहा हा डॉक्तरचें अर्धें काम करतो. "

दिनकर हंसत हंसत ह्मणाला, " डॉक्तरांना पैसे मिळवून देण्याचें कीं, रोग्याचे पैसे वांचविण्याचें ? "

दिनकरचा हा प्रश्न ऐकून अर्थातच सगळ्यांना हंसू आलें. डॉक्तरचा चेहरा मात्र थोडा लाल झाला. वामनराव दिनकरला म्हणाले, " आतां तर तुमची प्रकृति बरी आहे ना ? "

" होय, आतां बरी आहे."

डॉक्टर म्हणाले, " तरी पण आपण आतां थोडा चहा घ्या. त्यापासून तुम्हांस आणखीहि पुष्कळ बरें वाटेल." डॉक्टर असें ह्मणतात तोंच चहाच्या टेबलावर चहाची सगळी तयारी झाली. त्या वेळीं कमलाबाई स्वतः चहाचे पेले भरीत होत्या. पेले भरीत असतां त्या ह्मणाल्या, "प्रकृतीसाठीं औषध ह्मणून चहा घेण्यास कांहीं हरकत नाहीं."

वामनराव म्हणाले, " पण आमच्या येथें चहा घेणें त्यांना पसंत नसेल, तर आग्रह करणें हा अन्याय होय."

दिनकर चटकन ह्मणाला, " छेः ! छेः ! चहा घेण्यास तशी अडचण कांहींच नाहीं. इतक्या आकुंचित वृत्तीचा मी नाहीं."

हें ऐकून मालतीला आनंद झाल्यासारखा दिसला. ती हंसत हंसत ह्मणाली, " तर मग आज एक पेला घ्याच." असें ह्मणून तिनें स्वतः एका पेल्यांत चहा ओतून व त्यांत बेतशीर दूध-साखर घालून तो पेला दिनकराच्या पुढे केला. या वेळीं दिनकरचा सगळा विवेक जणूं लुप्त झाला आणि त्यानें हात पुढे करून तो पेला घेतला. दिनकरनें चहाचा एक घोट घेतल्यावर मालती ह्मणाली, " आणखी साखर पाहिजे ? "

दिनकर हळूच हंसून ह्मणाला, " नको."

डॉक्टरनीं मात्र जवळ जवळ अर्धा पेला उदरस्थ केल्यावर बोलण्यास सुरुवात केली. ते ह्मणाले, " मास्तर, मालतीने आज तुह्मांला चहाची दीक्षा दिली."

वामनराव हंसत हंसत म्हणाले, " त्यांनी तो चहा आराम वाटण्यासाठीं घेतला. यांत दीक्षा ती कसली ? "

डॉक्टर म्हणाले, " अथवा 'दीक्षा' ह्मणून म्हटलें, तरी मास्तरची कांहीं त्याला हरकत नाहीं. हळूहळू अनेक गोष्टींची दीक्षा मालतीकडून त्यांना मिळणार आहे."

डॉक्टरचे हे शब्द ऐकून सर्वांना हंसू आलें. दिनकरचा आणि मालतीचा चेहरा मात्र लाल झाला. मालतीचा चेहरा लज्जेनें लाल झाला होता आणि दिनकरचा रागानें लाल झाला होता, एवढाच मात्र फरक. दिनकरचा तो

भाव ओळखून डॉक्तर म्हणाले, " मास्तर, चहा गोड आहेना ? कीं, आणखी साखर पाहिजे ? "

दिनकर ह्मणाला, " बेतशीर आहे असें वाटतें. माझ्या रुचीप्रमाणें हें पेय मोठें लज्जतदार असावें, असें कांहीं मला वाटत नाहीं. थोडें तुरट, थोडें तिखट आणि किंचित् कडवट असें हें पेय आहे ! मग या पेयावर लोकांच्या एवढ्या उड्या कां ? औषध ह्मणून लोकांनीं या पेयाचें व्यसन मागें लावून घेतलें असेल, तर वैद्यशास्त्राच्या दृष्टीनेंहि ही मोठी चूकच ह्मणावयाची. कोणत्याहि औषधाची सवय करून घेऊं नये, असा वैद्यशास्त्राचा नियम आहे. "

डॉक्तर थोडेसे अभिमानानें म्हणाले, " मास्तर, हा विषय ' मेडिकल सायन्स ' चा आहे या बाबतींत मत देण्याचा अधिकार आपणास नाहीं. "

दिनकर ह्मणाला, " मी हें माझें मत आपणास कळविलें नाहीं; हेंहि एका सुप्रसिद्ध डॉक्तरचेंच मत आहे. चहा हें व्यसन होऊं नये, हें मात्र माझें मत आहे. आमचा देश अगोदरच दरिद्री. आधीच अनेक गरजा आह्मास भागवितां येत नाहीत, त्यात आणखी चहासारखीं व्यसनें मागें लावून घेणें म्हणजे दारिद्र्याच्या रोगानें पीडलेल्या हिंदुस्थानानें कुपथ्य करण्यासारखें आहे. "

योग्य उत्तर न सुचल्यामुळे डॉक्तर जरा त्रासून म्हणाले, "जेवण हेंहि एक व्यसनच आहे. हिंदुस्थानासारख्या दरिद्री देशानें हेंहि व्यसन सोडावें, असें आपण म्हणाल ? "

या प्रश्नाचें उत्तर दिनकरला द्यावें लागलें नाहीं. तें परभारें मालतीनेंच दिलें. ती ह्मणाली, " पण व्यसनाव्यसनांत आवश्यक अनावश्यक हा भेद आहेच की नाहीं ? चहा सोडला, तर कोणाचेंहि अडावयाचें नाहीं; पण तसें कांहीं जेवण्याचें नाहीं. पूर्वीं आमच्या देशांत चहा मुळींच नव्हता, तेव्हां कोठें कोणाचें अडलें होतें ? चहाचें एक नसतें खूळ आम्हीं परक्यांपासून उसनें घेतलें आहे. "

डॉक्तर म्हणाले, " पण यापासून आमच्या देशाचा फायदा किती

झाला आहे ? लक्षावधि गोरगरीब मजूरांना चहाच्या मळ्यांत कामकाज मिळून साऱ्यांना पोटभर अन्न मिळतें. ”

दिनकर किंचित् उंच स्वरानें ह्मणाला, “ हा केवळ वस्तुस्थितीचा विपर्यास होय. आमच्या मजुरांना अन्न मिळावे ह्मणून चहाचे मळेवाले हा धंदा करीत नसून स्वतःचा खिसा गरम करावा म्हणून करतात. अर्थात् हा पैसा सात समुद्रांच्या पलीकडे जाऊन पडतो, हें डॉक्टरसाहेबांना समजावयास पाहिजे होतें. बरें, मजुरांना तरी मळ्यांत चांगल्या रीतीनें वागविण्यांत येते का ? मळ्यांत मजुरांचा जो राक्षसी छळ होतो, त्याचा विचार केला तर आम्ही चहा म्हणजे त्या मजुरांच्या शरीरांतलें रक्त पितो, असेंच नव्हे का ? दयाशीलतेबद्दल ज्या हिंदुधर्मियांची प्रख्याति, ते आज अशा रीतीनें आपल्याच बांधवांच्या शरीरांतलें रक्त पिण्यासाठीं उत्सुक व्हावेत, हा केवळ काळाचा महिमा ! ”

दिनकरचें हें बोलणें संपल्यावर त्या दिवाणखान्यांत एक मिनीटभर विलक्षण स्तब्धता पसरली होती. नंतर वामनराव म्हणाले, “ डॉक्टर, तुमच्या ह्मणण्यापेक्षां मास्तरचेंच म्हणणें सयुक्तिक दिसतें. ”

डॉक्टर कांहीं बोलले नाहींत. त्यांनीं खिशांतून एक चिरूट काढला आणि तो पेटवून धुराचे लोट सोडण्यास आरंभ केला. दिनकरहि कांहीं न बोलतां मुलांना घेऊन शिकविण्याच्या खोलींत गेला. मुलांचें शिकणें संपल्यावर मालतीने एक चोपडी दिनकरच्या हातांत दिली. ती म्हणाली, “ हे मीं मराठीचें इंग्रजींत भाषांतर केलें आहे, तें कोठें कोठें चुकलें आहे, तें मला दाखवून द्या. ”

त्या भाषांतरावर नजर टाकून दिनकर म्हणाला, “ मी हें बरोबर घेऊन जातों आणि त्यांतल्या चुका उद्यां तुम्हांला समजावून सांगेन. आजचें तुमचे गाणें मला खरोखर फार आवडलें. त्यांतले कांहीं शब्द अजूनहि माझ्या कानांत घुमत आहेत. ”

मालती हंसून म्हणाली, “ आणि आपलें तें मघांचें चहाचें बोलणें जशाचें तसेंच अजून माझ्या कानांत प्रतिध्वनित होत आहे. ”

“ पण तुम्हीं तर मला आज चहापिण्याची दीक्षा दिली. ”

" छे ! उलट मी आपलीच मतानुयायी झाल्यें आहें. आतां यापुढें मीं चहा न पिण्याचा निश्चय केला आहे."

दिनकर यावर कांहीं बोलला नाहीं. हंसत हंसत त्यानें मालतीची चोपडी खिशांत घातली आणि हळू हळू तो आपल्या बिऱ्हाडीं आला. रात्रींचें जेवण झाल्यावर थोडा वेळ तो अभ्यासहि करीत होता; पण आज त्याचें मन स्वस्थ नसल्यामुळें त्यानें आपली पुस्तकें ठेवलीं आणि तो आंथरूणावर स्वस्थ जाऊन पडला त्यानें आज चहापान केल्यामुळें त्याला अगदीं चमत्कारिक वाटत होते. चहा पिणें ह्मणजे अगदीं क्षुल्लक बाब होती; पण दिनकरला त्याचेंच आश्चर्य वाटत होतें. असल्या क्षुल्लक बाबीत देखील आपणास थोडेंसे आत्मसयमन करतां येऊं नये, हेंच त्याच्या मनाला खात होते. हे आत्मसंयमनहि त्यास करतां आलें असतें; पण त्याच्या खंबीर मनावर चहाच्या आग्रहाचा आघात मालतीनें केल्यामुळें त्याची स्थिति चमत्कारिक झाली आणि तो चटकन् ' चहा घेतो ' म्हणून म्हणाला. याच नव्या विचारक्रांतीनें दिनकराच्या चित्तावर विलक्षण खळबळ उडाली होती. त्याला डॉक्तरांनी किंवा दुसऱ्या कोणीं आग्रह केला असता, तर त्यानें खचित् नाहीं म्हणून सांगितले असतें; परंतु मालतीला ' नाहीं ' म्हणून सांगणें त्याला रुचलें नाहीं. कां बरें ? दिनकरहि याच प्रश्नाचा आंथरुणावर पडून विचार करीत होता. मालतीनें ' एक पेला चहा घ्याच ' असें म्हटल्यावर अंतःकरणांत कोणती शक्ति उत्पन्न झाली कीं, जिच्यामुळें निग्रह कायम ठेवणें अपरिहार्य व्हावे ? मालतीच्या शब्दांत कांहींतरी जादू असावी, असें प्रथम दिनकरच्या मनांत आलें; पण त्यामागून ' आपण विकारवश तर झालों नाहींना ? ' हाहि विचार दिनकरच्या मनांत उद्भवला. मालतीच्या त्या शब्दांत नुसता आग्रहच होता, कीं आणखी कांहीं होतें, तें आतां दिनकर शोधूं लागला. मनाचें कार्य मन करूं लागलें. त्याला आशेच्या वाटेला तुम्हीं लावलें, तर मनोराज्याचें साम्राज्य तुमच्यापुढे तें उभें करील आणि विरुद्ध दिशेला लावल्यास तेंच मन तुमच्यापुढें निराशेची खोल दरी उत्पन्न करील. मनाचा हा धर्मच आहे. मालतीचें मन विकारवश झालें होतें कीं नाहीं, तें ईश्वरास माहीत; पण आतां दिनकरचें मनमात्र विकारवश झालें

आणि त्या स्थितींत तो लक्ष्मीची आणि मालतीची तुलना करूं लागला. आतां त्याचे ते काव्यमय विचार जागृत झाले आणि त्या भरांत त्यानें नैसर्गीक सुदर दिसणाऱ्या लक्ष्मीची अवहेलना करून केवळ अभिनयामुळें त्याच्या डोळ्यांत भरलेल्या मालतीला मस्तकावर धारण करून तो नाचूं लागला. तें गाणे, तें पेटी वाजविणे, त्या पियानोच्या मजूळ गती वाजविणें, ते मुरडून पाहणे, तें हंसत हंसत बोलणें, तें चहाच्या वेळचें ठुमकत ठुमकत चालणे, त्या सुंदर कविता करणें, तें निर्दोश इंग्रजी लिहिणें, छे! एक कीं दोन! हजार हजार गुणांनीं अलकृत अशी मालती त्याला आतां दिसूं लागली. आणि लक्ष्मी? शिव शिव! ती तर गृहकृत्यांतल्या हमालीलाच सर्वस्व मानीत असल्याचें त्याला दिसू लागलें. अशा प्रकारच्या विचारांच्या श्रमाने त्याला मधून मधून झोंप येई; पण त्या झोपेंत देखील स्वप्नसृष्टि डोळ्यापुढे उभी राहून तीत मालती जिकडे तिकडे सौदामिनीप्रमाणें चमकतांना त्याला दिसे.

मालती जणू काय एका उद्यानांत बसली आहे. दिनकरहि त्याच बागेत हिंडत होता. इतक्यांत त्याची नजर मालतीकडे गेली. मालतीचीहि त्याच्यावर गेली. दोघांनींहि स्मित केलें. एक सुदर गुलाबाचें फूल तोडून घेऊन दिनकर मालतीकडे गेला आणि तें त्याने मालतीला दिलें. मालतीनेंहि मोठ्या आनंदानें त्या फुलाचा स्वीकार केला आणि त्याचा वास घेऊन ते फूल स्वतः डोक्यांत ती खोवू लागली. दिनकराने ते फूल आपल्या हातांत घेतलें आणि मालतीच्या अगदीं अगासरसा बसून ते फूल तिच्या केशकलापांत तो खोवू लागला. इतक्यांत गुलाबाच्या फुलाच्या देठाला असलेला कांटा दिनकरच्या हाताला बोचला आणि त्यामुळें फूल हातांतून गळून जमिनीवर पडलें.

याच वेळीं दिनकर या स्वप्नसृष्टींतून जागा झाला. समोर बाग नाहीं, मालती नाहीं आणि तें गुलाबाचें फूलहि नाही. हातांत असलेल्या पांचसहा कागदांना जोडलेली टांचणी मात्र त्याच्या दृष्टीस पडली आणि ती टांचणी बोचल्यामुळेच बिचाऱ्याची ही स्वप्नसृष्टि नाहींशी झाली होती. स्वप्नांत दिसलेल्या गोष्टींचा विचार आतां दिनकर करूं लागला. मालतींत

आणि आपणांत उत्पन्न झालेलें प्रेम हेंच गुलाबाचें फूल होय. मीं जितक्या उत्सुकतेनें तें तोडलें; तितक्याच उत्सुकतेनें ते मालतीनें घेतलें; पण कांटा बोचला आणि त्यामुळें सगळी घाण झाली. हा कांटा कोण बरें असावा? हां! ही लक्ष्मी! मी आणि मालती या दोघांचींहि प्रेममय अंतःकरणें ही लक्ष्मी कांट्याच्या रूपानें विद्ध करणार असें दिसतें.

या असल्या काव्यमय विचारामुळें दिनकर नभोमंडळांत अधिकाधिक उंच चालला होता. परंतु इतक्यांत त्याचा विवेक जागृत झाला आणि त्यामुळे त्याचा सगळा मनोदुर्ग ढांसळला. प्रत्यक्ष स्थिति त्याच्या डोळ्यापुढे उभी राहिली. आणि त्यामुळे मालतीसंबधानें आपण भलतेच विचार मनांत आणले असें वाटून त्याला थोडा अनुताप झाला. आणखी दोन महिने निघून गेले. या दोन महिन्यांत मालतीचा आणि त्याचा परिचय अधिकच वाढला. सुटीच्या दिवशीं मदन, वसंत आणि मालती या तिघांना घरोबर घेऊन दिनकर शहराच्या बाहेर लांबवर हिंडावयाला जाऊं लागला आणि बाहेरच्या मोकळ्या हवेंत दिनकर आणि मालती या दोघांची मनेंहि अधिक स्वैरसंचार करूं लागली. हळूहळू वामनरावाच्या सर्व कुटुंबाशीं दिनकरचा दाट परिचय होऊं लागला आणि क्वचित प्रसंगीं वामनरावांच्या घरचें भोजनाचें आमंत्रणहि दिनकराला स्वीकारावें लागे. प्रथम वामनराव या शिकवणीबद्दल दिनकरला दहा रुपये पगार देत असत; पण दिनकरची शिकवण्याची पद्धत वगैरे पाहून ते त्याला पंधरा रुपये देऊं लागले. वामन-रावांच्या या वागण्यांत कांहीं गुढार्थ होता कीं काय ते ईश्वरास माहीत; पण दिनकर मात्र त्यांच्या स्नेहमय वागण्याचा भलताच अर्थ मनांत आणून केव्हां केव्हां निष्कारण विकारवश होत असे.

युनव्हरसिटीच्या परीक्षांना लवकरच आरंभ झाला. प्रथम दिवाकराची एफ्. ए. ची परीक्षा झाली. नंतर लवकरच दिनकरची एम. एची परीक्षा झाली. दिनकरचे स्नेहीहि परीक्षा देऊन लवकरच मोकळे झाले. अशा रीतीनें या सर्व विद्यार्थ्यांना परीक्षेनंतरची रजा मिळाल्यावर त्या सर्वांनीं आपापल्या गांवीं जाण्याचें ठरविलें. त्याप्रमाणे गांवीं जाण्याच्या उद्योगांत असतां दिनकर रोजच्याप्रमाणें सकाळीं वामनरावांच्या घरीं दाखल झाला.

दिवाणखान्यांत जाऊन पाहतो तों आंत कोणीहि नाहीं. मालती मात्र पलीकडच्या खोलींत एक पुस्तक वाचीत बसली होती. दिनकरला पाहतांच ती घाईनें उठली आणि हंसत हंसतच दिवाणखान्यांत आली. मालतीचें तें मधुरस्मित पाहून दिनकरलाहि साहजिक हंसूं आलें. तो ह्मणाला, " मुले कोठें आहेत ? "

मालती नेहमींप्रमाणे मुरडत मुरडत ह्मणाली, " अगोदर खाली बसा, मग सांगतें. आज आमच्या मावशीचा ह्मणजे हल्लींच्या आईच्या बहीणीचा पुनर्विवाह आहे. त्या समारंभासाठीं सगळी मंडळी सकाळीसच गेली आहे. "

एका खुर्चीवर बसून दिनकर ह्मणाला, " मग तुम्ही नाहीं गेला ? "

आंत जातां जातां 'कोणी तरी घरीं पाहिजेना' असें ह्मणून मालती आंत गेली आणि चारदोन मिनिटांच्या आंत एका हातांत दोन मोतिचुराचे लाडू ठेवलेले तबक आणि दुसऱ्या हातांत गरम दुधानें भरलेली वाटी घेऊन बाहेर आली. आणलेले दिनकरपुढे ठेवून ह्मणाली, " घ्या, थोडा फराळ करा. "

दिनकर हंसत हंसत ह्मणाला, " हे चहाच्या ऐवजी की काय ? "

किंचित् लाजून मालती ह्मणाली, " होय. मी त्या दिवसापासून चहा घेत नाहीं. सकाळीं दूध घेतें आणि दुपारी फराळ करतें. त्यामुळें माझा अपचनाचा विकारहि दूर झाला आहे. "

दिनकर किंचित् गंभीर स्वरानें ह्मणाला, " चहापानासंबंधानें केलेली टीका पुष्कळांना चेष्टेप्रमाणेंच वाटते. कदाचित् चहाचें पेय चांगलें, असें धरून चाललें, तरी तें पिण्याची आज आमची योग्यता नाहीं, एवढें तरी आह्मीं लक्षांत ठेवावयाला पाहिजे. एका अनावश्यक पेयासाठीं देशांतली लक्षावधी एकर सुपीक जमीन गुंतली जावी, हे देशाचें केवढे दुर्भाग्य ! आमच्या देशाचें कल्याण साधण्याचे कांहीं कांहीं अगदीं सोपे मार्ग आमच्या हातीं आहेत; पण एक मनाचा निग्रह नसल्यामुळें आह्मीच आमच्या मातृभूमीचे घातक बनलों आहों. "

दिनकरचे हे विचार ऐकून मालती कांहीं वेळ शून्य दृष्टीनें जमिनीकडे

पहात होती. या असल्या विचारावरून दिनकरच्या एकंदर तेजस्वी चारित्र्याचें चित्रच जणूं ती पहात आहे, असें तिला वाटलें. दररोज असा कांहीं तरी प्रकार घडत होता आणि त्यामुळे तिच्या मनांत दिनकर-विषयीं अधिकाधिक आदर वाढत चालला होता. समोरचें फराळाचें संप-ल्यावर हात धुऊन दिनकर ह्मणाला, " वसंत आणि मदन दोघेहि नाहींत तेव्हां आज मला सुट्टी ह्मणावयाची ? "

मालती हसून ह्मणाली, " कां, सुट्टी कां ? मला शिकवा."

" तुह्मांला काय शिकविणार! माझ्या जवळ असलेलें बहुतेक ज्ञान तर तुह्मीं घेतलेंत ! "

" छे ! मला वाटतें तें संपादन करण्याला आतांशीं आरंभ झाला ! "

" माझी इतकी योग्यता आहे, असें मला वाटत नाही. पुस्तकी ज्ञाना-च्या दृष्टीनें मला कदाचित् अधिक माहीत असेल; पण बुद्धीचें विशालत्व ज्याला ह्मणतात, तें तुमच्या ठिकाणीं विपुल आहे आणि याच गुणामुळें तुह्मी महिला समाजांत विशेष पुढें याल अशी माझी समजूत आहे."

मालतीला ही स्तुति कितपत आवडली कोण जाणे; पण यामुळें शालीनतेचीं बरींच चिन्हें तिच्या मुखावर उमटलेलीं दिसलीं. ती थोडा वेळ स्तब्ध राहून ह्मणाली, " आतां सुट्टीत आपण घरीं जाणार असाल?"

" होय. उद्यांच्या रात्रीच्या गाडीनें जाण्याचें ठरविलें आहे."

" तर मग आपल्या पगाराचे रुपये आजच दिले पाहिजेत ? "

" एवढी घाई नाहीं. मी उद्यां येऊन घेऊन जाईन."

" जाते वेळीं आपल्या घरचा पत्ता देऊन जा."

" कां ? "

" कारणपरत्वें पत्र पाठवावेसें वाटलें तर."

" आणि पाठवावेसें वाटलें नाहीं तर ? "

" तर मग पाठविणार नाहीं."

" आणि पाठविण्यास कोणतें कारण पाहिजे ? "

मालती लाजली. या प्रश्नाचें उत्तर तिला देतां येईना. ती ह्मणाली,

" सहज मनांत आलें, तर पाठवीन पत्र. नाहीं तर पाठविणारहि नाहीं. आपण पाठवाल का ? "

" कारण पडल्यास मीहि पाठवीन. बरें, येतों आतां. "

" जाते वेळीं आपण आपल्या सौभाग्यवतीसाठीं कांहीं घेऊन जाणार असाल ? "

हा प्रश्न ऐकून दिनकरच्या चेहऱ्यावर खिन्नतेची छाया पसरली. तो ह्मणाला, " तिच्यासाठीं काय घेऊन जाणार ! खेळणींबिळणीं ? "

" खेळणीं कां ? चांगलीं चांगलीं पुस्तकें घेऊन जा. "

" पण वाचतां येईल तर ना ! "

" वाचतां येत नसेल, तर आपण शिकवा. "

दिनकरचा चेहरा अधिक खिन्न झाला. 'ते आतां घरीं गेल्यावर पाहीन' असें ह्मणून त्यानें मालतीचा निरोप घेतला. मालतीनें अर्थातच त्याला हंसत मुखानें निरोप दिला. ती दरवाजापर्यंत त्याला पोंहोंचवायाला देखील गेली. दिनकरनेंहि हळूच मागें वळून हंसून तिच्याकडे पाहिलें आणि तो आपल्या बिऱ्हाडीं निघून गेला.

## प्रकरण सहावें.



दिनकर, दिवाकर, रामभाऊ, पांडुरंग व विश्वनाथ असे हे पांच विद्यार्थी रात्रीं नवाच्या मेलनें उमरावतीस जाण्यास निघाले. या गाडीला गर्दी फार होत असल्यामुळें हे पांचहिजण स्टेशनावर लवकर येऊन त्यांनीं एकाच डब्यांत चांगली जागा मिळविली होती; तथापि गाडी स्टेशनवरून निघेपर्यंत डब्यांत बरीच गर्दी झाली आणि त्यामुळें गाडींत झोंप घेण्याचें मनोराज्य सगळ्यांचेंच ढांसळलें. निरनिराळ्या स्वभावाचे अनेक उतारू एकाच डब्यांत कोंबले गेल्यामुळें या आमच्या विद्यार्थ्यांना आपण या चालत्या रंगभूमीवर एक नाटकच पहात आहों, असें वाटलें आणि त्यामुळें तशा स्थितींतहि त्यांची पुष्कळ करमणूक झाली. एक तिरशिंगराव डब्यांत

शिरले आणि कोठेंहि चांगलीशी जागा नाहीं, असें पाहून मोठ्यानें ओरडून एका गृहस्थाला ह्मणाले, " अहो, तुमचें सामान खालीं ठेवा. बाकावर सामान ठेवण्याचा हुकूम नाहीं. बाक बसण्यासाठीं आहेत." हें ऐकून पांडुरंग हंसला आणि ह्मणाला, " बाक बसण्यासाठीं आहेत हें खरें; पण आमच्या मास्तरांनीं आह्मांला अनेक वेळां बाकावर उभें देखील केलें आहे." हे ऐकून अर्थातच डब्यांतली सगळी मंडळी हंसली. तितक्यांत एक पारशीशेट आंत शिरले आणि डब्यांतल्या सगळ्या मंडळींवर नजर टाकून कांबळे पांघरलेल्या एका मराठ्याला ह्मणाले, " सरक, जरा पलीकडे सरक, शाला ये लोकबी आतां मेलमधीं बसू लागला." तो मराठाहि कांहीं कमी वस्ताद नव्हता. तो ह्मणाला, " सरकायासनी जागा हय कुठं ? अन् तुम्हीं तिकिटाचे पैसे दिलेत अन् आह्मीं काय चिचुकं दिलं व्हय ? ह्मणे सरक सरक. अश्री जसा गवरनर लागून गेलाय. एवढी मिजास करायची, तर साहेबाच्या डब्यामंधी जाऊन बसावं." पाटीलबोवांचे हे शब्द ऐकून पारशी शेट जरा नरम आले आणि बाकाच्या एका कोपऱ्यावर कसे तरी बसले. इतक्यांत गाडी सुटली आणि आतां डब्यांत अधिक गर्दी होत नाहीं, अशी प्रत्येकाला खात्री वाटूं लागली. इतका वेळ प्रत्येकजण आपापलें बोजकें सभाळण्याच्या व सामानसुमान व्यवस्थित ठेवण्याच्याच गडबडींत होता; पण आतां तो उद्योग संपल्यामुळे एकमेकांचें निरीक्षण करण्यास व गप्पा मारण्यास सुरुवात झाली. ' आपणास कोठे जावयाचें ? आपण राहणारे कोठले ? आपण काय उद्योग करीत असतां ? ' असल्या प्रश्नांनीं प्रस्तावना करून गाडींतल्या गाडींत अगदीं दाट ओळख करून घेण्याचा पुष्कळ प्रवाशांचा क्रम असतो. कित्येक ही ओळख विडीनें अथवा पानतंबाखूच्या मदतीनेंहि करून घेतात. त्याप्रमाणें कित्येक प्रवाशांनीं या आमच्या पांच विद्यार्थ्यांचीहि ओळख करून घेण्याचा प्रयत्न केला. हे पांचहि तरुण मोकळ्या मनाचे, आनंदी वृत्तीचे आणि निर्व्यसनी आहेत, हें पाहून त्यांच्यासंबंधाने पुष्कळांच्या मनांत आदर उत्पन्न झाला. विशेषतः चारदोन मराठे गृहस्थाबरोबरहि उच्चनीच भाव मनांत न आणता त्यांच्याशीं ते सलगीनें वागत आहेत, हें पाहून पुष्कळांना त्यांचें कौतुक

वाटले. पण याच डब्यांत कांहीं अहंमन्य गृहस्थ होते; त्यांना मात्र या विद्यार्थ्यांचे वर्तन आवडलें नाहीं. दुसऱ्यांनीं आपणाशीं हांजीखोरपणाचें वर्तन केलें ह्मणजे ते ज्यांना आवडतें अशा प्रकृतीचे ते दोन तीन गृहस्थ गाडींत त्या विद्यार्थ्यांचेच स्तोम माजत आहे, असें पाहून निष्कारण त्या विद्यार्थ्यांचा द्वेष करू लागले. जरीच्या झिरमिळ्याची लाल रंगाची पगडी घातलेले व अंगावर रेशीमकांठी उपरणें पांघरलेले एक गृहस्थ हातावर तंबाकु चोळीत असतां पांडुरंगाला ह्मणाले, "अहो, आतां तुमची ही बडबड बंद करा. गाडींतल्या लोकांना जरा स्वस्थपणें बसूं द्या."

पांडुरंग ह्मणाला, "होय महाराज, माझी देखील हीच इच्छा आहे; पण इतक्या या लोकांच्या तोंडाला कुलुपें घालावींत कशी, याचाच मला विचार पडला आहे."

रामभाऊ ह्मणाला, "अरे त्यांत विचार कसला ? 'अळीमिळी जीभ काळी, जो आधीं बोलेल × ×' अशी सगळ्यांना शपथ घाल ह्मणजे झालें."

हें ऐकून डब्यांतली सगळीच मंडळी हंसली. ते मघाचे पाटीलबोवा ह्मणाले, "आपल्या बोलण्याची रावसाहेबांना कटकट होते आणि त्यांना आपली गर्दीहि सहन होत नाही. त्यांच्या बाकावर जर चार इसम कमी बसले असते, तर त्यांना निजायला तरी सांपडलें असतें. पण या लोकांना दुसऱ्यांचा मानमरातब कसा ठेवतात; ते बिलकुल माहीत नाहीं."

रावसाहेब अर्थातच चिडले. ते ह्मणाले, "पाटील, तुह्मी अशिक्षित आहां. सभ्यपणा कशाला ह्मणतात, हें तुह्मांला माहीत तरी आहे ?"

विश्वनाथ हळूच ह्मणाला, "गरीब बिचारे दहा गांवचे दहा इसम अशा निमित्तानें एकत्र झाले असतां त्यांचा तिरस्कार करणें यालाच सभ्य-पणा ह्मणतात."

पाटीलबोवांनाहि जरा राग आला होता. ते विश्वनाथाला ह्मणाले, "तुह्मी गप्प बसा. तटा त्यांचा आणि माझा आहे. कांहो, रावसाहेब, सभ्यपणा कशाला म्हणतात, तें तुह्मी तरी सांगा. पाटलानें अंगावर कांबळें घेतलें कीं, त्याचा सभ्यपणा गेला आणि तुह्मी झिरमिळ्याची पगडी घातली, ह्मणजे तुम्ही सभ्य झालां ? पण राव, हें कांहीं माणसाचें मोठेपण नाहीं.

माणसाचें मोठेंपण माणुसकी. अहो, आतां गर्दी तर झालीच आहे. आतां हंसून बोलून रात्र काढावी हा शहाणपणा कीं, आजच एवढ्या लोकांनीं प्रवास करावयाचें काय अडलें होतें, ह्मणून लोकावर रुसणें हा शहाणपणा ? त्या पोरांनीं तर कसा सगळ्यांना चटका लावला. आणि तुह्मी ह्मणतां गडबड बंद करा. ” नंतर या विद्यार्थ्यांकडे वळून पाटीलबोवा ह्मणाले, “ महाराज, चालूं द्या आपल्या गप्पागोष्टी. अहो, चौघांचे चार शब्द कानावर पडायला तरी पुण्याई लागते. रावसाहेबांना कटकट झाली, तर ते दुसऱ्या डब्यांत जाऊन बसतील. ”

हें ऐकून रावसाहेब अर्थातच चरफडले, पण कांही न बोलतां स्वस्थ बसले. दिनकर पाटीलबोवांना ह्मणाला, “ पाटील, आपले राहण्याचे गांव कोणतें ? ”

पाटील ह्मणाले, “ तिकडे उमरावरावतीच्या जवळ एका खेड्यांत असतों. मी शेतकरी आहे. भगवंताच्या कृपेनें अडीच–तीन हजार रुपये जमीनधारा भरीत असतो. हिशोबठिशोब पहायला हे असे झिरमिळ्याच्या पागोट्याचे दोन कारकून माझ्या घरीं आहेत. पण मी आपलें हें कांबळें पांघरूनच दिवस काढतों. पोरसोर आहेत, तींहि माझ्याचप्रमाणें वागतात. अजून कांहीं माझ्या घरांत कोणी चैनी निघाला नाहीं. पुढचें काय सांगू ? अहो, वडिलांची ह्मण आहे कीं, शहाण्यांनीं बुद्धीनें विकावें आणि मूर्खानें कपड्यानें विकावें ! आपण कोठें रहातां महाराज ? ”

“ मी उमरावतीजवळ रामपूर गांवीं राहतों. ”

“ रामपूर ! वा ! रामपूरचें नांव घेतलें, कीं, विसूकाकांची आठवण होते. लाख माणूस. खरा गृहस्थ. कांहीं कामासाठीं रामपुराला गेलों, तर विसूकाकांनीं कांहीं मला भाजीभाकर खाऊ घातल्यावांचून येऊं दिलें नाहीं. घरीं कोणी येवो. अन्नपाण्याला कांहीं त्या ब्राह्मणानें नाहीं ह्मटलें नाहीं. भगवंत त्याला देतहि होता. त्यांनीं देह सोडला, तेव्हां आम्ही रामपुरापासून पांच कोसावरचे; पण आमच्या गांवच्या लोकांना देखील अन्न गोड लागलें नाहीं. तुह्मांला ती सगळी माहिती असेलच ? ”

‘ सांगे वडिलांची कीर्ति ’ हा आरोप येऊं नये ह्मणून दिनकर कांहीं

न बोलतां अर्थातच गप्प बसला; पण विश्वनाथ हंसत हंसत ह्मणाला, "पाटील, हे दोघे विसूकाकांचेच चिरंजीव आहेत."

हें ऐकून पाटलांना मोठा आनंद झाल्यासारखा दिसला. तो ह्मणाला, "माझें मोठें भाग्य ह्मणून तुमचीं दर्शनें झालीं. तुम्ही सगळे मुंबईला काय करीत असतां ?"

पांडुरंग ह्मणाला, "आम्ही सगळे कॉलेजांत शिकत असतों. परीक्षा देऊन घरीं चाललो आहो. हे दिनकरराव पास झाले, तर विलायतला जाणार आहेत. आम्ही पास झालो तर कोठें तरी वकिली करून पोट भरूं."

पाटील ह्मणाले, "हे वकील आतां फार झाले. त्यांचा तरी काय दोष! कारण लोकहि तंटेखोर फार झाले. आतांचा काळच कलीचा आहे; तेव्हां, तंट्याबखेड्यांशिवाय जग तरी कसें चालेल ! आणि आतां कायदेहि फार झाले. वकील त्याचा एक अर्थ करतो, तर दुसरा दुसराच करतो. तुम्ही खऱ्याच्या कैवार घेऊन आपला धंदा करावा. एवढीच माझी तुह्मांला विनंति आहे."

पाटीलबोवाचें हे म्हणणें ऐकून सगळे विद्यार्थी हंसूं लागले. या विद्यार्थ्यांशीं आणखीहि कांहीं मडळीची चांगली ओळख झाली आणि त्या सगळ्यांचा वेळ गाडींत मोठ्या गमतीनें चालला होता. मनमाडच्या स्टेशनावर गाडी आल्यावर गाडींतली गर्दी बरीच कमी झाली आणि कित्येकांना थोडें आडवें होण्यास जागा सांपडली; पण दहापांच मिनिटें त्या स्थितींत जातात न जातात तोंच उतारूंची गर्दी झाली आणि पुन्हा सगळ्यांना उठून बसावें लागलें. मुंबईच्या स्टेशनवर झालेल्या तंट्याबखेड्याची पुनरावृत्ति येथेंहि थोडीशी झाली. जरीकांठीं रुमाल बांधून व चष्मा घालून एक स्थूल देहाचे गृहस्थ दरवाजाजवळच प्रशस्तपणें बसले होते. आपलें सामानसुमान व्यवस्थित ठेऊन ते जरा स्वस्थ झाल्यावर त्यांनीं घड्याळ काढून किती वाजले तें पाहिलें आणि नंतर खिशांतून विडी काढून धूम्रपान करण्यास त्यांनीं सुरुवात केली. आतां गाडींत विशेष गर्दी झाली होती, असें नाहीं; पण या भल्यागृहस्थाला असें वाटत होतें कीं, आतां गाडींत कोणींहि येऊं नये. ते दरवाजाजवळच बसलेले असल्यामुळें कोणीं

तो गरीब उतारू म्हणाला, " वा: रावसाहेब! माझ्यासारख्या गरीबाला कारण नसतां डब्यांत घेणारे ते उद्धट आणि कारण नसतां मला गाडींत न घेणारे ते सभ्य ! छान् ! हाच जर तुमचा न्याय असेल, तर दुर्दैव ! दुसरें काय ? रावसाहेबांच्या घरीं जर एकादा अतिथ अभ्यागत आला, तर त्याच्या दुर्दैवाला पारावार उरत नसेल ! "

रामभाऊ म्हणाला, " ते तरी काय करतील ? न्याय ह्मटला कीं, तेथें निष्ठुरपणाने वागावेंच लागतें. उतारूनें वास्तविक आपला पोषाक पाहून मग कोणत्या डब्यांत बसवावयाचें ते ठरविलें पाहिजे. रावसाहेबांच्या डब्यांत मळकट पोशाकाच्या मनुष्यानें शिरणें ह्मणजे गुन्हा होय. "

विश्वनाथ म्हणाला, " रामभाऊ, तूं आता ' रावसाहेबांसाठीं राखून ठेवलेला ' असें खडूनें डब्यावर लिही. "

दिनकर म्हणाला, " पण कालच्या ग्याझेटांत तर निराळाच ठराव पास झाला आहे. ऑनररी म्याजिस्ट्रेटांनीं दुसऱ्या आणि पहिल्या वर्गांतूनच प्रवास केला पाहिजे, ' असें त्या ठरावांत ह्मटलें आहे."

पांडुरंग म्हणाला, " ठराव अगदीं योग्य आहे. सरकार यांचा मानमरातब वाढवितें आणि हे तिसऱ्या वर्गांत बसून आपला मान कमी करून घेतात. म्याजिस्ट्रेटसाहेब, आपण यापुढें तिसऱ्या वर्गांत बसत जाऊं नका. ह्मणजे आमच्यासारख्या अशिक्षितांचा संपर्क आपणास लागणार नाहीं."

हळू हळू हा वाद बंद पडून दुसऱ्याच गप्पा गोष्टी सुरूं झाल्या. त्या गरीब उतारूला आंत न घेतल्याबद्दल स्वभावतःच म्याजिस्ट्रेटसाहेबांचें मन त्यांना खात होतें. त्यांत आणखी इतर उतारूनीं म्याजिस्ट्रेटसाहेबाची टर उडविल्यामुळें तर ते अधिकच हिरमुसले झाले होते. शेवटीं ' तुह्मां तरुण विद्यार्थ्यांना ब्रह्मज्ञान सांगण्यांत अर्थ नाहीं. ' असें जजमेंट देऊन हे गृहस्थ स्वस्थ बसून राहिले होते. चाळीसगांवचें स्टेशन आल्यावर ते गाडींतून उतरले आणि धुळ्याकडे जाणाऱ्या गाडीची मार्गप्रतिक्षा करूं लागले. तो गरीब उतारूहि येथेंच उतरला आणि सगळ्याना रामराम करून मोठ्या संतोषानें गांवांत निघून गेला. येथें गाडींतली गर्दी बरीच कमी झाली आणि बाकीच्या मंडळींना हातपाय लांब करण्यास अवसर मिळाला.

कित्येकांना भुसावळपर्यंत चांगली झोंपहि मिळाली. गाडी भुसावळच्या स्टेशनावर आल्यावर सगळे खडबडून जागे झाले आणि येथें अर्धा तास गाडीचा मुक्काम असल्यामुळें हे विद्यार्थी प्लॅटफॉर्म वर उतरून इकडे तिकडे हिंडूं लागले. दिनकरहि गाडीच्या कांठाकांठानें हिंडत असतां एका डब्याच्या दाराशीं थोडी गर्दी दिसल्यामुळें तेथें काय आहे, तें पाहण्यासाठीं गेला. बायकांच्या डब्याच्या दाराशीं एक सुस्वरूप हिंदु तरुणी उभी असून एक युरेजियन तिकिट कलेक्टर तिच्याजवळ तिकिट मागत होता. ‘ आपले तिकीट पुरुष मंडळीजवळ आहे. त्यांच्याजवळ शोध करा ’ असें तिनें सांगितलें; पण तें त्या तिकीटकलेक्टरास पसत न पडून तो तिच्याशीं लगट करून तिकीट मागूं लागला. तेथें पांच सहा इसम होते; पण ते शांतपणें हा तमाशा पहात होते. दिनकरला या सर्व लोकांचा अर्थातच फार राग आला. इतक्यांत तो युरेजियन केवळ पाजीपणानें त्या तरुणीजवळ तिकीट मागत आहे व तिचा हात धरण्याचा प्रयत्न करीत आहे, असें पाहून दिनकर वज्रगंभीर स्वरानें, ‘पेंढानो, येथें का हा तमाशा पहावयाला जमलां आहां?’ असें ह्मणून त्या गर्दींतून चटकन् पुढें झाला आणि त्यानें एक वज्रमुष्ठी त्या युरेजियनच्या पाठींत अशी सणसणून दिली की, त्या स्वारीनें बैठकच मारली. दिनकरनें त्याचा हात धरून त्याला खालीं ओढलें आणि मोठ्यानें ‘ पोलीस पोलीस ’ ह्मणून तो ओरडला. इतक्यात पोलीस व दिनकरबरोबरचे विद्यार्थी तिकडे धांवले. रोजच्या ओळखीच्या पोलिसांना पाहतांच युरेजियन तिकीट कलेक्टरला मोठें अवसान चढलें. पोलीसकडे वळून तो म्हणाला, “ पकडो, इस अदमीको. इसने हमको मारा है ! ” दिनकरहि तशाच त्वेषानें म्हणाला, “ या बदमाशाला पकडा. यानें त्या सभ्य स्त्रीच्या अंगावर हात टाकला आहे.” इतकें जो होत आहे, तों त्या दोघांच्याहि भोंवतीं बरीच गर्दी जमली. जो तो दिनकरला शाबासकी देऊन त्या तिकीट कलेक्टरला शिव्या देऊं लागला. कित्येक प्रवाशांना तर या घोटाळ्याचा कांहीं अर्थच समजला नाहीं. एकजण दिनकरकडे बोट करून दुसऱ्याला म्हणाला, “तो मनुष्य बिन तिकीटावांचून प्रवास करीत होता, ह्मणून त्याला पकडलें आहे. ” तिसरा एकजण म्हणाला,

"नाहीं हो. त्यानें त्या स्त्रीला पळवून आणल्यामुळें पोलीसनें त्याला पकडलें आहे." यावर चवथा एक शाहाणा म्हणाला, "उगीच कांहीं तरी बड-बडू नका. तो गाडींत चोरी करून पळून जात होता ह्मणून त्याला पकडले." अशा प्रकारें विलक्षण तर्कवितर्क करीत कांहीं प्रवासी तेथून जात येत होते. इतक्यांत स्टेशनमास्तरची स्वारी तेथें दाखल झाली. त्यांना पाहतांच तिकीट कलेक्टरनें इंग्रजींत दिनकर विरुद्ध कागाळी केली. दिनकरचा राग अजूनहि शांत झालेला नसल्यामुळे तो तिकीटकलेक्टरच्या अंगावर ओरडून इंग्रजींत म्हणाला, "पशू, त्या सभ्य स्त्रीच्या अंगाला हात लावलास कीं नाहीं? पाजी, नीच, या उन्मत्त रेड्यापेक्षां अधिक चांगले नौकर रेल्वे कंपनीला मिळत नसतील, तर त्यांनीं स्त्रियांच्या प्रवासांना बंदी तरी केली पाहिजे."

लोकांची सहानुभूति दिनकरकडे आहे, असें पाहून स्टेशनमास्तरनें आणि पोलिसांनीं प्रथम लोकांना तेथून घालवून दिलें. नंतर दिनकरकडे वळून स्टेशनमास्तर म्हणाला, "आमचा मनुष्य आपली ड्यूटी बजावीत असतां तू त्याला मारलेंस कीं नाहीं?"

दिनकर खणखणीत आवाजांत म्हणाला, "कुलीन स्त्रियांची अब्रू घेण्याच्या कामावर या मनुष्याची नेमणूक केली आहे काय?"

"कोण सांगतो, त्यानें त्या स्त्रीच्या अंगाला हात लावला म्हणून?" असें इंग्रजींत म्हणून स्टेशनमास्तर मग तेथें उभ्या असलेल्या लोकांकडे वळला आणि हिंदींत म्हणाला, "ये आदमीनें इस औरतको हात लगाया ये आपने देखा है?"

दिनकरबरोबर प्रवास करीत असलेला तो पाटील चटकन् पुढें झाला, आणि म्हणाला, "हो हो! मी पाहिलें. त्या बदमाशानें त्या बाईला त्रास दिलेला मीं पाहिला. ती बाई ओरडली, तेव्हां हे रावसाहेब धांवले आणि यांनीं तिला सोडविलें."

इतक्यांत रामभाऊ, पांडुरंग, विश्वनाथ, दिवाकर या सर्वांनींहि असेंच ठासून इंग्रजींत सांगितलें. दिनकरच्या या कृतीनें कांहीं तास खोटी झाल्यावांचून रहात नाहीं, हें लक्षांत आल्यामुळे ही सर्व मंडळी सामान-

सुमान घेऊन अगोदरच खालीं उतरली होती. सगळे साक्षीदार दिनकर-च्याच बाजूचे आहेत, असें पाहून स्टेशनमास्तर चिडला. तो पोलिसकडे वळून म्हणाला, " तिकीटकलेक्टरकडून फिर्याद घ्या आणि ह्या इसमाला म्याजिस्ट्रेटपुढे नेऊन उभा करा. "

दिनकरहि पोलीसकडे वळून म्हणाला, " यानें त्या स्त्रीच्या अंगाला हात लावल्याबद्दल मीहि फिर्याद दाखल करतों. "

पोलिसचे नाईक दिनकरकडे रोखून पाहून म्हणाले, " तुम्ही त्या स्त्रीचे कोण आहां ? "

हीं इतकीं प्रश्नोत्तरें होत आहेत, तो त्या तरुण मुलीला बरोबर घेऊन एक सभ्य गृहस्थ तेथें आले. या गृहस्थाचा पोषाक नीटनेटका असून चेहराहि मोठा रुबाबदार होता. दिनकरनें पोलिसला जबाब देण्याच्या आधींच तो पुढें होऊन म्हणाला, " त्या मुलीच्या वतीनें मी फिर्याद दाखल करतों. मी तिचा बाप आहे. चार डबे पलीकडून मी येईपर्यंत त्या मुलीजवळून तिकिट घेण्यासाठीं या तिकीटकलेक्टरसाहेबांना एवढी घाई झाली होती काय ? हा तिकीटकलेक्टर इतक्या नीच वृत्तीचा आहे, याबद्दल माझ्याजवळ पूर्वीचे चार पांच दाखले आहेत. " नतर तो दिन-करकडे वळून म्हणाला, " माझ्या मुलीच्या अब्रूसंरक्षणासाठीं आपण जो प्रयत्न केला, त्याबद्दल मी आपला फार अभारी आहे. "

दिनकर नम्रपणें म्हणाला, " यांत मी आभार मानण्यासारखें काय केलें आहे ! माझें कर्तव्य तेंच मीं केलें. "

तो गृहस्थ म्हणाला, " माझें नांव नारायणराव जोशी. मी धुळें येथें वकिली करीत असतों. आपण कांहीं भिऊं नका. आपल्यावर आलेल्या या संकटाची सगळी जबाबदारी माझ्यावर आहे. " नतर तो पोलिसकडे वळून म्हणाला, " तुम्ही जर तिकीटकलेक्टरची फिर्याद घेत [illegible]साल, तर आम्हांला शक्य तितक्या लवकर म्याजिस्ट्रेटपुढें नेऊन उभें क[illegible], आणि तो देत नसेल, तर आमची फिर्याद घेऊन आम्हाला मोकळें [illegible]ा."

गांठ अगदींच निराळ्या गृहस्थाशीं आहे, हें पाहून पोलिस[illegible]हि जरा विचारच पडला; पण तिकिटकलेक्टरला आपल्या गोऱ्या कातड्याचा मोठा

विश्वास असल्यामुळें त्यानें फिर्याद दाखल केली आणि त्यामुळे या सर्व मंडळीस घेऊन पोलीसला म्याजिस्ट्रेटकडे जावें लागलें. हे म्याजिस्ट्रेटसाहेब म्हणजे रेल्वे नौकरांचे विशेष चहाते होते. कंपनीकडून त्यांना पहिल्या वर्गाचा मुंबई ते नागपूरपर्यंतचा पास होता. अशा अनेक कारणामुळें त्यांना कंपनीचे हित पाहणें भाग पडे. हे म्याजिस्ट्रेट अकराच्या सुमारास कचेरींत आले. दोन्ही बाजूची हकीकत ऐकून घेतल्यावर त्यांनीं दिनकरला जामिनावर सोडण्याचें कबूल केलें. नारायणराव जोशी यांची भुसावळ येथें चांगली ओळख असल्यामुळें दिनकरला जामीन मिळून या सर्व मंडळीची जेवण्याची वगैरेहि व्यवस्था फार चांगली लागली. आमचे पाटीलबोवा दिनकरवर पहिल्या पासूनच खुष होते, त्यांत दिनकरचें हें योग्य साहस त्यांच्या दृष्टीस पडल्यामुळें तर त्यांनीं दिनकरच्या धैर्याची फारच तारीफ केली. कांहीं एक ओळख नसता पाटीलबोवांची ही सहानुभूति पाहून सर्व विद्यार्थ्यांना सकौतुक आश्चर्य वाटलें. रात्रभर चांगली विश्रांति घेऊन ही सर्व मंडळी दुसऱ्या दिवशीं साडेसहाच्या सुमारानें स्टेशनावर आली व मेलमध्यें बसून उमरावतीकडे निघून गेली.

---

## प्रकरण सातवें.



आज रामपूर येथील विसुकाकांच्या घरानें विलक्षण औदासीन्य धारण केलें होतें. दिनकर आणि दिवाकर हे कालच यावयाचे. पण ते अद्याप न आल्यामुळें यशोदा व घरांतील इतरांना मोठी काळजी वाटत होती. दोघांची चुलत बहीण यमुना तर सारखी आंत बाहेर खेपा घालून दरवाजांतून डोकावून रस्त्याकडे लांबवर पहात होती. इतक्यांत सायंकाळीं पांचाच्या सुमारानें एक बैलगाडी घराकडे येतांना दिसली व त्याबरोबर यमुना घरांत जाऊन ‘ आले हो, दोघेहि आले, ’ असें म्हणाली. यमुनेचे हे शब्द ऐकून सत्यभामा, यशोदा आणि यमुना अशा बाहेर येऊन उभ्या राहिल्या. उमाचा मुलगा सदू तर ‘ काका आले, काका आले, ’ असें

म्हणून ओटीवर सारखा नाचत होता. दिनकरनेंहि गाडींतून खालीं उतरल्याबरोबर सदूला उचलून घेऊन त्याचा एक मुका घेतला आणि त्याच्यासह तो आंत गेला. " काका, मला चेंडू आणला ? ' सदूनें अगदीं पहिला प्रश्न दिनकरला हा केला. दिनकर त्याच्या या प्रश्नाचें कांहीं उत्तर देत आहे आणि दिवाकर गाडींतलें सामान घेऊन आंत येत आहे, तोंच सगळ्यांनीं ' अरे, काल तुम्ही होतां कुठें ? वाट पाहून पाहून जीव नुसता हुर हुर करूं लागला. काल उमरावतीला का राहिलां होतां ? ' दिनकर हंसत हंसत म्हणाला, " आई, आतां अगदीं सणसणून भूक लागली आहे. अंघोळी करून दोन घांस आम्हाला खाऊं द्या. मग सगळें काय तें सांगतो. "

यशोदा यावर मोठ्यानें उमाला हांक मारून म्हणाली, " उमा, अगोदर चूल पेटवून पिठलंभात कर, आणि लक्ष्मी, बाहेरच्या बंबांत सरपण घालून या दोघांना अंघोळीला पाणी दे. " इतकें सांगून यशोदा आंत गेली. यमुना व सत्यभामाहि दिनकरला व दिवाकरला चार दोन प्रश्न करून आंत गेल्या. सामान वगैरे व्यवस्थेनें ठेऊन व कपडे काढून झाल्यावर प्रथम दिवाकर आंत गेला. दिवाकर आंत जाऊन पधरा वीस मिनिटें झालीं असतील नसतील तोंच आंत कांहीं चमत्कारिक गलबला झाल्याचें व त्याबरोबरच आई रडत असल्याचेंहि दिनकरच्या कानावर आलें. विसुकाकांच्या घरांत एकाएकीं रडारड सुरू झाल्याची ऐकून शेजारच्या पाजारच्या बायका व पुरुषहि तितक्यांत धांवून आले. हा काय प्रकार आहे, याची कल्पना दिनकरला होण्याच्या पूर्वींच यशोदा घरांतून मोठ्यानें रडत रडत बाहेर आली आणि दिनकरला म्हणाली, " कायरे हें केलेंस ! कुळाला कलंक लावलास ! "

इतक्यांत यमुना, उमा, सत्यभामा ह्याहि दाराजवळ आल्या आणि डोळ्यांत पाणी आणून स्फुंदूं लागल्या. दिनकर अधिकच घाबरून जाऊन म्हणाला, " आई, झालें काय ? तुम्ही सगळीं रडतां कां ? "

पण दिनकरच्या या प्रश्नाचें उत्तर न देतां यशोदाबाईनें आणखी मोठ्यानें रडण्यास सुरुवात केली. ' कारट्या, वडिलांचें नांव घालविलेंस. घराण्याचा

लौकिक बुडविलास.' अशा प्रकारची एकीकडे तिची बडबडहि चालली होती. शेजारच्या पाजारच्या बायकांना काय झालें आणि काय नाहीं, याची देखील माहिती नव्हती. तथापि त्या यशोदेच्या भोंवतीं गोळा झाल्या आणि तिच्याच म्हणण्याचा अनुवाद करूं लागल्या. या एकदर प्रकारानें दिनकर बराच गोंधळून जाऊन त्रासलेल्या स्वरानें म्हणाला, "ही आहे काय भानगड ? काय झालें तें स्पष्ट सांग ना ! आई, तुला वेड तर नाही लागलें ?"

यशोदा डोळे पुशित पुशित रागानें म्हणाली, "मूर्खा, साहेबाला मारलेस आणि काय झालें म्हणून आणखी विचारतोस ? म्हणूनच तुला पोलिसानीं पकडले होते. कारट्या वडिलांचे नांव बुडविलेंस !"

आईचे हे शब्द ऐकून दिनकरची काळजी एकदम दूर झाली. आपल्या कालच्या कृत्याची हकीकत घरांत कळल्यामुळे हा सगळा गोंधळ उडाला आहे, हें दिनकरच्या लक्षांत येतांच तो गभीर स्वराने म्हणाला, "वडिलांचें नांव बुडविलें कीं, त्याच्या कीर्तीत भर घातली, ते परमेश्वराला माहीत."

यशोदा अजूनहि स्फुंदतच होती; पण दिनकरचे हे शब्द ऐकून यमुना बरीच निष्काळजी झाली. ती शांतपणे म्हणाली, "काकू, दिनकर असें वेड्यासारखे करील तरी कसे ? सगळे त्याच्या वागणुकीची तारीफ करतात. दिनकर, काय झालें ते सगळे तूच नीट समजावून सांग ना."

दिनकर म्हणाला, "अगोदर तुम्हां सगळ्यांचे रडणें होऊं द्या; मग मला काय सांगावयाचें तें सांगेन."

यशोदा दिनकरच्या पाठीवर हात फिरवून म्हणाली, "बाबा, आपण गरीब माणसे. नाहीं कोणाचा आश्रय, नाही पैशाचे बळ ! अशा स्थितींत हा नसता कारभार आपल्याला कशाला पाहिजे ?"

दिनकर म्हणाला, "आई, तूं म्हणतेस ते खरें; पण केव्हां केव्हां असें साहस करावेंहि लागतें. समज, आपल्याच घरांतली सत्यभामा नाही तर यमुना बायकांच्या डब्यांतून प्रवास करीत असतां जर कोणी वाईट बुद्धीनें त्यांच्याजवळ गेला, तर त्या बायकांची अब्रु वांचविण्यासाठीं त्या नीचाला दोन ठोसे द्यावयाला नको का ? भुसावळच्या स्टेशनावर तसेंच झालें.

गाडीत गर्दी फार असल्यामुळें धुळ्याचे नारायणराव जोशी वकील यांनीं आपली मुलगी बायकांच्या डब्यांत बसविली होती. भुसावळच्या स्टेशनावर गाडी आल्यावर एक तिकिटकलेक्टर त्या डब्यांत गेला आणि त्या तरुण मुलीबरोबर चावटपणा करूं लागला. तेव्हां मी तेथे गेलों आणि त्याच्या पाठीवर असा एक जोराचा ठोसा ठेवून दिला कीं, बायकांची चेष्टा करण्याची आठवण त्याला जन्मभर राहील. आई, तूच सांग बरें, मी जर त्या वेळीं जवळ नसतो किंवा जवळ असूनहि थंड उभा राहिलो असतो, तर त्या मुलीची काय बरें दशा झाली असती ? तिच्या मनाला किती बरें दुःख झाले असते ? "

बायकांप्रमाणें शेजारचे पाजारचे कांहीं पुरुषहि ही हकीकत ऐकत होते. त्यांत चिंतामणी नांवाचा एक तरुण होता. त्याच्या शरीरांत तर सतापानें विलक्षण त्वेष उत्पन्न झाला. तो रागाने म्हणाला, " ठीक केलें दिनकरराव. मी असतों, तर त्या नीचाला लाथांनी तुडविलें असते. " असें म्हणून चिंतामणीनें आपला पाय जोरानें जमिनीवर आपटला. आणखी चार दोन पुरुषांनीं चिंतामणीप्रमाणेच दिनकरच्या या कृत्याचें समर्थन केलें. घरांतल्या बायकांनाहि दिनकरचें कृत्य प्रशंसनीय वाटलें. त्या मुलीच्या ऐवजीं आपण असतों आणि आपणावर असा प्रसंग येऊन जर दिनकर-सारख्या परक्या मनुष्यानें आपणास सहाय्य केलें असतें, तर त्या परक्या मनुष्याचे आपण किती तरी उपकार मानले असते; अशा प्रकारचे विचार घरांतल्या बायकांच्या चित्तावर उमटल्यामुळें त्यांना दिनकरचें कौतुकच वाटलें. त्याच्या आईलाहि त्याबद्दल अभिमान वाटला नाहीं, असें नाहीं; पण वृद्धपणामुळें तिचें रक्त बरेंच थंड झाल्यामुळें ती म्हणाली, " बाबा, केलें हें चांगले केलेंस; पण आतां पुढें कोणी मदत करायला आहे का ? होळीचे होळकर बरें बरें म्हणतील; पण आतां या आलेल्या संकटाशीं तुलाच झगडावयाला लागेल ना ? "

दिनकरहि शांतपणे म्हणाला, " आई, तूं म्हणतेस तें खरें; पण परिणामाकडे दृष्टि देऊन समोर दिसत असलेल्या कर्तव्याकडे पाठ करणें, हाहि मूर्खपणा आहे. परमेश्वर जे करील ते करील."

यशोदा ह्मणाली, " त्या साहेबानें फिर्याद केली असून तुला ह्मणे पोलिसनें पकडून नेलें होतें."

" होय, नेलें होतें; पण मी आपल्या कर्तव्याला जागलों असल्यामुळें अनेकांनीं मला आपण होऊन मदत केली. त्या तिकीटकलेक्टरनें माझ्यावर फिर्याद केली असून नारायणराव जोशी यांनींहि त्याच्यावर फिर्याद केली आहे. माझी ओळख ना पाळख असे एक भुसावळचे बडे गृहस्थ मला जामीन राहिले आहेत. आणि या बाबतींत होणारा सगळा खर्च नारायणराव जोशी यांनीं करण्याचें कबूल केलें आहे."

दिनकरनें असें सांगितल्यावर सगळ्यांच्या जिवांत जीव आला. हा सगळा गोंधळ वास्तविक दिवाकरानें केला होता. दिनकरनें केलेल्या या बहादुरीची गोष्ट सगळ्यांच्या आधीं घरांत सांगून मोठी शाबासकी मिळविण्याचा त्याचा विचार होता; पण साहेबाशीं मारामारी आणि पोलिसनें दिनकरला पकडलें होतें, या दोन गोष्टींनीं घरांतील बायका साहजिकच घाबरल्या आणि त्यांनीं मोठ्यानें रडण्यास आरंभ केला. आपल्या या कृतीनें भलताच घोटाळा झाला आहे, हें पाहून दिवाकरनें हळूच धोतर घेतलें आणि तो स्नानासाठीं नदीवर निघून गेला. स्नान वगैरे झाल्यावर चोरासारखा गुपचुप घरांत आला आणि सगळें वातावरण शांत झालें आहे असें पाहून जेवण्यासाठीं पानावर जाऊन बसला. इतक्यांत दिनकरहि स्नान वगैरे करून पानावर येऊन बसला. बाहेरच्या या भानगडींत लक्ष्मीनें व सत्यभामानें विशेष लक्षच घातलें नाहीं. चारदोन चटकन् होणारे पदार्थ लक्ष्मीनें तयार केले आणि सत्यभामेनें दोन्ही पानें वाढलीं. दिवाकर खालीं मान घालून गुपचुप जेवीत होता. आपल्या पोटांत गोष्ट न राहिल्यामुळें घरात सगळा घोटाळा झाला, असें वाटून त्याचें मन खात होतें. दिनकर मात्र शांतपणें जेवीत होता. आंबट वरणाचे एकसारखे दिनकर भुरके मारीत आहे असें पाहून सत्यभामा ह्मणाली, " दादा, सांग बरें आजचा स्वयंपाक कोणी केला तो ?"

दिनकर हळूच हंसून ह्मणाला, " समजलों. सर्टिफिकिटासाठीं तुला मध्यस्थ घातलें आहे होय ? पदार्थ बरे झाले आहेत. चवदार लागतात;

पण मुंबईच्या खाणावळीच्या जेवणाचा कंटाळा आल्यामुळेंहि कदाचित् हे पदार्थ चवदार लागत असतील."

सत्यभामा ह्मणाली, "तुह्मां दोघांचे चेहरे पाहिले ह्मणजे खानावळींतील जेवण तुह्मांस मानवलें नाहीं, असें दिसतें खरें; पण साधें आंबटवरण तरी खानावळींत चांगलें असेल ?"

दिनकर हंसत हसत ह्मणाला, "चांगलें ह्मणून काय विचारतेस ! तें वरण कोणत्या डाळीचें केले आहे, हें केव्हांहि समजावयाचे नाही. केव्हां केव्हां आमच्या खानावळींत यासंबंधानें बक्षिसेंहि लागतात. हें बक्षीस अर्थातच स्वयंपाक्याच्या पदरांत पडतें. 'आजचें वरण कोणत्याहि डाळीचें न करतां नुसत्या पाण्याला तिखटमीठ लावून फोडणी दिली आहे,' असें त्यानें सांगितलें ह्मणजे सगळ्यांना साहजिकच आश्चर्य वाटते."

दिनकरचे हे शब्द ऐकून सत्यभामा आणि आंत चुलीजवळ बसलेल्या लक्ष्मीला अर्थातच हंसू आलें. मागचा भात स्वतः लक्ष्मीनेच वाढला आणि त्यांत मठ्ठाहि तिनेंच ओतला. चांगल्या ताकाला फोडणी वगैरे देऊन उत्कृष्ट मठ्ठा केलेला असल्यामुळे दोघांनींहि लक्ष्मीची प्रशंसा केली. अशा रीतीनें दोघांचीं जेवणें होऊन घरांतले एकंदर वातावरण शांत झाल्यावर दोघेहि बाहेर फिरावयास गेले. रात्रीं आठाच्या सुमाराला दोघे परत आल्यावर बरोबर आणलेला खाऊ व खेळणीं मुलांमुलींच्या स्वाधीन केल्यावर दिवाकर त्याच्या खोलींत जाऊन निजला. दिनकरहि आपल्या खोलींत जाऊन निजला; परंतु गृहिणी अद्यापि गृहकृत्यें उरकून आंत आलेली नसल्यामुळें दिनकरचे मन अस्वस्थ झाले व त्याला झोंप लागेना. तेव्हां त्यानें दिवा लावून एक पुस्तक वाचण्यास आरंभ केला; पण पुस्तकांतहि त्याचें मन रमेना. आमचे पुष्कळ वाचक आतां दिनकरच्या या स्थितीशीं आपल्या स्थितीची तुलना करूं लागतील; पण तसें त्यांनीं करूं नये. मोठ्या उत्कंठेनें दिनकर गृहिणीची वाट पहात होता, हें खरें; पण ती उत्कंठा फार निराळी होती. आपण गेल्यापासून गृहिणीची लिहिण्यावाचण्याच्या बाबतींत किती उन्नति झाली आहे आणि आपण केलेल्या निःस्वार्थ कृत्याचें गृहिणीकडून समर्थन होतें कीं, तीहि मातोश्रीप्रमाणें

अश्रु ढाळते, हें त्याला पहावयाचें होतें. दिनकर अशा विचारांत असतां नऊ वाजल्यावर लक्ष्मीचे त्याच्या खोलींत आगमन झाले. ती रम्य आणि हंसतमुख मूर्ति समोर पाहतांच इतका वेळ दिनकरच्या अंतःकरणावर खेळणारी मालतीची मूर्ति नाहींशी झाली आणि त्या हृदयसिंहासनावर लक्ष्मीची प्रतिमा अधिष्ठित झाली. एकमेकांनीं एकमेकांस चार दोन प्रश्न केल्यावर दिनकर ह्मणाला, " तुझ्या गळ्यांत मोहनमाळ दिसत नाहीं ती ? "

"मी काढून ठेवली. "

" कां ? "

" थोरल्या जाऊबाईना माहेनमाळ नाहीं ह्मणून. "

" म्हणजे ? उमाला मोहनमाळ नाहीं, ह्मणून तू ती काढून ठेवायची हा न्याय कोठला ? "

" दोघींना सारखेच दागिने आहेत, असे लोकांनीं ह्मणावें ह्मणून मी ती घालीत नाहीं. शिवाय जाऊबाईनाहि त्यामुळें मत्सर वाटणार नाहीं. दुसऱ्यांना बरें वाटावें ह्मणून मी दागिनाच काढून ठेवला; पण तुम्ही तर दुसऱ्यांवरचें संकट दूर करण्यासाठीं स्वतःला संकटांत पाडून घेतलें आहे."

" तर मग मी केलें हें योग्यच केलें असें तुला वाटते ना ? "

" होय. त्या माऊलीची अब्रु आपण वांचविली हें खरोखर फार चांगलें केलें; पण त्याबरोबर काळजीहि साहजिक वाटते. कुलस्वामिनीच्या कृपेनें हे संकट टळो म्हणजे झाले. पण ती मुलगी इतकी कशी भित्री ? "

" मग त्या वेळेस ती काय करण्यास समर्थ होती ? "

" कां बरें ? तिनेंच त्या मेल्याच्या गालफडावर पांच बोटें उठवून द्यावयाला पाहिजे होतीं. अथवा अन्य कांहीं तरी साहस करून आपली सुटका करून घ्यावयास पाहिजे होती. पुष्कळ नीच पुरुष स्त्रियांच्या या भित्रेपणाचाच फायदा घेतात."

आपलें शहाणपण नेहमीं चुलीजवळ चालविणाऱ्या लक्ष्मीचे हे विचार ऐकून हें नारीहृदय कांहीं विलक्षण आहे, असे दिनकरच्या तेव्हांच लक्षांत आलें. कुसुमाप्रमाणें मृदु आणि वज्राप्रमाणें कठिण अशा दोन्हीहि वृत्ति आपल्या स्त्रीच्या ठिकाणीं आहेत, हें दिनकरच्या लक्षांत आल्यामुळें त्याला

स्वतःच्या स्त्रीची खरी योग्यता ठरवितां येईना. एक वेळ त्याला अशी गृहदेवता मिळाल्याबद्दल मोठी धन्यता वाटे, तर त्या अशिक्षित स्त्रीची जोड मिळाल्याबद्दल एकवेळ त्याला विषादहि वाटे. आपणास कशी स्त्री मिळावी, ही दिनकरची इच्छा पूर्वींच वाचकांना समजून चुकली आहे. त्यांत मालतीची ओळख झाल्यामुळें तर क्षणोक्षणी मालतीची आणि लक्ष्मीची तो तुलना करून पाही आणि त्या तुलनेंत त्याला निश्चित असे कांहींच ठरवितां येत नसे. तो निराश मात्र केव्हांहि होत नसे. बायकोला शिकवून शिकवून तिला विदुषी करण्याची उमेद त्याला अजून होती. पत्नीला कांहीं तरी शिकवावयाचें ही आठवण त्याला जेव्हां झाली, तेव्हां तो ह्मणाला, "माझ्या पत्राचें उत्तर तूं का नाहीं पाठविलेंस ?"

लक्ष्मी हंसत हंसत ह्मणाली, "त्या पत्राचें काय उत्तर पाठवावें तेंच मला समजेना. तुमचे ते गोड शब्द आणि ती अलंकारिक भाषा हीं मला कोठलीं साधावयाला? ह्मणून मीं पत्र पाठविण्याचा विचारच रहित केला. आणि असें कळवावयाचें तरी काय होतें. खुशालीच कळवावयाची होती, ती थोरल्या भावोजीकडून कळलीच असेल ह्मणूनहि मीं पत्र पाठविलें नाहीं. मला पत्र पाठवूं नका, असें मी तुह्मांला अगोदरच सुचविलें होतें; पण तें कांहीं तुमच्या लक्षांत राहिलें नाहीं. मला स्वतंत्रपणें पत्र आलेलें पाहून घरांत सगळ्यानांच आश्चर्य वाटलें. मला तर अगदी लाजल्यासारखें झालें."

लक्ष्मीचे हे शब्द ऐकून दिनकर बराच खिन्न झाला. आतां मात्र मालतीच त्याला अधिक सद्गुणी दिसूं लागली. कांहींसा निराश होऊन त्यानें एक दीर्घ श्वास सोडला आणि आंथरुणावर तो स्वस्थ पडला. चतुर लक्ष्मीच्या लक्षांत पतीच्या या निराशेचें कारण तेव्हांच आलें. ती ह्मणाली, "असे निराश होऊन तुम्ही श्वास कां सोडलां ?"

दिनकर ह्मणाला, "छेः ! तूं उगीच कांहीं तरी म्हणतेस."

लक्ष्मी ह्मणाली, "मी पुष्कळसें लिहिण्यावाचण्यास शिकावें अशी तुमची फार इच्छा दिसते. तुह्माला असें कां वाटतें बरें ?"

लक्ष्मीचा हा प्रश्न अगदीं साधा होता; पण त्या प्रश्नाचें उत्तर दिन-

करला कांहीं देतां येईना. हळूहळू लक्ष्मीचा तो प्रश्न त्याला फार कठिण वाटूं लागला आणि तो निरुत्तर होऊन स्वस्थ पडला. स्त्रीला इंग्रजी वगैरे पुष्कळसें शिकवावयाचें असें त्याला वाटत होतें खरें; पण तें कां ? कशासाठीं ? याचा त्यानें तरी कोठें विचार केला होता. त्याच्या मनांत स्त्री-शिक्षणाच्या ज्या कांहीं कल्पना येत होत्या, त्या केवळ ऐहिक सुखाच्या दृष्टीनेंच येत होत्या. हें सुख अर्थातच निकृष्ट. तेव्हां असल्या सुखासाठीं स्त्री लिहिण्यावाचण्यांत तरबेज असावी. अशी आपली इच्छा स्त्रीला कळविणें म्हणजे या निकृष्ट सुखासाठीं आपलें अंतःकरण कसें तळमळत आहे, हेंच लक्ष्मीला दाखविणें होय, असें त्याला वाटून त्यानें त्या प्रश्नांचें उत्तर देण्याचेंच टाळलें. त्यानें पुन्हां कांहीं घरगुती बाबतींत बोलण्यास आरंभ केला व अशा रीतीनें त्यानें तो विषयच मागें टाकला.

हळू हळू दिनकरला लक्ष्मीच्या सहवासांतच सौख्य वाटूं लागलें. मालतीच्या अभिनययुक्त वागण्यांत जशी जादू आहे, तशी लक्ष्मीच्या साध्या वागण्यांतहि एक आकर्षकशक्ति आहे, असें त्याच्या अनुभवाला हळू हळू येऊं लागलें; पण तितक्यांत मालतीनें एक आघात दिनकरच्या हृदयावर केल्यामुळें पुन्हां त्याचें मन इकडे तिकडे करूं लागलें. रामपुराला येऊन पांच सहा दिवस झाल्यावर त्याच्या हातांत एक बंद केलेलें पत्र पडलें. एका उत्कृष्ट पाकिटावर वळणदार इंग्रजी अक्षरांत लिहिलेला पत्ता पाहिल्याबरोबर तें पत्र मालतीकडून आलें आहे, असें दिनकरनें तेव्हांच ओळखलें. पत्र मालतीकडून आलें आहे, एवढी चित्ताला जाणीव होतांच पाकिट फोडून पत्र वाचून पाहण्याची दिनकरला किती घाई झाली असेल याची कल्पनाच केली पाहिजे. पत्रावरील आवरण काळजीपूर्वक फोडून तें त्यानें जपून खिशांत ठेवलें आणि अगदीं एका बाजूला बसून त्यानें पत्र वाचण्यास आरंभ केला. उत्कृष्ट गुलाबी कागद आणि त्यावर काळजीपूर्वक स्वच्छ व स्पष्ट लिहिलेला वळणदार अक्षरांचा मजकूर पाहून दिनकरला मालती जणूं स्वर्गीय देवतेप्रमाणें वाटूं लागली. त्या पत्रांत खालीं लिहिलेला मजकूर होता: —

मुंबई, तारीख—

सकल गुणालंकृत दिनकरराव यांस,

बाबांच्या सांगण्यावरून आज मोठ्या आनंदानें आपणास पत्र लिहीत आहें. टाइम्स, ॲडव्होकेट, केसरी वगैरे वर्तमानपत्रांत एका हिंदू तरुणासंबधानें मोठी अभिमानास्पद हकीकत प्रसिद्ध झाली आहे. 'भुसावळच्या स्टेशनावर एका युरेजियन तिकिट कलेक्टरानें एका कुलीन तरुण स्त्रीशीं तिकिट मागण्याच्या मिषानें अत्यंत गर्हणीय वर्तन केलें. या वेळी ती तरुणी फार संकटांत सांपडली होती; पण तितक्यांत दिनकरराव देशमुख नांवाच्या तरुणानें त्या तिकिट कलेक्टरच्या पाठींत एक जोराचा टोंसा देऊन त्या स्त्रीची अब्रु वाचविली.' अशा अर्थाची हकीकत बऱ्याच चांगल्या चांगल्या वर्तमानपत्रांत वाचावयाला मिळाली. आपण ज्या रात्रीं येथून गेलां, त्याच्याच दुसऱ्या दिवशीं ही हकीकत घडली असून नांवांतहि कोणता फरक नाही. त्यावरून हे दिनकरराव ह्मणजे दुसरे कोणी नसून आमचे मास्तरच होत, असें बाबा ह्मणाले आणि त्यांनीं आपल्या धैर्याची फारच वाखाणणी केली. जो कोणी बाबांना भेटावयाला येतो, त्याच्याजवळ ते आपल्या या स्तुत्य साहसाची हकीकत सांगतात. हें पत्रहि तेवढ्याचसाठीं त्यानीं मला लिहिण्याला सांगितलें आहे. एकंदर स्त्रीजातीसबंधानें आपल्या मनांत हा जो आदर वसत आहे, त्याबद्दल मला देखील आपली प्रशंसा केल्यावांचून रहावत नाहीं. त्या तिकिट कलेक्टरानें आपणावर फिर्याद केल्यामुळें आपण एक प्रकारें संकटातच आहां; पण त्यासंबंधानें आपण काळजी करूं नये. कायद्याची योग्य सल्ला आपणास मिळावी ह्मणून जो कांहीं खर्च येईल, तो सोसण्यास बाबा कबूल असून सगळ्या स्त्री जातीचा आशीर्वाद आपल्याच बाजूला आहे, हें आपण विसरूं नये. हिंदु तरुणांच्या आंगीं हल्लींच्या काळीं कोणत्या प्रकारचें नीतिधैर्य पाहिजे, हें आपण स्वोदाहरणानें दाखविल्यामुळें प्रत्येक हिंदु आपला ऋणी

आहे. आपल्या या साहसाचें अनुकरण सर्व तरुणांकडून झाल्यास प्रवासांत वगैरे स्त्रियांना जो अपमान सहन करावा लागतो, तो लागणार नाहीं. सभेत बृहस्पतीप्रमाणे भाषण करण्यापेक्षां अन्याय आणि अनीतीला अशा रीतीनें सक्रीय प्रतिरोध करणें निःसंशय अधिक कल्याणप्रद आहे, असें बाबांचें ह्मणणे आहे आणि त्या दृष्टीनें सगळे महाराष्ट्रीय आपला गौरव करीत आहेत. असो. पत्रोत्तर पाठवून या खटल्याची एकंदर हकीकत कळवा. पैशाची जरूर असल्यास तसें लिहा. संकोच बाळगूं नका. आह्मी सर्व कुशल आहों. आपणहि आपलें कुशल कळवा. कळावें, ही वि.

आपली मालती.

मालतीचें हें पत्र वाचून पाहून दिनकरच्या चित्तवृत्ति उचंबळून आल्या आणि थोडा वेळ त्याची स्थिति वेड्यासारखी झाली. भुसावळच्या स्टेशनावर त्यानें जें वर्तन केलें होतें, ते कितीहि योग्य असें असलें, तरी त्याचा परिणाम अनिश्चित असा असल्यामुळे सगळ्यांच्या चेहऱ्यावर विषादाची छाया पसरली होती. सगळ्यांना त्याची ही कृति दुःसाहसिक वाटत होती. दुसऱ्यावर परोपकार करतांना स्वतः विपन्न होणें, हे लोकांच्या दृष्टीनें कितीहि चांगले असले, तरी आतस्वकीयांना साहजिक काळजी वाटते आणि या न्यायानें दिनकरला हे विकतश्राद्ध घेतल्याबद्दल जो तो दोष देत होता. त्याचा चुलत भाऊ भास्कर हा स्वभावतःच शांत प्रकृतीचा होता. तस्या बखेड्याचा त्याला फार कंटाळा होता. कोणाला उपसर्ग लावूं नये आणि कोणाचा उपसर्ग लावून घेऊ नये असा त्याचा स्वभाव असल्यामुळें त्याला दिनकरचा अर्थातच राग आला. त्यानें यासंबंधानें दिनकरला दोन उपदेशाच्या गोष्टी सांगून कोर्टांत काम चालविण्यासाठीं वकिलाची व्यवस्थाहि केली. दिनकरची आई तर त्याला शिव्या देऊन गोंजारीतहि होती आणि आलेलें संकट टळावें ह्मणून तिनें देवाला नवसहि केले होते. पत्नीनेंहि द्यावा तसा त्याला उत्साह दिला नव्हता. दिनकरवरच्या निस्सीम प्रेमामुळे तिचें मन या खटल्यानें साहजिक साशंक

झालें होतें आणि तिला कांहीं सुचेनासें होऊन ती नेहमीं काळजींत चूर असलेली त्याच्या दृष्टीस पडे. अशा रीतीनें कुटुंबांतील कोणाकडूनहि त्याला साहानुभूतीचे दोन शब्द ऐकावयाला न मिळाल्यामुळे तो स्वतःस अभागी समजून स्वतःचाच धिःक्कार करीत होता. त्याची मनःस्थिति अशी उद्वेगजनक असतां एकाएकीं मालतीचें पत्र त्याच्या हातीं पडलें आणि तें वाचून पाहून जणूं काय निराशेच्या तुफानांत आशेच्या किनाऱ्याला लाग-ल्याप्रमाणें त्याला वाटलें. पत्रांतील ती भाषा, तिनें दिलेलें धैर्य, तिनें व्यक्त केलेली सहानुभूति, आपल्या कृत्याची तिनें केलेली प्रशंसा वगैरे कारणानें दिनकरचा चेहरा एकाएकीं आनंदी व समाधानी दिसूं लागला. मला माझ्या कुटुंबांतील मंडळीपैकीं कोणीच ओळखूं नये आणि मालतीनें मात्र माझी किंमत ओळखावी, या विचारानें त्याच्या अंतःकरणांत मालती-विषयीं विलक्षण स्नेह उत्पन्न झाला होता. आपणास जर आपल्याच सारख्या काव्यमय विचाराची स्त्री मिळाली असती, तर तिनें आज आपला किती तरी गौरव केला असता; पण तिला तें ज्ञान नसल्यामुळे ती काळजी करीत आहे आणि मालती सुशिक्षित असल्यामुळे आज आपला गौरव करीत आहे, या विचारानें दिनकरची स्थिति मोठी चमत्कारिक झाली. त्यानें आणखी दोन तीन वेळां तरी तें पत्र वाचलें आणि प्रफुल्ल चित्तानें तो दुसऱ्या उद्योगास लागला.

लहान मुलाला एकादें नवीन खेळणें मिळालें ह्मणजे तें जसें ज्याला त्याला दाखवावें असें त्या मुलाला वाटतें, त्याप्रमाणें मालतीकडून आलेलें पत्र घरांतील मंडळीला दाखवून त्यांना लाजवावें असें त्याला वाटलें; पण मालतीचें पत्र चांगल्या रीतीनें वाचून पाहण्याची पात्रताहि घरांतील कोणा-च्या आंगीं नाहीं, असें त्याला वाटूं लागलें. घरांत थोडेसें अधिक शिक-लेली अशी एक उमाच काय ती होती. त्या दिवशीं उमा विठ्ठलमंदिरां-तून बाहेर पडते तोंच दिनकरनें तिला मंदिरासभोंवतीं असलेल्या बागेंत गांठलें आणि तिला हंसत हंसत ह्मणाला, "वैनी, मला तुह्मीं सगळ्यांनीं नांवें ठेवून ठेवून पुरेसें केलें; पण जगांत कांहीं थोडे लोक माझ्या या कृतीचें समर्थन करणारेहि आहेत. हें पत्र तूं वाचून पहा, ह्मणजे ज्या कारणा-

साठीं तुह्मी माझा तिरस्कार करतां, त्याच कारणासाठीं कांहीं माझा सत्कारहि करीत आहेत, हे तुला दिसून येईल. "

दिनकरने दिलेले पत्र काळजीपूर्वक वाचून पाहून उमा ह्मणाली, " भावोजी, कोणी हें पत्र लिहिले? "

पत्र खिशांत ठेवून दिनकर ह्मणाला, " मालतीनें. मुबईला वामनराव नांवाचे एक गृहस्थ आहेत त्यांची ती मुलगी. मदन आणि बसत या नांवाचे तिचे दोन धाकटे भाऊ आहेत, त्या दोघांना मी शिकवीत असतों. केव्हां केव्हां मालतीलाहि शिकवीत असतो. "

" मालती किती वर्षाची आहे? "

" आहे पधरा सोळा वर्षाची. "

उमा आश्चर्यानें ह्मणाली, " पधरासोळा वर्षाची! एवढी मोठी मुलगी काय शिकत असते? तिचे लग्न झाले असेल ? "

" वामनराव सुधारक आहेत. मुलीचे लहानपणीं लग्न करणें त्यांना पसत नाहीं. मुलीला चांगले शिक्षण देऊन मग ते तिचे लग्न करणार आहेत. "

" ह्मणजे! आतां आणखी किती, पचविसाव्या कीं तिसव्या वर्षी तिचे लग्न करणार? बरें, ते असो; पण ती दिसावयाला कशी आहे? "

" मी काय तिला शिकवितांना तिच्या चेहऱ्याकडे पहात बसतों? "

" खरेंच. हे मी अगदीं विसरूनच गेले. तिचा आणि तुमचा गुरु-शिष्याचा संबंध नाहीं का ? "

" खरें सांगावयाचे म्हणजे, तिचा आणि माझा पैशाचा संबंध. त्या तिघांना शिकविण्याबद्दल मला वामनराव पंधरा रुपये देतात. त्यांनी जर मला हे पंधरा रुपये देण्याचें बंद केले, तर हा गुरुशिष्य सबध तुटाव-याला कांहीं वेळ लागणार नाहीं. त्याच्याशीं कांहीं कर्तव्य नाहीं. माझ्या-संबंधाने त्यांना काय वाटते, तें या पत्रावरून पहा म्हणजे झालें."

" या पत्रावरून वामनराव मोठे भले दिसतात. तुमच्या या खट-ल्याला जो कांहीं खर्च लागेल, तो करण्याची त्यांची इच्छा दिसते."

दिनकर बराच उत्साहित होऊन ह्मणाला, " एवढेंच नाहीं, तर माझ्या

वागणुकीनें त्यांना किती अभिमान वाटतो, ते पहा. तुम्ही सगळयांनीं मला नाउमेद करून टाकलें होतें आणि त्यामुळें मी देखील अगदीं निरुत्साह झालों होतों; पण आजच्या या मालतीच्या पत्रानें माझ्या शरीरांत नव्या चैतन्याचा प्रवेश झाल्याप्रमाणें मला वाटतें. वामनराव मोठे उदार व बाणेदार गृहस्थ आहेत. मालतीचा स्वभावहि त्यांच्याचप्रमाणें आहे. ती पत्रांत लिहिते 'सगळे महाराष्ट्रीय आपला गौरव करीत आहेत' आणि इकडे तुम्ही 'वडिलांचें नांव बुडविलें' ह्मणून रडत बसलां आहां. खरो-खर या पत्रानें मला आज किती तरी समाधान वाटत आहे. जें नशिबांत असेल तें होईल; पण माझ्या स्वार्थत्यागाची महती जाणणारें एक तरी हृदय आहे, हें पाहून मला साहजिक आनंद वाटतो."

उमा हंसत हसत ह्मणाली, "भावोजी, तीं परकी माणसें? आम्ही आपल्या आप्त स्वकियांपैकीं, जेथें स्नेह असतो, येथेंच कुशंकाहि उद्भ-वतात. पुढच्या परिणामासंबंधानें आमचीं मनें साशंक होणें साहजिक आहे. आमच्यासारखी परक्यांचीं आतडीं कळवळून यावयाचीं नाहींत. बरें बरें सगळेच ह्मणतील; पण खऱ्या दुःखाचे वांटेकरी आम्हींच आहों."

उमावैनींचें हें ह्मणणें दिनकरला विशेष पटलें नाहीं. तो तिला यावर कांहीं उत्तर देणार होता; पण उमा तेथें थांबलीच नाहीं. ती घरांत जाऊन गृहकृत्यांत दंग झाली; इकडे दिनकरहि माडीवर जाऊन लिहिण्याच्या खोलींत बसला आणि त्यानें मालतीला पुढील पत्र लिहिण्यास आरंभ केलाः—

रामपूर, तारीख—

श्रीमती मालतीबाई यांसः—

प्रेमपूर्वक आशीर्वाद वि. आपण पाठविलेलें कृपापत्र मिळालें. आपलें उत्साहजनक पत्र पाहून जो आनंद झाला, तो पत्रोत्तरानें कळविणें अशक्य होय. आपण माझी जी प्रशंसा करतां तिला मी पात्र आहें, असें मला वाटत नाहीं. एका तरुण स्त्रीची अब्रु राख-ण्यासाठीं मी जो प्रयत्न केला, त्यांत विशेष असें कांहीं नसून मी माझें कर्तव्यच केलें असें वाटतें. या कर्तव्याचे प्रतिफळ कदाचित्

कडू असेंहि मिळेल; पण तें भोगण्यास माझी तयारी आहे. तिकिट-कलेक्टराची कातडी गोरी असून त्यानें माझ्यावर मारहाण केल्या-बद्दलची फिर्याद केली आहे. कदाचित् रेल्वेकंपनीच ही फिर्याद पुढे चालवील असा रंग आहे. तेव्हां ही अलीकडच्या युगांतली डोळस न्यायदेवता माझ्या काळ्या कातडीकडे तिरस्कारानेंहि पाहण्याचा संभव आहे; पण मी त्यासंबंधानें बेफिकिर आहें. आमच्या राष्ट्रांतला प्रत्येक तरुण जर ही भीति न बाळगितां कर्तव्यास सदैव जागृत राहील, तर आमच्या राष्ट्राचा अभ्युदय फारसा लांब आहे. असे कांहीं ह्मणतां यावयाचें नाहीं. शिक्षा भोगण्याचा प्रसंग आल्यास मी ती आनदानें सोशीन. कारण निष्कारण भोगाव्या लागलेल्या शिक्षेनें राष्ट्रांतल्या बाणेदार वृत्तीच्या तरुणांच्या हृदयावर जो आघात होतो, त्याचें फळ पुढें मागें राष्ट्राला चांगलें असेंच मिळतें, असा इतिहासाचा नियम आहे. कसेंहि असो, आपण व आपल्या वडिलांनीं मजबद्दल पत्रांत जी सहानुभूति व्यक्त केली आहे, त्याबद्दल मी आपला चिरकृतज्ञ आहे. माझ्या आप्तस्वकीयांनीं मला या बाबतींत अगदीं नाउमेद केलें होतें. पण आपल्या पत्रानें माझा उत्साह द्विगुणित झाला आहे. आणखी-हि कांहीं गृहस्थांनीं मला मदत करण्याचें कबूल केलें आहे. आपल्या वडिलांनीं पैशाची मदत करण्याचें कबूल केलें आहे; परंतु तिची आवश्यकता नाहीं. जरूर पडल्यास मी या बाबतींत आपणास अवश्य कळवीन. खटल्याचा निकाल होताच आपणास पत्र लिहितों. आपणहि मधून मधून पत्र पाठवून सर्वांचें कुशल कळवीत असावें. मदन व वसंत यांना आशीर्वाद. रा. वामनराव यांना सा. न. प्र. करणें. कळावें.

आपला दिनकर.

हें वरील लहानसें पत्र तयार करण्यास दिनकरला बराच वेळ लागला. मालतीला पत्र लिहावयाचें आहे, या एका कल्पनेनें तो फार काळजीपूर्वक व अलंकारिक असें पत्र लिहीत होता. एकादें वाक्य आवडलें नाहीं, ह्मणजे तें खोडावें

आणि असें खोडाखोडीचें पत्र मालतीला पाठविणें त्याला प्रशस्त न वाटल्यामुळें अर्थातच तीन चार पत्रें त्यानें लिहिलीं आणि वरील पत्र पसंत करून तेंच पाठविण्याचें त्यानें ठरविलें. पत्र पाकिटांत घालून बंद केल्यावर त्यानें जेव्हां घड्याळांत पाहिलें, तेव्हां रात्रीचे दहा वाजले आहेत, असें त्याला दिसून आलें. तो तेथून तसाच उठला आणि निजण्यासाठीं खोलींत गेला. तो येण्याच्या पूर्वींच खोलींत लक्ष्मी येऊन निजली होती व तिला चांगली झोंपहि लागली होती. बाजूला एक लहानसा दिवाहि जळत होता. इतका वेळ दिनकरच्या हृदयदर्पणावर मालतीचीच मूर्ति प्रतिबिंबित झाली होती; पण खोलींत येऊन ती मंचकावर निजलेली रम्य आणि पवित्र मूर्ति जेव्हां त्यानें पाहिली, तेव्हां अर्थातच त्याचें हृदय लक्ष्मीमय होऊन गेलें. आज त्याचें अंतःकरण उत्साहपूर्ण असल्यामुळें त्यानें लक्ष्मीला जागें केलें आणि तिच्याबरोबर अनेक हितगुजाच्या गोष्टी सांगून ती रात्र त्यानें मोठ्या आनंदांत घालविली. दिनकरच्या वर्तनांतला हा फरक लक्ष्मीच्या लक्षांत आला; पण त्याचें कारण मात्र तिला उमगलें नाहीं. गरीब बिचारी निर्बोध बालिका! तिला हें कोडें कसें उकलणार? तिला काव्याची गोडी नव्हती. प्रतिभेची आणि तिची ओळख नव्हती. साधें वागणें आणि पवित्र आचरण एवढेंच तिला माहीत होतें.

पुढच्या सोमवारीं भुसावळ येथील म्याजिस्ट्रेटच्या कचेरींत दिनकरचा खटला सुनावणीस निघावयाचा असल्यामुळें दिनकर अर्थातच त्या दिवसाची वाट पहात होता आणि त्याप्रमाणें तो भुसावळ येथें जाऊन दाखल झाला. धुळ्याचे वकील नारायणराव जोशी, हे त्याला स्टेशनावरच भेटले. दोघांनीं परस्परास नमस्कार केल्यावर नारायणराव म्हणाले, "दिनकरराव, आपणास निष्कारण हेलपाटा पडला. आपल्या तिकिटकलेक्टर साहेबांनीं फिर्याद काढून घेतली आणि स्वतः तिकिटकलेक्टरहि कामावरून दूर झाले."

दिनकर हंसत हंसत आश्चर्यानें म्हणाला, "असें कांहीं होईल, अशी मला कल्पना नव्हती. मी तर ऐकत होतों कीं, ही फिर्याद स्वतः रेल्वेकंपनीच चालविणार."

"होय. तसा आग्रह स्टेशनमास्तरनें धरला होता; पण वर्तमानपत्रां-

तल्या टीकेच्या भडिमारानें असिस्टंट ट्रॅफिक सुपरिंटेंडेंट खडबडून जागे झाले आणि ते स्वतःच भुसावळला येऊन चवकशी करून गेले. चवकशी अतीं त्यांना तिकिटकलेक्टरचेंच वर्तन निंद्य दिसून आलें. तेव्हां त्यांनीं त्याला बडतर्फ करून फिर्याद काढून घेतली. यामुळें मीहि आपली फिर्याद काढून घेतली." ही हकीकत ऐकून दिनकरला अर्थातच आनंद झाला. तो तसाच परतणार होता; पण नारायणरावांनीं फार आग्रह केल्यामुळें तो गांवांत गेला व जेवण वगैरे करून नंतर रामपुरास परत गेला. दिनकरकडून ही हकीकत घरांत समजल्यावर सगळ्यांना आनंद झाला, हें निराळें सांगावयाला नको; पण त्याबरोबरच दिनकरची ओतप्रोत स्तुतीहि सुरू झाली. 'दिनकर असें केव्हांहि करणार नाहीं, असें मी पूर्वींच म्हणालें होतें' म्हणून यमूना म्हणाली, 'ही सगळी कुलस्वामिनीची कृपा' असें यशोदा म्हणाली. 'या खटल्याचें कांहीं होणार नाहीं, असें मी पूर्वींच म्हणालों होतों.' म्हणून भास्करराव म्हणाले. एकंदरींत सर्वच रंग पालटून विसूकाकांच्या घरावरची उदासीनता पार नाहींशी होऊन गेली आणि जो तो दिनकरला शाबासकी देऊं लागला. या एकंदर प्रकाराकडे दिनकरचें मुळींच लक्ष नव्हतें असें म्हटलें तरी चालेल. मालतीला ही हकीकत केव्हां कळवीन असें त्याला झालें होतें. थोडासा अवकाश मिळतांच या खट-ल्याची हकीकत त्यानें मालतीला कळविली. या पत्रांत खटल्याच्या हकी-कतीशिवाय थोडें काव्य नव्हतें असें कांहीं नाहीं. चार सहा दिवसांनीं या पत्राचें मालतीकडूनहि उत्तर आलें. त्या पत्रांत शेवटीं तिनें लिहिलें होतें कीं, "एकंदरीनें या खटल्यात आपणच यशस्वी झालां, असें म्हणावयाला कांहीं हरकत नाहीं. आपण अशा यशस्वी स्थितींत आम्हां सर्वांना दर्शन द्यावें अशी माझी फार इच्छा आहे. परीक्षेचा निकाल कळल्यावर आपलें येणें मुंबईला होईलच. आपल्या समक्ष भेटीनें आम्हां सर्वांना खरोखर फार आनंद होईल." या पत्रानें दिनकरला साहजिक मोठें समाधान वाटलें. दिनकरनेंहि या पत्रास असेंच काव्यमय उत्तर पाठविलें. "निरा-शेनें उद्विग्न झालेल्या हृदयावर आपल्या पत्रानें जो परिणाम झाला आहे, तो कळविण्यास योग्य असे शब्द मला आठवत नाहींत. रोग्यास अमृतानें

जितकें बरें वाटतें, तितकेंच समाधान मला आपल्या पत्रानें होतें. आपल्या प्रमाणें माझेहि डोळे आणि मन हीं आपल्या दर्शनासाठीं आतुर झालीं आहेत. परिक्षेचा निकाल लवकरच समजेल आणि तो समजल्याबरोबर मी मुंबईस येणार आहें. या दरम्यान आपणाकडून अशींच उत्साहजनक एक दोन तरी पत्रे येतील, अशी मला आशा आहे. ''

याप्रमाणें दिनकरचा आणि मालतीचा पत्रव्यवहार सुरू होऊन दिनकरला आतां मालतीच्या पत्राची विलक्षण उत्कंठा वाटूं लागली. पोस्टाच्या शिपायानें घरीं पत्र आणून देण्याची देखील दिरंगाई त्याला आतां सहन न होऊन तो स्वतःच डांकेच्या वेळेवर पोस्टांत जाऊन हजर होऊं लागला. पोस्ट ऑफीस ह्मणजे त्याला आता एकाद्या तीर्थस्थानाप्रमाणें पवित्र वाटूं लागलें. दिनकरनें आपल्या मनाची ही पालटलेली स्थिति कोणाच्या लक्षांत येऊं नये ह्मणून बरीच काळजी घेतली होती; तथापि तीक्ष्ण बुद्धीच्या उमाच्या लक्षांत दिनूभावोजीची ही चलबिचल आल्यावांचून राहिली नाहीं. मालतीच्या पत्रव्यवहारांत कांहीं तरी जादू आहे आणि त्यामुळे दिनुभावोजी लोभवश झाले आहेत, असें वाटून तिनें या गोष्टीचा बंदोबस्त करण्याचें योजिलें. एके दिवशी दुपारच्या वेळीं उमा लक्ष्मीच्या खोलींत गेली आणि झोपी गेलेल्या लक्ष्मीला जागें करून ह्मणाली, '' लक्ष्मी, तूं अगदींच अजाण पोर. वेडे, तुझी चोरी झाली, तरी तुला कांहीं त्याची माहिती नाहीं.''

लक्ष्मी खरोखरच अगदी सरळ प्रकृतीची मुलगी होती. तिला या असल्या अलंकारिक बोलण्याचा कांहीं अर्थ समजला नाही. ती हंसत हंसत ह्मणाली, '' माझें आणि तुमचें असें वाटलेलें थोडेंच आहे. माझें ते तुमचें आणि तुमचें तें माझें. आतां सांगा पाहू काय चोरीला गेलें तें? ''

उमा किंचित् तिच्या जवळ सरकून ह्मणाली, '' लक्ष्मी, भावोजींना आपल्या मुठींत ठेवण्याचें कांहीं तुला साधत नाहीं. त्यांचें मन तुझ्या ताब्यांत नसल्यामुळें तें दुसरें कोणी नेणार नाहीं का ? ''

उमाचे हे शब्द ऐकून लक्ष्मीचा चेहरा किंचित् खिन्न झाला. ती ह्मणाली, '' उमाताई, स्वतःचें मन देखील स्वतःच्या ताब्यांत रहात नाहीं

मग दुसऱ्याचें मन मी कसें ताब्यांत ठेवणार ? ती काय कडीकुलुपांत ठेवण्यासारखी वस्तु आहे ? "

" कुलुपांत ठेवण्यासारखी वस्तु नाहीं हें खरें; पण त्यावर पाहरा ठेवावयाला नको का ? नुसती डोळ्यांची नजर तरी ठेवायला हवी."

" ते आपलें स्वतःचें मन संभाळावयाला असमर्थ आहेत, नाहीं ? "

" होय. असें मला तर वाटतें. तूंच सांग ते तुझ्यावर पूर्वीसारखें प्रेम करतात ? "

लक्ष्मी लाजून ह्मणाली, " हे काय विचारतां ! मला तर वाटते त्या बाबतींत माझ्यासारखी नशीबवान् कोणीच नाहीं."

" छेः ! मला नाहीं तसें वाटत. अलीकडे त्यांचें मन अस्वस्थ आहे, असें मला वाटतें. पूर्वी भावोजी सुट्टींत घरीं आले ह्मणजे केव्हां रात्र होईल आणि तुझ्या खोलींत जाईन असें त्यांना होत असे; पण आतां माडीवर जाऊन रात्रीचे लिहीत काय बसतात, नी वाचीत काय बसतात, त्याकडे तुझें लक्ष आहे ? "

" त्यांना लिहिण्या वाचण्याचा विशेष नाद आहे, तेव्हां त्या बाबतींत त्यांना कसा दोष देऊं ? माझें असावें तसें लिहिण्यावाचण्याकडे लक्ष नाहीं, ह्मणून त्यांना किती तरी वाईट वाटतें. केव्हां केव्हां ते रागावतात देखील."

" मीं त्यांना काल ह्मटलें, भावोजी, आतां रात्रीचे दहा वाजून गेले, जा जाऊन निजा, तर मला ह्मणाले, 'मला लवकर झोंप येत नाहीं.' मीं ह्मटलें, 'मग झोंप लागेपर्यंत गप्पा गोष्टी सांगत बसा.' तेव्हां ह्मणाले, 'तुह्मी तुमच्या धाकट्या जाऊबाईला त्या विद्येंत अगदींच मागें ठेवलें आहे.' त्यावरून मीं ओळखलें कीं तुझ्याशीं ते कांहीं मोकळ्या मनानें वागत नाहींत. तूंच सांग बरें, ते अलीकडे मोठ्या आतुरतेनें पोस्टांत कां जातात ? "

" आलेलें पत्र आणण्यासाठीं."

" पण तें पत्र कोणाचें तें तुला माहीत आहे ? "

" बहुतकरून त्यांच्या स्नेह्यांचीं पत्रें असावींत. लग्नाच्या वेळीं जे स्नेही आले होते, त्यांच्याविषयीं ते अनेक गोष्टी मला सांगतात."

" छेः! तूं अगदींच भोळी आहेस. त्यांना कोणाचीं पत्रें येतात, तें मला माहीत आहे. एक पत्र मीं पाहिलें देखील होतें."

लक्ष्मी केंविलवाण्या स्वरानें ह्मणाली. " उमाताई, मला सांगाना कोणाचीं पत्रें येतात ते."

" तें तुला मी मग सांगेन. त्या आधीं तू एक काम कर. आजरात्रीं भावोजींना ह्मणावें, तुम्ही मुंबईला ज्या मुलांना शिकवायला जातां, त्यांना शिकवावयाला जात जाऊं नका. "

" पण ते माझें कसें ऐकतील ? ते ह्मणतील तेथें पंधरा रुपये शिकवणीचे मिळतात, तें नुकसान मी कां करून घेऊं ? "

" तू त्यांना सांग कीं, त्या रुपयांची तजवीज घरांतून होईल ह्मणून."

लक्ष्मी क्षणभर स्तब्ध राहिली. नंतर खिन्नतेनें म्हणाली, " उमाताई, तुम्ही हें सगळें मला उलगडून सांगाल तर माझ्यावर फार उपकार होतील. तेथें त्यांनीं शिकवायला जाऊं नये, असें तुम्हाला कां वाटतें ? "

उमाहि क्षणभर स्तब्ध राहून उद्विग्नतेनें म्हणाली, " लक्ष्मी, मोठेंसें काळजी करण्यासारखें नाही; पण दिनुभावोजींना आतांच सावध केलेलें बरें. तुझ्या सौंदर्याप्रमाणे तुझा स्वभावहि सुंदर असल्यामुळें अर्थातच जगाची पारख करण्यास तो समर्थ नाहीं आणि म्हणूनच तुला दिनुभावोजींच्या स्वभावाचें निरीक्षण करतां येत नाहीं. अंतःकरणांतल्या पूज्य भावनेमुळें त्यांचें प्रत्येक करणें तुला चांगलेंच दिसतें. ते मुंबईला ज्या वामनरावांच्या घरीं मुलांना शिकवायला जातात, त्यांना सोळा सतरा वर्षांची मालती या नांवाची अविवाहित मुलगी आहे. या मुलीलाहि दिनुभावोजी शिकवीत असतात. तिलाच दिनुभावोजी वारंवार पत्र पाठवीत असतात आणि तीहि त्यांना पत्रावर पत्रें पाठवीत असते."

लक्ष्मी उदासीनतेनें म्हणाली, " पाठवीना बिचारी. त्याच्याशीं मला काय करावयाचें आहे ? "

उमा किंचित् रागानें म्हणाली, " त्याच्याशीं तुला काय करावयाचें आहे ? लक्ष्मी, तुला वेड तर नाहीं लागलें ? ती तरुण, भावोजीहि तरुण; तेव्हां त्या दोघांच्या पत्रव्यवहाराचा तुला कांहींच अर्थ समजत नाहीं ना ? "

निराशेनें एक दीर्घ श्वास सोडून लक्ष्मी म्हणाली, " ती काय त्यांच्या वर प्रेम करते ? "

" तें मी काय सांगूं ? मला जें समजलें तें मीं तुला सांगितलें. तुझें घर तुला सांभाळावयाचें असल्यास सांभाळ ! "

" पण ते वामनराव तर सुधारक आहेत ? ते कांहीं मालतीचा त्यांच्या-बरोबर विवाह होऊं देणार नाहीत. "

" वेडे, विवाहावांचून दोघांत प्रेमभाव कांहीं वाढणार नाहीं ना ? लक्ष्मी, तू खरोखरच फार भोळी आहेस. ते वामनराव पक्के सुधारक आहेत हें मला समजलें आहे. एक बायको असतां दुसरी करण्यास या सुधारकांनीं पूर्ण प्रतिबंध घातला आहे, पण त्याबरोबरच स्त्रीपुरुषांना एकमेकांत मिस-ळण्यास त्यांनीं पूर्ण मोकळीक ठेवली आहे. यामुळें केव्हां केव्हां फार विलक्षण प्रकार होतात. "

हें ऐकून क्षणभर लक्ष्मी स्तब्ध बसली होती. नंतर डोळ्यांत पाणी आणून म्हणाली, " उमाताई, तुम्ही म्हणतां ते सगळे खरें; पण त्यांना मी आपल्या मुठींत ठेवीन असे माझ्या आंगीं तरी कोणते गुण आहेत ? जें नशिबांत असेल, तें होईल ! "

लक्ष्मीचे हे शब्द ऐकून उमाच्याहि डोळ्यांतून दोन अश्रू गळाले. तिनें लक्ष्मीला आपल्या हृदयाशीं कुरवाळून धरून तिचे डोळे पुसले आणि ती मनोमय परमेश्वराची करुणा भाकून म्हणाली, " देवा, या सोन्याच्या पुतळीची माती न होवो, म्हणजे झालें ! "

यानंतर लवकरच परिक्षेचे निकाल प्रसिद्ध झाले व त्यांत दिनकर, दिवाकर व दिनकरचे तिघे स्नेही पास झाल्याचें समजलें. या बातमीनें अर्थातच सगळ्यांना आनंद झाला. या वेळींहि मालतीनें दिनकरला पत्र पाठवून गोड गोड शब्दांनीं तिनें त्याचें अभिनंदन केलें. दिनकरनेंहि पत्रोत्तर पाठवून कृतज्ञता प्रगट केली. हळू हळू हे सुटीचे दिवस संपत आल्यावर पुढील योजनेसाठीं दिनकरनें मुंबईस जाण्याची पुन्हां तयारी केली. दिवाकरहि त्याच्याच बरोबर मुंबईस जाणार होता. दुसऱ्या दिवशीं दिनकर आतां मुंबईला जाणार असें जेव्हां नक्की ठरलें, तेव्हां आज सांगेन

उद्यां सांगेन अशा विचाराने सांगण्यास कचरणाऱ्या लक्ष्मीनें मोठें धैर्य केलें आणि दिनकर रात्रीं खोलीत आल्यावर मोठ्या कष्टाने तिनें त्या नांव-डत्या विषयासंबंधानें बोलण्यास आरंभ केला. ती म्हणाली, " तुम्ही मुंबईहून परत केव्हां येणार ? "

" लवकरच येईन असे म्हणतों. दिवाकराच्या पुढील 'कोर्स' ची व्यवस्था करावयाची आहे. तसेच मी पुढे काय करावयाचें हेंहि ठरवा-वयाचें आहे. पुढें शिकावयाचें ठरल्यास मी तेथेंच राहीन; पण कांहीं नौकरीचा योगायोग आल्यास मग मात्र घरीं कांहीं दिवस राहून नतर नौकरीवर जाईन. जर रामपुराला परत येण्याचे ठरले, तर तुझ्यासाठीं काय आणू ? "

लक्ष्मी म्हणाली, " मला कांहींहि आणूं नका. तुम्ही इकडे येऊन कांहीं दिवस रहावे, एवढीच माझी इच्छा आहे; पण जर मुंबईस रहा-वयाचें ठरले तर—"

लक्ष्मी इतकेंच म्हणून थांबली. पुढे तिची जीभच हलेना. लक्ष्मीला बोलतांना मध्येंच थांबलेली पाहून दिनकर हंसत हंसत म्हणाला, " मुंब-ईला रहावयाचें ठरले तर काय ? "

" तुम्हांला कांहीं मी सांगणार आहे; पण तुम्ही माझे म्हणणें ऐकाल का ? "

" हो अवश्य. पण ऐकण्यासारखें असल्यास. तूं भलतेंच कांहीं सांगि-तल्यास मी कसें ऐकूं ? "

" मी भलतेंच कशाला सांगूं; पण मी चांगलें सांगितले, तर ते तुम्ही ऐकाल ना ? "

पुन्हां पुन्हां लक्ष्मीचा तोच प्रश्न ऐकून दिनकरला साहजिक आश्चर्य वाटलें. तो म्हणाला, " तुझें काय म्हणणें आहे, तें तर मला अगोदर सांग; मग ऐकावयाचें कीं न ऐकावयाचें तें मागाहून ठरवितां येईल. "

लक्ष्मी लाजत लाजत म्हणाली, " तुम्ही मुबईला ज्या गृहस्थांकडे मुलांना शिकवायला जात असतां, त्या गृहस्थांकडे जात जाऊं नका. "

लक्ष्मीचे हे शब्द ऐकून दिनकर एकाद्या अपराध्याप्रमाणें लज्जित झाला.

तथापि तो भाव मुखावर न दाखवितां दिनकर म्हणाला, " त्यांच्या मुलांना शिकविण्यांत दोष तो कोणता ? शिवाय ती शिकवणी सोडली असतां दरमहा पधरा रुपयांचें नुकसानहि होणार ! "

" पण तुम्हाला कांहीं जन्मभर शिकवण्याच करून रहावयाचें नाहीं ना ? गेल्याबरोबर कोठें तरी नौकरीची व्यवस्था करा. नौकरी लागेपर्यंत अड-चण असली तर माझी मोहनमाळ मोडून ती अडचण दूर करा. मी ती घालीत नाहीं, हे तुम्हाला माहीत आहेच. "

लक्ष्मीकडून अशा प्रकारची सल्ला मिळेल, अशी दिनकराला कल्पनाहि नसल्यामुळे तो साहजिकच गोंधळून गेला. तो जिला अज्ञान समजत होता, त्याच लक्ष्मीने ही अगदीं साधी गोष्ट सुचवितांच दिनकरचें चित्त बावरल्या-सारखें झाले. आपल्या स्वतःच्या मनःस्थितीचा टाव लक्ष्मीनें काढला कीं काय? अशीहि त्याला भीति वाटू लागली. तो म्हणाला, " तुझा दागिना विकण्याबद्दल तुला विशेष वाईट वाटावयाचें नाहीं; पण तसें करतांना मला किती वाईट वाटेल, याची तुला कल्पना नाही. उलट उमावैनींना मोहनमाळ करण्यासाठीं मी कांहीं तरी उद्योग करणार आहें. तो न करतां घरांतली एक माळ नाहींशी करणे, हे किती बरें मला लाजिरवाणें आहे! "

" ते कांहींहि असो, तुम्ही वामनरावांच्या घरीं यापुढे जाऊ नका म्हणजे झाले. "

" कां ? "

लक्ष्मी यावर कांहीं बोलली नाहीं. ती थोडा वेळ स्तब्ध राहून नतर म्हणाली, " तुम्हाला वारंवार पत्रे कोणाचीं येतात ? "

लक्ष्मीचा हा प्रश्न ऐकून दिनकरचा चेहरा निरुत्तर झाल्यासारखा दिसला. पण गप्प राहिल्यास लक्ष्मीला अधिकच संशय येईल, असें जाणून तो मोठ्या सफाईनें ह्मणाला, " पत्रें अनेकांचीं येतात. रामभाऊ, विश्व-नाथ, पांडुरंग हे सगळेच मधून मधून पत्रें पाठवितात."

" आणि मालतीचें पत्र येतें कीं नाहीं ? "

आतां मात्र दिनकरचा चेहरा एकाद्या अपराध्याप्रमाणें खिन्न दिसूं लागला. तो आश्चर्य दाखवून ह्मणाला, " मालतीचें पत्र ? तुला कोणी सांगितलें ? "

" कोणी सांगितलें नाहीं. तुह्मी सांगावयाला पाहिजे; पण तुह्मी मला कांहींच सांगत नाहीं. तुमच्या विश्वासाला मी तितकी पात्रच नाहीं. आतां तरी सांगा मालतीकडून पत्रावर पत्रें येतात कीं नाहीं तें ?"

अशा प्रकारें हृदयावर लक्ष्मीकडून आघात होतील, अशी दिनकरला कल्पनाहि नसल्यामुळें लक्ष्मीच्या या प्रश्नानें त्याची स्थिति मोठी नाजुक झाली. तो ह्मणाला, " ती मला केव्हां केव्हां पत्र लिहिते, ह्मणूनच मला वाटते तिच्या येथली शिकवणी तूं सोडावयाला सांगतेस ?"

" होय. केवळ तेवढ्याचसाठीं नाहीं, तर तुमच्या स्वतःच्या कल्याणासाठीं. माझ्याविषयीं तुमच्या अंतःकरणांत जर खरोखरच दयामाया असेल, तर वामनरावांच्या घरीं न जाण्यांतच आपणा दोघांचा फायदा आहे."

असें ह्मणतां ह्मणतांच लक्ष्मीचे डोळे पाण्यानें भरून आले. आतां मात्र दिनकरच्यानें राहवेना. तो तिला आपल्याजवळ घेऊन आणि तिचे डोळे पुसून ह्मणाला, " हे तुला उमावैनीनें कांहीं तरी सांगितलेलें दिसतें. मालतीनें पत्रें पाठविलीं ह्मणून त्यांत बिघडतें कोठें ? तूं पाहिजे तर स्वतः तीं सगळीं पत्रें वाचून पहा म्हणजे तूं संशयाला कशी बळी पडली आहेस, तें तुझें तुलाच समजून येईल."

यावर लक्ष्मी क्षणभर स्तब्ध राहिली. नंतर ह्मणाली, " ती मालती फार सुंदर असेल नाहीं ? "

" छेः ! सौंदर्याच्या बाबतींत ती तुझ्या पासंगाला देखील लागावयाची नाहीं. तूं तिच्यापेक्षां किती तरी सुंदर दिसतेस ! "

" तर मग तुम्ही तिच्यावर एवढें प्रेम कां करतां ? "

" मी तिच्यावर प्रेम करतों ? अगदीं खोटी गोष्ट. तिच्याकडे तशा दृष्टीनें पाहण्याची मला अजून बुद्धीच झाली नाहीं. तिचा माझा संबंध केवळ पंधरा रुपये पगाराचा. "

" तेवढाच संबंध असेल, तर तेथली शिकवणी सोडून दुसरीकडे शिकवणी धरा. ती शिकवणी न सोडण्याचा तुमचा तरी एवढा आग्रह कां ? "

लक्ष्मीला आपल्या हृदयाशीं कुरवाळून दिनकर ह्मणाला, " तुझ्या डोक्यांत हें कांहीं तरी खूळ शिरलें आहे, आणि या वेळीं जर मी ही

शिकवणी सोडली, तर तुझा आणि तुझ्याबरोबर घरांतील इतरांचा संशय अधिकच बळकट होईल. मालतीच्या भयानें ही शिकवणी मीं सोडली, असें दुसरेहि ह्मणतील. ह्मणून कांहीं दिवस गेल्यावर ही शिकवणी मी सोडीन. तुला उगीच कोणी तरी कांहीं सांगितलें आहे, त्यावर तूं मुळींच विश्वास ठेवूं नकोस. तुला हें सगळें उमावैनीनें शिकविलें असावें. मालतीकडून आलेलीं पत्रें तिला मी दाखविलीं होतीं. आता तूंच असा विचार करून पहा कीं, त्या पत्रांत जर तसें कांहीं संशयास्पद असतें, तर तीं पत्रें उमावैनीला दाखविलीं असतीं कां ? ' एका तरुण मुलीनें लिहिलेलीं पत्रें ' एवढ्यावरून ही कांहीं तरी भलतीच इमारत उमावैनीनें रचलेली दिसते. तेव्हां यासंबंधानें तूं कांहीं देखील मनांत आणूं नकोस. नीज आतां. रात्र बरीच झाली. "

दिनकरचे हे शब्द ऐकून लक्ष्मीनें आंथरुणाला पाठ लावली आणि तिला झोंपहि लागली; पण दिनकरला मात्र त्या रात्रीं चांगली झोंप लागली नाहीं. अपराधा मागून अपराध आपण करीत चाललों आहों, ही जाणीव त्याच्या अंतःकरणाला जेव्हां उत्पन्न झाली, तेव्हां त्याचें चित्त साहजिक व्यग्र झालें. जिनें आपणावर सर्वस्वी विश्वास टाकला आहे, तिच्याशीं आज आपण वंचना केली, हें शल्य त्याच्या हृदयास सारखें बोंचत राहिल्यामुळें ती रात्र दिनकरला आंथरुणावर झोंपेवांचून काढावी लागली. निर्मळ अंतःकरणाच्या लक्ष्मीला मात्र गाढ झोंप लागली होती. पतीचें हृदयकपाट निष्कपट आहे हें त्या साध्या व सरळ प्रकृतीच्या लक्ष्मीला दिनकरनें भासविल्यामुळें बिचारी स्वतःस धन्य मानून सुखस्वप्नें पहात होती. या स्वप्नसृष्टींत दिनकरनेंहि थोडासा संचार केला नाहीं, असें कांहीं नाहीं; पण मालतीनें ते वाजाच्या पेटींतून सप्तस्वराचे मधुर अरोहावरोह काढावेत तोंच तेथें लक्ष्मीचा विजेप्रमाणें प्रवेश होई आणि त्यामुळें दिनकर त्या स्वप्नांतून खडबडून जागा होत असे.

## प्रकरण आठवें.



दिनकर व दिवाकर मुंबईस येऊन पोहोंचल्यावर एक दोन दिवसांच्या आंत रामभाऊ, विश्वनाथ व पांडुरंग या तिघांना मालतीचा व दिनकरचा कांहीं पत्रव्यवहार झाल्याचे समजलें व तो पाहण्यासाठीं या तिघांनींहि दिनकरला विशेष गळ घातली. हें एक दिनकरला मोठें संकटच वाटलें. पत्रव्यवहार दाखवूं नये, तर त्यांना विलक्षण संशय येणार आणि दाखवावा तर नसते श्लेशार्थ काढून या सगळ्यांची भयंकर टीका सुरू होणार; अशा दुहेरी अडचणींत दिनकर सांपडला होता. पण या पत्रव्यवहारासंबंधानें त्याला थोडा अभिमान वाटत होता, हेंहि येथें सांगितलें पाहिजे. एका सुशिक्षित तरुणीनें आपणाशीं पत्रव्यवहार करून आपला कसा गौरव केला, हें त्या तिघांच्या दृष्टोत्पत्तीस आणावें असेंहि त्याला वाटत होतें. अशी गुंतागुंतीची दिनकरची मनस्थिति असतां त्या तिघांनीं फार आग्रह केल्यावर थोड्या अभिमानानेंच तो पत्रव्यवहार त्यानें त्या तिघांना पाहण्यासाठीं दिला. तीं सगळीं पत्रें क्रमानें व व्यवस्थितपणें एका सुंदर रेशमी रुमालांत गुंढाळलेलीं पाहतांच त्या पत्रांना दिनकर किती महत्व देत आहे, हें त्या तिघांच्याहि लक्षांत आलें. रामभाऊ तो रुमाल पाहून हंसत हंसत ह्मणाला, "दिनकर, रुमाल मोठा छान आहे रे; पण या पत्रांना गंध फुलें कां वाहिलीं नाहींस?"

पांडुरंग ह्मणाला, "भलतेंच कांहींतरी. तीं सुधारकाच्या मुलीचीं पत्रें. त्या पत्रांची जर गंधपुष्पांनीं पूजा केली, तर तें एक प्रतिमापूजनच झालें, आणि सुधारक तर प्रतिमा पूजनासारखा मोठा अपराध केव्हांच करीत नाहींत. अर्थात् मालतीला जी गोष्ट बरी वाटणार नाहीं. ती दिनकर कशी करील?"

विश्वनाथ ह्मणाला, "गड्यानों, थोडा वेळ गप्प बसा. मला हीं पत्रें शांतपणें वांचू द्या." असें ह्मणून विश्वनाथानें तीं पत्रें क्रमानें वाचण्यास आरंभ केला. सगळीं पत्रें काळजीपूर्वक वाचून पाहिल्यावर तो ह्मणाला, "कां दिनकर. कसें काय आहे? 'डोन्ट फॉल इन लव्ह वुइथ हर. असें

मी तुला पूर्वींच ह्मणालों नव्हतों ? या सगळ्या पत्रांचा रंग मला तर कांहीं निराळाच दिसतो. विस्तवाजवळ तूप घट्ट राहणें, हें अपरिहार्य आहे."

विश्वनाथाचे हे शब्द ऐकून सगळे मोठ्यानें हसले. दिनकर मात्र गंभीर स्वरानें ह्मणाला, "उगीच तर्क वितर्क लढवून त्या सुशिक्षित तरुणीसंबंधानें तोंडाला येईल ते बोलूं नका. तिच्या हातचीं पत्रें आहेत, त्यावरून काय पहावयाचें असेल ते पहा."

रामभाऊ ह्मणाला, "अहाहा, जणूं काय आह्मी हा जसा एकाद्या महान पतिव्रता स्त्रीचाच अपमान केला. परक्या पुरुषाला हात हात लांबीचीं पत्रें लिहिणाऱ्या स्त्रीला मान अभिमान असतो कीं नाहीं, याचीच मला शंका आहे."

पांडुरंग ह्मणाला, "ती तरुणी कितपत विकारवश झाली असेल, तें ईश्वरास माहीत; पण तीं पत्रें ठेवण्याची तऱ्हा, त्या तरुणीविषयींचा अभिमान आणि या पत्रव्यवहाराचा दिनकरचा अहंकार, इतकीं एकत्र केलीं ह्मणजे दिनकर मात्र विकारवश झाल्याचें स्पष्ट दिसतें. दिनकर, सांभाळ. तूं आपलें स्वतःचें तर नुकसान करून घेशीलच; पण त्या घरच्या गृहदेवतेचें तूं नुकसान करीत आहेस, याबद्दल आह्माला फार वाईट वाटतें. बरें, त्या सुशिक्षित तरुणीचा तरी कांहीं फायदा करून देशील, तर तसें देखील मला वाटत नाहीं. तिचेंहि तूं नुकसानच करणार, असें मला पुढचें भविष्य दिसूं लागलें आहे. उगीच काव्यमय कल्पनानीं वेडा होऊन सगळयांच्याच सुखावर पाणी ओतूं नकोस."

आपण कांहीं चुकत आहों अशी दिनकरची कल्पनाच नव्हती. त्याला आपल्या स्नेह्यांचें हें ह्मणणें अर्थातच पसंत पडलें नाहीं; पण त्यांना काय उत्तर द्यावें, हेंहि त्याला सुचेना. तो कांहींसें त्रासल्यासारखें करून ह्मणाला, "काव्यमय कल्पनांनीं सुखावर पाणी ओतलें जातें; हा एक नवीनच शोध दिसतो. माझी तर अशी समजूत आहे कीं त्यामुळें सुखाची वृद्धि होते."

विश्वनाथ ह्मणाला, "दिनकर सुखाची वृद्धि होते हें खरें; पण ती कोठें, तर स्वप्नसृष्टींत. प्रत्यक्ष व्यवहारांत सुखापेक्षां दुःखच अधिक मिळेल.

तूं या सुखाच्या मागें लागतां लागतां अखेरीस कोठें जाऊन पडशील, तें परमेश्वराला माहीत. वास्तविक व्यवहार असा आहे कीं, सुख हें समाधानांत आहे. परमेश्वरानें जी स्थिति दिली असेल, त्या स्थितींतच सुखानें रहावयाचें, ही आह्मां आर्यांची प्रवृत्ति आहे; आणि सुखाचा शोध करीत हिंडावयाचें ही संस्कृति अलीकडे पाश्चात्त्यांपासून कित्येकांनीं उसनी घेतली आहे; पण ज्या संस्कृतीनें पाश्चात्त्यांतच अनेक कलह निर्माण करून ठेवले आहेत, त्या मार्गाला संस्कृति ह्मणून ह्मणण्याची देखील लाज वाटते. पाश्चात्त्यांचें अनुकरण आम्ही अनेक बाबतींत करावयास पाहिजे; पण आमचें मानसिक स्वास्थ्य नाहींसें होईल. असल्या अनुकरणांना मात्र आम्ही शिवतां देखील कामा नये. तरुण स्त्री—पुरुषांनी एकमेकांशीं सलगीनें वागणें, हें दुरून कितीहि गोड दिसलें, तरी युक्त नाहीं. आपल्या कानावर प्रत्यहीं अशा गोष्टी किती तरी येतात. परक्या स्त्रीशीं एकांतांत बोलत बसणें, तिला बाहेर फिरावयाला घेऊन जाणें वगैरे प्रकार आरंभीं मोहक वाटले, तरी शेवटीं भयावह होतात. मनाचा निग्रह हा एक पौरुषाचा भाग आहे. बंधुभगिनी समाज एकत्र करणें ही पुष्कळांना सुधारणा वाटते; पण या सुधारणेचीं कडू फळें आतां स्पष्ट दिसूं लागलीं आहेत.”

यावर चांगलें सणसणीत उत्तर देण्याच्या ऐटीनें दिनकर ह्मणाला, “तुह्मी अगदीं क्षुद्र बुद्धीचे आहां. या बुद्धीनें कोणत्याहि गोष्टीचा विचार केल्यास तुह्मांला चांगलें असें कांहींहि दिसणार नाहीं.”

पांडुरंग हंसत हंसत ह्मणाला, “अरे, आपण सगळे क्षुद्र बुद्धीचे आणि हा उदार बुद्धीचा. याचें अंतःकरण खरोखरच मोठें आहे. तसें नसतें तर त्यांत दोन तरुणींच्या प्रतिमेचा कसा समावेश झाला असता?”

हें ऐकून सगळ्यांना हंसूं आलें. रामभाऊ ह्मणाला, “मला वाटतें हा आमच्याहिपेक्षां क्षुद्र बुद्धीचा आहे. त्या मालतीशीं थोडें संघटन होतांच यानें स्वतःच्या गृहलक्ष्मीची अवहेलना मांडली आहे. हे समाजसुधारक स्त्रियांचा किती सन्मान ठेवतात, हें जर कोणास पहावयाचें असेल, तर तें याच्या स्त्रीला विचारलें असतां स्पष्ट दिसून येईल. दिनकर, झालें

तें झालें. आतां यापुढें तूं वामनरावांच्या येथें शिकवायला जाऊं नकोस ह्मणजे झालें."

दिनकर स्वतःच्या स्त्रीची अवहेलना करीत आहे, असा आरोप जेव्हां या विद्यार्थ्यांनीं दिनकरवर केला, तेव्हां दिनकरचा चेहरा खरकन् उतरला. त्याच्या हृदयालाहि ते शल्य बोचत होतें. अपराध कबूल करून मोकळें व्हावें; असें त्याला या वेळीं वाटलें. तो ह्मणाला, "ही शिकवणी सोडण्याचा उपदेश आमच्या राणीसरकारनेंहि मला केला."

विश्वनाथ ह्मणाला, "तर आपला प्रेमोदधि कोणत्या चंद्रिकेला पाहून उसळ्या मारतो, हे तिला समजलें तर? ठीक झालें."

दिनकर ह्मणाला, "प्रथम तिला नुसता सशयच आला होता; पण उमावैनीकडून अथवा कशा तरी रीतीनें सगळी माहिती तिनें मिळविली आहे, असें मला दिसून आलें."

"तूं मग तिला काय सांगितलेंस?"

"मीं सगळ्या गोष्टी नाकबूल केल्या."

पांडुरंग रागानें ह्मणाला, "त्या सरळवृत्तीच्या मुलीशीं प्रतारणा केलीस? ॲडिंग इन्सल्ट टू इंन्जुरी? अहाहा! काय पण हे उदार प्रकृतीचें लक्षण! दिनकर, त्या बिचारीला तुला फसवितां आलें; पण आह्मांला फसविणें शक्य नाहीं."

दिनकर अडखळत ह्मणाला, "तुह्मांला फसवावें अशी माझीहि पण इच्छा नाहीं. तसें असतें तर हीं पत्रें मीं तुह्मांला दाखविलींच नसतीं. मालतीच्या एकंदर गुणावर मी लुब्ध झालों आहे, हें खरें; पण त्याचा अर्थ तुम्ही भलताच कांहीं तरी करू नका. पुष्कळ पुष्कळांच्या गुणांवर लुब्ध होतात; ह्मणून त्यांत वाईट हेतु असतो, असें कांहीं नाहीं."

रामभाऊ हंसत हंसत म्हणाला, "दिनकर शर्मणाम् प्रणित प्रेमविज्ञानशास्त्रे प्रथमोध्यायः प्रारभ्यते. दिनकर, ही चर्पटपजरी पुरी कर. तुझ्या आंगीं जर कांहीं मनुष्यत्व असेल, तर अजून स्वतःला सांभाळ. मला तर वाटतें, तूं सगळ्याशींच अन्यायानें वागत आहेस."

दिनकर म्हणाला, "यांत अन्याय कसला? एकाद्या बागेंत सुंदर गुलाबाचें फूल उमललेलें पाहून त्याचा वास घेण्याची तुम्हांला इच्छाच

होत नाहीं ना ? आकाशांत उज्ज्वल तारका दृष्टीस पडल्यावर तिच्याकडे कौतुकानें तुम्ही पहात नाहीं ना ? ”

“ कविवर्य, आपलें हें कवित्व राहूं द्या. दुरून येणाऱ्या सुवासाच्या लहरीनें तुझें समाधान होणार नाहीं. तें फूल तोडून मस्तकावर धारण करण्यापर्यंत तुझी मजल गेली आहे. ”

“ माझी इच्छा कशीहि असो; पण वस्तुस्थितीकडे थोडें लक्ष द्याल कीं नाहीं ? आकाशांतली तारका केव्हां कोणाच्या हातीं लागली आहे ? ”

“ ती हातीं लागणें न लागणें हें निराळें: पण मालतीविषयीं तुझ्या मनांत प्रेम उत्पन्न झालें आहे कीं नाहीं, ते सांग पाहूं ? ”

“ ही गोष्ट मी नाकबूल करीत नाहीं; पण प्रेम म्हटले कीं, तेथें सगळे वाईट हेतु असतात, असे तुम्हाला कां वाटतें ? मित्रप्रेम, बंधुप्रेम, मातृप्रेम, हेंहि एक प्रकारचें प्रेमच आहे. माझ्या समजुतीप्रमाणे प्रेमाचे तीन प्रकार आहेत. एक शारीरिक प्रेम. हे अर्थात् निकृष्ट असतं. पतिपत्नीचें प्रेम हें शारीरिक प्रेम होय. मानसिक प्रेम हे शारीरिक प्रेमापेक्षां उच्च असते. स्वदेशप्रेम, बंधुप्रेम, हे मानसिक प्रेम होय; आणि तिसरे अत्यंत उच्च असें आध्यात्मिक प्रेम होय. जगाला विसरून जाऊन केवळ परमेश्वराच्या ठिकाणीं लीन होणें हे आध्यात्मिक प्रेम होय. अर्थात् माझें मालतीवर जें प्रेम आहे, तें मानसिक प्रेम होय. या प्रेमाला इन्टलेक्चुअल लव्ह असेंहि म्हणतां येईल. ”

या वेळीं रामभाऊनें ‘ हियर हियर ’ ह्मणून टाळ्या वाजविल्या. नंतर तो ह्मणाला, “ तुझ्या स्त्रीचें तें शारीरिक अतएव निकृष्ट प्रेम तुला नावडल्यामुळें तूं या मानसिक प्रेमाच्या मागें लागून लोकांच्या बागेतलीं गुलाबाचीं फुलें शोधीत फिरत आहेस ! दिनकर, लक्षांत ठेव. हा गुलाबाच्या फुलांचा शोक बरा नाहीं. एकादे वेळीं गुलाबाचे तीक्ष्ण कांटे हाताला बोचल्यास त्या वेदनांची आठवण तुला जन्मभर राहील. ”

पांडुरंग ह्मणाला, “ उत्क्रांति तत्त्वाच्या दृष्टीनें पाहिल्यास मनुष्यानें क्रमाक्रमानें आध्यात्मिक प्रेमाकडे जावें, असेंच कोणास ह्मणतां येईल; पण दिनकरला हा सरळ न्याय पसंत नाहीं असे दिसते. प्रापंचिक कर्तव्यें सगळीं

संपलीं आणि मग हा या मानसिक प्रेमाच्या मागें लागला आहे, तर याला आम्हीं नांवें ठेवलीं नसतीं; पण विवाहित स्त्रीला विपन्नावस्थेत टाकून 'सिस्टर्स अँड ब्रदर्स' म्हणून समाजोन्नतीसाठी आपल्या मानसिक प्रेमाचें प्रदर्शन करण्यास निघाला आहे. दिनकर, खरें सांग. तुझ्या स्त्रीचें तुझ्या-वर जें प्रेम आहे, त्या प्रेमाला तू तामसिक प्रेम समजतोस ना ?"

पांडुरंगानें हा शेवटचा प्रश्न दिनकरला इतक्या गंभीर व खणखणीत स्वरानें केला कीं, तो ऐकून दिनकरचें अतःकरण थरारल्यावांचून राहिलें नाहीं. तो कांहींसा गोंधळून म्हणाला, "त्या प्रेमाला काय म्हणावें, तें मला निश्चितपणे सांगतां येत नाहीं; पण तें उच्च प्रकारचें प्रेम कांहीं म्हणतां येणार नाहीं. ते केवळ लौकिकप्रेम होय. गतानुगतिक असे देखील म्हणता येईल."

पांडुरंग पुन्हां पूर्ववत त्वेषानें म्हणाला, "अशी जर तुझी समजूत असेल, तर दिनकर, तुला मी आज स्पष्ट सांगतो कीं, तुझ्या डोक्यांत भलतेंच वेड शिरले आहे आणि या वेडाला जर तूं चिटकून राहिलास, तर मानसिक सौख्याची आणि तुझी केव्हांच गाठ पडणार नाही. कल्पवृक्षाच्या छायेत बसूनहि मूर्ख जसा दरिद्री राहतो किंवा कामधेनू जवळ असूनहि उपाशीं मरतो, त्याप्रमाणें तुझ्या घरांत सुखाचा गड्डा असून तूं वेड्या-प्रमाणें सुखाचा शोध करीत हिंडत आहेस. आज तुला ती देवतेप्रमाणें पवित्र अशी गृहलक्ष्मी तामसिक प्रेमाची पुतळी वाटत आहे; पण असा एक दिवस उगवेल कीं, तिच्यासाठीं तुला अश्रू ढाळावे लागतील."

यानंतर सगळेच थोडा वेळ स्तब्ध बसले होते. दिनकरचा चेहरा तर बराच म्लान झाला होता. तो खिन्न होऊन बसलेला पाहून या तिघांनीं तो विषय तसाच सोडला आणि पुढील शिक्षणासंबधानें त्यांच्यांत वाद-विवाद सुरू झाला. दिनकरनें एम्. ए. च्या परीक्षेंत गणित व संस्कृत यांत चांगलाच लौकिक मिळविलेला असल्यामुळें त्यानें विलायतेस जावें, असें या विद्यार्थ्यांचें म्हणणें होतें; परंतु पैशाची अडचण दाखवून दिन-करनें त्या बाबतींत नन्नाचा पाढा वाचण्यास आरंभ केला होता. केव्हां केव्हां त्याला जावें असेंहि वाटे; पण मालतीपासून सहा हजार मैलांवरच्या

अंतरावर जाणें, त्याला मोठें कठिण वाटूं लागलें. इंग्रजी भाषेवर त्याचें असामान्य प्रभुत्व असल्यामुळें एका कॉलेजांत प्रोफेसरची नौकरीहि त्याला सांगून आली होती; परंतु पुढें काय करावयाचें हे अद्याप त्यानें ठरविलें नसल्यामुळें त्यानें थोडे दिवस स्वस्थपणें घालविण्याचे ठरविलें.

मुंबईस आल्यापासून तो अद्यापि वामनरावांच्या घरींहि गेला नव्हता. दिवाकराचें नांव कॉलेजांत दाखल केल्यावर व दुसरीं एक दोन कामें होतीं तीं झाल्यावर एके दिवशीं सायंकाळच्या सुमारास दिनकर हळू हळू वामनरावांच्या बंगल्याच्या दिशेनें चालूं लागला. तो जसजसा त्या बंगल्याच्या जवळ जाऊं लागला, तसतसे त्याचे अंतःकरण उत्सुकतेनें उचंबळून येऊं लागलें. केव्हां केव्हां त्याच्या मनांत कांहीं कुशंकाहि येत होत्या. यापूर्वी वामनरावाचा बंगला व त्या भोंतालचा बगीच्या दिनकरला किती तरी रमणीय दिसत होता; परंतु आज कोणत्या कारणामुळें असेल, तें असो, पूर्वीचाच तो बंगला त्याला तितका रमणीय दिसला नाहीं. आज त्याच्या मनांत पूर्वीप्रमाणें केवळ मालतीचेच विचार नव्हते, तर त्याबरोबर त्या सरळ व साध्या स्वभावाच्या लक्ष्मीचे कांहीं शब्द त्याच्या कानांत प्रतिध्वनित होत होते, आणि यामुळे कदाचित् त्याला तो बंगला उदास दिसला असावा. बागेच्या दरवाजांत येतांच तो फुलांनीं गजबजलेला बाग आपला सन्मान करण्यास नाखुष आहे, असेंच दिनकरला दिसून आलें. मनुष्याचें मन अस्वस्थ असले म्हणजे सगळ्या जगांतली रमणीयता कशी नाहींशी होते, याचा आज दिनकरला चांगला अनुभव आला. एकादें सुंदर फूल तो सहज तोडीत असे; परंतु आज फुलांना हात लावण्यास त्याला भीति वाटूं लागली आणि तीं पूर्वीइतकीं सुवासिक नाहींत असेंहि त्याला वाटूं लागलें. आपल्या मनाची स्थिति आज अगदीं अस्थिर अशी आहे, हें दिनकरच्या तेव्हांच लक्षांत आलें आणि त्यामुळे आज बंगल्यांत न जातां परत जावें, असें देखील दिनकरच्या मनांत आलें; परतु इतक्या जवळ येऊन मालतीला न भेटतां जाणेंहि त्याला चमत्कारिक वाटूं लागलें. शिवाय तबेल्यांत घोड्याला खरारा करीत असलेल्या विठू गड्यानें त्याला पाहिल्यामुळें बागेंतूनच परतणें दिनकरला हस्यास्पद वाटलें. तो हळू हळू

विठू गड्याच्या बाजूनेंच बंगल्यांत जाऊ लागला. विठू गड्यांत आणि त्याच्यांत थोडें अंतर राहिल्यावर विठूनें 'रामराम रावसाहेब' असें म्हणून एक लांबलचक रामराम केला. दिनकरनेंहि हसून त्याला परत रामराम केला. खरारा करण्याचें तसेंच टाकून विटू म्हणाला, "मास्तर, बक्षीस?"

"कसलें बक्षीस?"

"शेट सांगत होते कीं, मास्तरची मोठी परीक्षा पास झाली; आणि त्या परिक्षेंत मास्तरचा पहिला नंबर आला."

"बरें, उद्यां देईन. वामनराव आहेत का घरांत?"

"नाहीं. ते मुलांना बरोबर घेऊन बाहेर हिंडावयाला गेले आहेत."

मालती घरांत आहे कीं नाहीं, असें विटूला विचारण्याचें दिनकरच्या अगदीं मनांत आलें होतें; परंतु या प्रश्नानें आपल्या हृदयाचा क्षुद्र भाव विठूला कळेल, अशी शंका मनांत येऊन दिनकरनें तो प्रश्न विठूला केला नाहीं. यापूर्वी हा प्रश्न त्यानें विठूला किती तरी वेळां केला होता; पण आज त्याला ही अशी विचित्र शंका आली. दिनकर तसाच तेथून निघाला आणि एकेक पावलानें बंगल्याकडे चालू लागला. मुख्य दरवाजाला टेकून बड्या नांवाच्या कुत्र्याची स्वारी दोन्ही पाय पसरून त्यावर तोंड टेवून स्वस्थ बसली होती. त्यानेंहि मास्तरला ओळखलें आणि शेपूट हालवून आपला आनंद व्यक्त केला. मुख्य दिवाणखान्यांत साधारण उजेड होता; पण बाजूच्या खोल्यांचीं दारें खिडक्या बंद असल्यामुळें त्यांत अंधारच दिसत होता. दिनकरनें इकडे तिकडे बरीच नजर पुरविली; पण बंगल्यांत कोणीच असल्याचें त्याला दिसेना. इतक्यांत एका खोलींत एक मोठी छाया हल-तांना त्याला दिसली. त्याबरोबर तेथें कोणी तरी असावें असें त्याला वाटलें. तो दोन पावलें आणखी पुढें गेला, तेव्हां समोर दिसत अस-लेल्या छायेवरून तेथें कोण असावें, याचा दिनकरला कांहींच तर्क करतां येईना. वास्तविक ही छाया म्हणजे दुसरें कोणी नसून फुटबॉलप्रमाणें वाटोळे गरगरीत असलेले डॉक्टर नीलकंठराव होत. अगोदरच डॉक्टरसाहेबांचा वर्ण म्हणजे 'कीं कृष्णवर्ण नटला जणु

कोळशाचा ' अशा प्रकारचा असून त्यांत त्यांनीं आणखी अंगांत अलपाकाचा काळा कोट घातला होता. आपला वर्ण इतका कांहीं काळा नाहीं, हे लोकांच्या निदर्शनास आणून देण्यासाठींच त्यांनीं हा अलपाकाचा काळा कोट तयार करून तो वापरण्यास सुरुवात केली होती. परंतु आज कित्येक वर्षांत नवीन कोट करण्याची डॉक्तरसाहेबांना फुरसद न मिळाल्यामुळें त्या कोटाचा रंग फिक्का होत होत तो आतां कांहींसा पिंवळट दिसूं लागला होता. अर्थात् यामुळे या कोटापेक्षां डॉक्तरसाहेबच अधिक काळे दिसत होते. या आकृतीकडे दिनकर दुरूनच मोठ्या जिज्ञासेने पहात असतां आणखी एक छाया डॉक्तरसाहेबांच्या शरीरापासून विभक्त झालेली दिनकरला दिसली. एका छायेच्या दोन छाया कशा झाल्या, हे कोडे दिनकरला मुळींच उलगडेना. तेथें कोणी तरी दोन व्यक्ति मुकाट्याने बसलेल्या आहेत, असें दिनकरला वाटलें. तिकडे न जातां येथूनच परत जावें असे दिनकरला वाटले; पण तेथें कदाचित् मालती तर नसेल ना ? या विचारानें तो आणखी दोन पावले पुढे सरकला. त्याबरोबर ओटाच्या पुढें आलेले दोन दांत त्याला दिसले आणि तेवढ्यावरून तेथें कमळाबाई असाव्यात असें त्याने तेव्हांच ओळखले. अर्थात् त्यांच्या शेजारीं बसलेली व्यक्ति डॉक्तरशिवाय दुसरी नसावयाची, हेहि त्याच्या लक्षांत आल्यावांचून राहिले नाहीं. तो आणखी थोडा पुढे जातो तोंच, डॉक्तर मोठ्यानें हंसून म्हणाले, " हे तर दिनकरराव ! या मास्तर, मनुष्यांना पाहून इतके भितां होय ? "

या दोघांना एका बाजूला गुपचिप बसलेलें पाहून दिनकर भ्याला जरी नव्हता, तरी त्याला अगदीं लाजल्यासारखें मात्र झालें होतें. त्यानें आपला हात पुढें केला आणि डॉक्तरशीं हस्तांदोलन करून तो ह्मणाला, " छेः ! भीति कसली; पण इकडे कोण आहे, तें मला अगोदर ओळखूंच आलें नाहीं. कसें काय ? कुशल आहांना ? "

" हो हो. तुह्मी एम. ए. च्या परिक्षेंत पहिला नंबर पटकाविल्याचें ऐकतों ? तुह्मीं गांवाहून केव्हां आलां ? "

" चार पांच दिवस झाले."

" आणि इकडे आज आलां ? "

" काय करणार! उद्योगामुळें फावलेंच नाहीं. माझ्या धाकट्या बंधूची कॉलेजची वगैरे व्यवस्था लावून मी आज मोकळा झालों."

डॉक्तरसाहेब इतका वेळ कमळाबाई शेजारच्या खुर्चीवर बसूनच बोलत होते. ते दिनकरला पाहण्याबरोबर उठणार होते; पण तसें केलें असतां दिनकरला अधिक संशय येईल, या विचारानें थोडा वेळ ते तसेच बसून राहिले. पायानें ठोकरतांच फुटबॉल जसा उंच उडतो, त्याप्रमाणें लोक-लज्जेच्या भयाची लाथ असह्य होऊन फुटबॉलरूपी डॉक्तरसाहेबहि खुर्ची-वरून उठले आणि ' चला, बाहेरच्या दिवाणखान्यांत बसूं ' असें ह्मणून दिनकरसह बाहेर येऊन बसले. हे दोघे त्या दिवाणखान्यांत येऊन बसले तों, बाहेरून वामनरावहि मुलांसह आंत आले. वामनरावांना पाहतांच दिनकरनें त्यांना नमस्कार केला. त्यांनीहि आनंद दर्शवून दिनकरला प्रति-नमस्कार केला. मदन आणि वसंत या दोघांना तर दिनकरला पाहून फारच आनंद झाला. त्या दोघांनींहि आपलीं मस्तकें दिनकरच्या पायावर ठेवलीं. दिनकरचें हृदय या वेळी साहजिक गहिंवरून आलें व त्यानें दोघांनाहि उचलून कुरवाळलें. हा प्रकार पाहून डॉक्तर मोठ्यानें हसले. ते ह्मणाले, " गुरुशिष्य दोघेहि अर्थोडाक्स दिसतात."

" आपल्या गुरूसंबंधानें पूज्यभाव व्यक्त करणें, हेंहि तुह्मांला हास्या-स्पद वाटतें ? " असें ह्मणून वामनराव खालीं बसले आणि आपल्या जव-ळच्या खुर्चीवर बसण्याविषयीं त्यांनीं दिनकरला सुचविलें. मालती इतका वेळ उभी राहून हळूच हंसून दिनकरकडे टकमकां पहात होती. दिनकर बसल्यावर तिनेंहि टेबलाच्या पलीकडे असलेल्या खुर्चीवर बसून ' तुमची प्रकृति वगैरे ठीक आहेना ? ' असा दिनकरला प्रश्न केला. दिनकरनेंहि तितक्याच मार्दवानें ' होय ' ह्मणून उत्तर दिलें. दिनकरला आणखी चार दोन औपचारिक प्रश्न केल्यावर वामनराव ह्मणाले, " भुसावळच्या स्टेशनावरील तुमच्या त्या बाणेदार व योग्य साहसाची हकीकत वर्तमान-पत्रांत वांचून पाहिल्यावर मला फार आनंद वाटला आणि तुमच्यासंबंधानें फार अभिमान उत्पन्न झाला. त्या दिवशी मला जे चार दोन सभ्य गृहस्थ

भेटले, त्यांनींहि तुमच्यासंबंधानें असेच धन्योद्गार काढले. खरोखर तुह्मी महाराष्ट्रियांपुढें एक अनूकरणीय कित्ता ठेवला आहे. सगळा महाराष्ट्र तुमच्या या कृतीनें तुमचा ऋणी झाला आहे. तुमचा हा कित्ता जर सगळे गिरवितील, तर हिंदुस्थानांतील लोकांच्या पौरुषाबद्दल जग साशंक राहणार नाहीं. ( हिंदुस्थानाच्या नशिबीं दास्यत्व तर आतां आलेंच आहे;) पण दास्यत्वांतले लोकहि तेजस्वी असतात. एवढी तरी अब्रु आह्मी सांभाळावयास पाहिजे. ही अब्रु आपणास सांभाळतां येतें, हें तुह्मी स्वोदाहरणानें दाखविले आहे आणि ह्मणूनच सगळ्या महाराष्ट्रानें तुमचा गौरव केला पाहिजे."

आपली ही स्तुति निष्कारण होत आहे, असें दिनकरला खरोखरच वाटलें. तो नम्रपणें ह्मणाला, "माझी आपण निष्कारण स्तुति करीत आहां. एक लहानसे कर्तव्य बजावल्याबद्दल माझा गौरव करणें ह्मणजे गौरव या शब्दांतलें महत्त्व घालविणें होय. माझ्या जागीं तेथे दुसरा कोणी असता, तर त्यानेंहि मजप्रमाणेंच वर्तन केले असतें."

वामनराव किंचित् उंच स्वरानें ह्मणाले, "दिनकरराव, केवळ विनयशीलतेच्या दृष्टीनें आपण हें ह्मणत असाल, तर तें ठीक आहे; पण अशी जर तुमची खरोखर समजूत असेल, तर तो भ्रम होय. रस्त्यांत, कारखान्यांत, आगगाडींत, आगबोटींत वगैरे कोठेंहि तुह्मी डोळे उघडून पहा, ह्मणजे आमच्या लोकांनीं परकियांचे ठोसे खाण्याचा आणि डोळ्यांदेखत स्वतःच्या स्त्रियांचा अपमान सहन करण्याचा अभ्यास केला आहे, असेच दिसून येतें. या ठोसेबाजीच्या खेळानें आजपर्यंत शेकडों लोकांच्या प्लिहा फुटून त्या बिचाऱ्यांना अकालीं मरावें लागलें. तसेंच बीरनवालीसारख्या किती साध्वी स्त्रियाना आत्महत्या करावी लागली, हेंहि आह्मी लक्षांत ठेवावयाला पाहिजे. हा अनर्थ टाळावयाचा असेल, तर अशा प्रत्येक प्रसंगीं आमच्याहि लोकांनीं अस्तन्या वर करून ठोशास ठोसा लगावला पाहिजे. या कामीं आपणास न्याय कसा मिळेल, याचा विचार करण्याचें कारण नाहीं. या वेळीं देखील पुढील संकटाची पर्वा न करतां तुह्मी आपलें कर्तव्य बजावलें, हें पाहूनच मला तुमच्यासंबंधानें अभिमान वाटतो."

डॉक्तरसाहेबांचें या बोलण्याकडे लक्ष नव्हतें. कमळाबाईशीं त्यांना एकांतांत आणखी बोलत बसावयाचें होतें; पण अकस्मात् दिनकरचें तेथें आगमन झाल्यामुळें त्यांचा रसभंग झाला होता आणि ह्मणून ते मधून मधून दिनकरकडे रोषानें पहात होते. डोक्यांतली चिंता दूर करावी ह्मणून त्यांनीं एक मोठा चिरुट पेटवून तो ओढण्यांत ते चूर झाले होते. इतक्यांत कमळाबाईनीं चहाचें ताट आणून टेबलावर ठेवलें आणि पहिलाच पेला उचलून त्यांनी तो दिनकरपुढें केला. "घ्या मास्तर. आज पुष्कळ दिवसांनीं तुमचा हा चहाच्या पत्तीला लाभ होत आहे." असेंहि हसत हंसत कमळाबाई ह्मणाल्या.

आज कमळाबाईचा आपण अपराध केला आहे, असें दिनकरला वाटत होतें. आपल्यामुळें डॉक्तरसाहेबांचें आणि त्यांचें हितगुज तितकेंच राहिलें असावें आणि ह्मणून त्या आपणावर रागावल्या असतील, असें दिनकरला वाटल्यामुळें या वेळीं चहाला नको ह्मणणें, त्याला अनुचित वाटलें. या निमित्तानें तरी कमळाबाईचा राग दूर होवो, असें मनांत योजून त्यानें तो चहाचा पेला घेतला आणि इतरांबरोबर चहा घेण्यास त्यानें सुरुवात केली. इतका वेळ दिनकरचा चेहरा प्रफुल्ल दिसत होता; परंतु मालतीनें चहा घेतला नाहीं, हें जेव्हां त्याला दिसून आलें, तेव्हां तो चहा नसून चहाच्या मळ्यांतल्या मजुरांचें रक्तच आहे, असें त्याला वाटलें, आणि त्यामुळें त्याच्या चेहऱ्यावर अनुतापाची छाया पसरली. स्वतःला न आवडण्यासारखी आपण ही गोष्ट केली, हें तर त्याच्या मनाला खात होतेंच, त्यांत आणखी मालतीला न आवडणारी गोष्ट आपण करीत आहों, हें जेव्हां त्याच्या लक्षांत आलें; तेव्हां आपण जणूं मोठीच चूक केली, असें त्याला वाटलें. इकडे डॉक्तरचा चेहरा मात्र चहामुळें बराच खुलला. चहाचे एक दोन घोट घेऊन डॉक्तर ह्मणाले,

" दिनकरराव, तुमच्या त्या खटल्याचें मग काय झालें ? "

या प्रश्नाचें उत्तर दिनकरला द्यावें लागलें नाहीं. तें परभारें वामनरावांनींच दिलें. ते ह्मणाले, " खटल्याचें दुसरें काय होणार ? रेलवे कंपनीनें फिर्याद काढून घेतली आणि त्या तिकिटकलेक्टरलाहि कामावरून

काढून टाकले. अर्थात् या बाबतींतहि दिनकररावांचाच जय झाला, असें ह्मटलें पाहिजे."

"ठीक ठीक!" असें ह्मणून डॉक्तरनीं आणखी चार दोन चहाचे घोट घशाखालीं ढकलले. दिनकर हंसत हंसत ह्मणाला, "सर्व ठीक झालें; पण या बाबतींत दोन व्यक्ति फारच निराश झाल्या."

डॉक्तर ह्मणाले, "या दोन व्यक्ति कोणत्या ?"

"एक म्याजिस्ट्रेटसाहेब आणि दुसरे स्टेशनमास्तर. काळा अदमी ह्मटला कीं, त्या स्टेशनमास्तरच्या पायाची आग मस्तकाला जाते. उतारूंनीं थोडी देखील तक्रार केलेली त्याला सहन होत नाहीं. रेलवे कपनीच्या कोणाहि गोऱ्या नौकरानें वाटेल तो जुलूम केला, तरी तो उतारूंनीं सोसला पाहिजे; अशा विचाराचे हे स्टेशनमास्तर आहेत. मी त्यांच्या हातीं सांपड-ल्यावर मोठी शिकार सांपडली असें त्यांना वाटलें. आह्मां सगळ्याच विद्यार्थ्यांशीं तो जेव्हां उद्धटपणानें वागूं लागला, तेव्हां 'तूं आम्हाला कोण समजतोस ?' ह्मणून एकाने त्याला प्रश्न केला. त्यानें यावर उत्तर दिलें, 'तुम्ही कितीहि इंग्रजी शिकलेले असलां, तरी तुह्मांला गुलामापेक्षां अधिक किंमत मी देणार नाहीं.' हे त्याचे शब्द ऐकून मी त्याच्यावर फारच गरम झालों. 'रेलवे कंपनी ही उतारूंची सेवावृत्ति करणारी एक कंपनी आहे आणि त्या कंपनीचा तूं नौकर आहेस. अर्थात तूं आह्मां गुलामांच्या नौकराचा नौकर आहेस.' असें मला शेवटीं त्याला सांगावे लागलें."

दिनकर ही हकीकत सांगत असतां इकडे डॉक्तरनीं आपला चहा गट्ट केला होता. ढेंकर देऊन व चिरूटाचे दोन झुरके घेऊन ते म्हणाले, "ज्यांच्या भाड्याच्या पैशावर या लोकांचा निर्वाह होत आहे, त्या उता-रूंशीं हे किती बेपर्वाईनें वागतात !"

मालती ह्मणाली, "स्टेशनमास्तर शिवाय दुसरी कोणती व्यक्ति निराश झाली ?"

"दुसरे ते ऑनररी म्याजिस्ट्रेटसाहेब. रावसाहेब, रावबहादूर होण्या-साठीं त्या बिचाऱ्याची सारखी धडपड चाललेली असते. न्यायानें वा अन्यायानें सरकारला खुष करण्याचा एकहि प्रसग तो वांया जाऊं देत

नाहीं. गोऱ्या लोकांविषयीं तरुण सुशिक्षित विद्यार्थ्यांच्या मनांत कसा द्वेष उत्पन्न होऊं लागला आहे, हें माझ्या या उदाहरणावरून आपल्या 'न्यायपत्रिकें' त तो सिद्ध करणार होता आणि त्यासाठीं तो मला जबर शिक्षा ठोठावणार होता. रेलवे कंपनीनें त्याला आपल्या मुठींत ठेवलेला आहे. कंपनीनें त्याला पहिल्या वर्गाचा पास दिलेला आहे. स्वारी भयंकर लांच खाऊ आहे, असा त्याच्याविषयीं फार बोभाटा झाला आहे! त्याच्या कोणत्या गुणावर लुब्ध होऊन सरकारनें न्यायसूत्रें त्याच्या हातांत ठेवलीं आहेत, हे ईश्वरास माहीत."

वामनराव म्हणाले, "दुर्दैवानें या गृहस्थासमोर जर तुमचा खटला सुनावणीस निघाला असता, तर तुम्हांला बराच त्रास झाला असता?"

"नाहीं. कांहीं विशेष नाहीं. हा खटला त्या म्याजिस्ट्रेटसमोर न चालतां धुळ्याच्या म्याजिस्ट्रेटसमोर चालावा, अशी नारायणराव जोशी यांनीं बरीच खटपट केली होती आणि तिला बरेंच यशहि आलें होतें; पण ही फिर्यादच काढून घेतल्यामुळे पुढे काहीं तजवीज करण्याचें कारणच पडलें नाहीं."

चिरूटाची राख झाडून डॉक्तर म्हणाले, "नारायणरावांच्या या खटपटीला यश आलें नसतें आणि रेलवे कंपनीनें फिर्याद काढून घेतली नसती, तर आपणावर अर्थात् तुरुगांत जाण्याचा प्रसंग आला असता. मास्तर, जेथें तेथें असें शौर्य प्रगट करणें बरें नव्हे,"

डॉक्तरचे हे शब्द ऐकून सगळ्यानींच किंचित् तिरस्कारानें डॉक्तरकडे पाहिलें. मालती तर रागानें लाल झाल्यासारखी दिसली. ती ह्मणाली, "प्रसंग येऊन ठेपला असतां, पुढचा मागचा विचार शांतपणें करण्यांत वेळ घालविल्यास प्रसंगाचें निवारण केव्हांहि व्हावयाचें नाहीं. अनेक महत्कार्यांशीं संकटांचा संबंध असतोच. तेव्हां केवळ संकटाकडे पाहून जर हीं महत्कार्यें सोडलीं तर त्यांत पुरुषार्थ कोणता?"

वामनराव हंसत हंसत म्हणाले, "डॉक्तरसाहेबांचें ह्मणणें असें दिसतें कीं, चोर चोरी करीत असला, तर सोटा घेऊन त्याच्या मागें न लागतां

त्याला पिनलकोड वाचून दाखवावें किंवा एकादी सुरी घेऊन कोणाची मान कापूं लागल्यास त्याला अहिंसेचें शास्त्र सांगावें. वा! छान!"

डॉक्तर कांहींसे हिरमुसले होऊन म्हणाले, "अहो, हल्लींचा काळ वाईट आहे. न्यायदेवता आमच्यावर सदा डोळे वटारून बसली आहे; ह्मणून मी हें ह्मणतो."

दिनकर ह्मणाला, "काळ कसाहि असो. त्याला आम्ही पाठ न दाखवितां सदैव त्याच्याशीं झगडत राहिलें पाहिजे. तसें करण्यांत आह्मांला अनेक आपदा भोगाव्या लागतील; पण त्यांतच खरें मनुष्यत्व आहे. एका कुलीन स्त्रीची अब्रु राखण्यासाठीं जर मजवर तुरुंगांत जाण्याचा प्रसंग आला असता तर, मी स्वतः आपला सन्मानच झाला असें मानलें असतें. पुढें काय होणार, याचा विचार करण्यांत जर मीं तेथें वेळ घालविला असता, तर त्या तरुणीच्या अंगावर हात टाकण्यास त्या पशूला अवसर मिळाला असता."

वामवराव म्हणाले, "दिनकरराव, आपण केलें हेंच योग्य केलें. अशा सत्कृत्यानें जर तुरुंगवास भोगावा लागला, तर त्यांत कोणीहि कमीपणा मानण्याचें कारण नाहीं. उलट अशानें तुरुंग हे तीर्थस्थानाप्रमाणें पवित्र मानले जातील. हिमालयांतल्या यात्रा फार कष्टप्रद असतांहि लोक मोठ्या आनंदानें त्या करतात, त्याप्रमाणें आपल्या माय-बहिणींची अब्रु वांचविण्यासाटीं लोक तुरुंगांत जाऊन येणें हेंहि एक कर्तव्य मानतील." असें ह्मणून वामनरावांनीं मालतीला जवळ बोलावलें आणि तिच्या हातीं कपाटाची किल्ली देऊन ते तिच्या कानांत गुणगुणले. त्याबरोबर मालतीच्या चेहऱ्यावर आनंद मावेनासा झाला व ती मोठ्या त्वरेनें माडीवर गेली. लवकरच ती खालीं आली आणि तिनें एक लहानशी लाल रंगाची पेटी वामनरावांजवळ दिली. ती पेटी हातांत घेऊन वामनराव ह्मणाले, "दिनकरराव, तुमची एकंदर बाणेदार वृत्ति पाहून, विशेषतः तुमची परोपकार सहिष्णुता पाहून मला व माझ्या कुटुंबांतील सगळ्यांना तुमच्याविषयीं फार अभिमान व आदर वाटत आहे. तुमच्या चरित्रांतील या महत्त्वामुळें तुमचा यथाशक्ति गौरव करावा, अशी मला साहजिक इच्छा झाली आहे. माझी ही इच्छा

तुह्मी पूर्ण कराल असा भरंवसा आहे. तुह्मांला एक वस्तु नजर करण्याचें मी योजिलें आहे. वस्तु कांहीं फार किंमतीची आहे, असें नाहीं; परंतु ती देण्याचा हेतु लक्षांत ठेवून ती वस्तु आदरानें जवळ बाळगल्यास मला फार आनंद वाटेल." असें ह्मणून वामनरावांनीं ती लाल रंगाची पेटी उघडून तींतून एक सुमारें शंभर रुपये किंमतीचें सोन्याचें घड्याळ बाहेर काढलें आणि तें मालतीच्या हातीं देऊन ते तिला ह्मणाले, "मालू, हें मास्तरना दे."

मालतीनें तें घड्याळ घेतलें आणि सहास्यपणें; पण मोठ्या मार्दवानें दिनकरच्या हातांत देऊन ती लाल रंगाची पेटीहि त्याच्या पुढें ठेवली. दिनकरनेंहि मोठ्या शालिनतेनें त्या घड्याळाचा स्वीकार केला. तें घड्याळ मालतीच्या हातानें मिळाल्यामुळें त्याला मनापासून आनंद झाला होता आणि या सत्कारामुळें त्याचें हृदय साहजिक गहिंवरून आलें होतें. भरून आलेल्या कंठानें तो ह्मणाला, "आपला व आपल्या एकंदर मंडळीचा मजवर जो लोभ आहे, त्याचें दर्शक ह्मणून ही वस्तु मी मोठ्या आदरानें जवळ बाळगीन. काळाची एकेक घटका हें घड्याळ जशी दाखदाखवील त्याप्रमाणें आपणा उभयतांत प्रेमवृद्धि होत आहे, हेंहि हें घड्याळ माझ्या प्रत्यहीं दृष्टोत्पत्तीस आणून देईल, अशी मला आशा आहे. माझें चारित्र्य दिवसें दिवस अधिक उज्ज्वल करण्यासाठीं या घड्याळाचा उपयोग होवो असा मी परमेश्वराजवळ आशीर्वाद मागतों. आपण आदरपूर्वक दिलेलें हें घड्याळ आपणास जरी अल्प किंमतीचें वाटत असलें, तरी तें मी अमूल्य समजून नेहमीं जवळ बाळगीन."

डॉक्तर व कमलाबाई या दोघांना हा सगळाच प्रकार मोठासा आवडला असें दिसलें नाहीं. आपल्या अल्पाकाच्या काळ्या कोटाच्या खिशांत तें घड्याळ जितकें सुरेख दिसलें असतें, तितकें कांहीं तें दिनकरच्या खिशांत चांगलें दिसणार नाहीं, असें देखील डॉक्तरांना वाटलें; पण तशी सूचना मात्र त्यांनीं केली नाहीं. चेहऱ्यावरील ती खिन्नता कोणाच्या दृष्टीस पडूं नये ह्मणून त्यांनीं रुमालानें दोन तीन वेळां तोंड पुसून जोरानें चिरूट ओढण्यासहि आरंभ केला.

दिनकरचें वरील भाषण ऐकून वामनराव ह्मणाले, "तुमचा नुसता शाब्दिक गौरव न करतां या प्रसंगाची आठवण ह्मणून तुह्मांला एकादी वस्तु नजर करावी, ही कल्पना मालतीची आहे. भुसावळच्या स्टेशनावरील प्रकार घडल्यानंतर चार पांच दिवसांनीं ती विलायतचें ग्रॅफिक पत्र वाचीत बसली होती. त्यांत इंग्लंडांत एका तरुणानें असेंच संकट सोसून एका तरुण स्त्रीच्या अब्रूचा बचाव केला होता. तो मजकूर तिनें मुद्दाम माझ्या दृष्टोत्पत्तीस आणला. आश्चर्य हें कीं, तुमच्यासंबंधानें इकडे कित्येकांनीं भीति व्यक्त करून कित्येकांनीं तर अनुदारपणाचेहि उद्गार काढले होते; परंतु विलायतच्या त्या तरुणाचा सर्वत्र जयजयकार होऊन लोकांनीं अनेक वस्तु त्याला नजर केल्या. तुम्हासहि तशी एकादी वस्तु नजर करावी, असें मालतीनें मला सुचविलें आणि मालतीचें तें ह्मणणें मींहि कबूल केलें. यानंतर या खटल्यासाठीं होणारा खर्च स्वतः करावयाचा असें मीं ठरविलें; पण खटला चालला नाहीं. तेव्हां त्या खर्चाच्या आजमासानें मीं हें एक घड्याळ आणलें आणि तें तुह्मांस दिलें. तुह्मी त्याचा स्वीकार केल्याबद्दल मला फार आनंद वाटतो.

दिनकर हंसून ह्मणाला, "आपल्या या कृतीनें मलाहि फार आनंद वाटतो. आपल्या कुटुंबांतील मंडळीची आठवण ह्मणून तें मी मोठ्या अभिमानानें सतत जवळ बाळगीन. शिवाय मला घड्याळाची फार जरूरहि होती. मी मुंबईस विद्याभ्यासासाठीं आलों, तेव्हां एक सहा रुपयांचें घड्याळ घेतलें होतें. तें एक घड्याळ आह्मां दोघां बंधूंना पुरत असे आणि चार वर्षें त्यानें नौकरीहि चांगली केली; पण गेल्या सहा महिन्यांपूर्वीं तें घड्याळ बंद पडून पंचत्वाप्रत पावलें. त्या घड्याळाचे भाग खरोखरच पांच जणांनीं वांटून घेतले. घरीं बहिणीचीं व वडील बंधूचीं मिळून पांच मुलें आहेत. त्या सर्वांनी घड्याळांतील चक्रें खेळण्यासाठीं घेतलीं. गेले सहा महिने होकायंत्राशिवाय नांव वल्हविणाऱ्या नाविकाप्रमाणें विद्यार्थीदशा घड्याळाशिवाय कंठित होतों. अशा स्थितींत आपण हें घड्याळ मला दिल्यामुळें मी आपला फार उपकारी झालों आहें."

यानंतर शिळोप्याच्या चार गप्पा झाल्यावर दिनकरनें सगळ्यांचा

निरोप घेतला. उद्यांपासून रोजच्याप्रमाणें शिकविण्यास येण्याविषयीं मालतीनें दिनकर जात असतां त्याला विनंति केली आणि दिनकरनेंहि पण हंसत हंसत त्या ह्मणण्यास संमति दर्शविली. दिनकर त्या दिवशीं कांहींसा खिन्नतेनेंच त्या बंगल्यांत शिरला होता; पण जाते वेळीं तो कल्पनेच्या बाहेर आनंदित होऊन बिऱ्हाडाकडे चालला होता. लक्ष्मीच्या विचाराचा व तिच्या प्रतिमेचा जो एक परिणाम दिनकरच्या अंतःकरणावर झाला होता; त्यामुळे मालतीची भेट घेण्याचा प्रयत्न करणें ह्मणजे अन्याय करणें होय, असे त्याला वाटू लागले होते. अशी त्याच्या मनाची चमत्कारिक स्थिति झाल्यामुळें मालतीच्या बंगल्यांत शिरतांना तो साहजिक अस्वस्थ झाला होता. परंतु त्याचा बंगल्यांत प्रवेश झाल्यावर ज्या कांहीं गोष्टी क्रमाक्रमानें घडल्या, त्यामुळे त्याच्या हृदयावर अधिष्ठित झालेली लक्ष्मीची मूर्ति हळू हळू पुसट होऊन दिसेनाशी झाली आणि त्याच हृदयसिंहासनावर मालतीची मूर्ति अधिष्ठित झालेली त्याला दिसली. आतां त्याचें अंतःकरण मालतीमय होऊन गेले आणि विशेषतः मालतीकडून मिळालेल्या त्या घड्याळाच्या देणगीमुळे तर त्याला सर्वत्र मालतीचे तें रम्य चित्र दिसू लागलें. तेथून परततांना 'उद्यां शिकवायला यालना?' असा प्रश्न जेव्हां मालतीनें त्याला हंसून मुरडून केला, तेव्हां दिनकरच्या अंतःकरणांतल्या खोल भागीं एक आशेचा बारीक तंतु उत्पन्न झाला आणि त्या आशेच्या भरांत तो त्याच्या बिऱ्हाडीं येऊन पोहोंचला. दुसरा दिवस केव्हां उजडतो आणि मागच्याप्रमाणें मुलांना शिकवावयाला केव्हां जातो, असें दिनकरला मालतीच्या निमंत्रणामुळें झाले होतें. तसेंच ते बक्षीस मिळालेलें घड्याळ आपल्या स्नेह्यांना केव्हां दाखवीन असेंहि दिनकरला झालें होतें. त्या रात्रीं त्याची पांडुरंगाशिवाय इतरांशीं गांठच पडली नाहीं; परंतु एक प्रकारें फक्त पांडुरंगाची भेट झाली, हेंहि त्याला फायद्याचें वाटलें. पांडुरंगाचा आणि त्याचा स्नेह इतरांपेक्षां अधिक असल्यामुळें बक्षिसाचें रहस्य त्याच्याशिवाय इतरांना सांगण्यासहि तो तयार नव्हता. पांडुरंगाची गांठ पडून लवकरच मुद्याच्या वादविवादास सुरुवात झाली. तें सोन्याचें घड्याळ हातांत घेऊन पाहून पांडुरंग ह्मणाला, "तुझा प्रेमरथ प्रणयपथावरून

बराच पुढें गेला असें दिसतें. इतके दिवस इंटेलेक्चुअल लव्ह ह्मणून हें तुझें जाणें येणें होतें; पण आतां इंटेलेक्चुअल म्यारेज ह्मणून तुला जावें यावें लागेल असें दिसतें. हें घड्याळ ह्मणून त्यांनीं तुला हुंड्याचा पहिला हप्ता दिला, दुसरें काय ? ”

दिनकर ह्मणाला, “ वाटेल त्या गोष्टीला चेष्टेचें स्वरूप द्यावयाचें, हा तुझा स्वभावच आहे. यांत त्यांची गुणग्राहकता मात्र तुला दिसत नाहीं. ज्यासाटीं घरच्या मंडळीनीं माझा तिरस्कार केला, त्याचसाठीं मला त्यांनीं पारितोषिक द्यावें, यांत त्यांचा थोरपणा सहज दिसून येतो; पण तुला यांत तें मानसिक प्रेम दिसत आहे. आपल्या बांधवांचा गौरव करणें हें तुझ्या-मतें अनुचितच होय. ”

पांडुरंग हसत हंसत ह्मणाला, “ दिनकर, तू काय वाटेल ते ह्मण; पण मला हीं एकंदर चिन्हें बरीं दिसत नाहींत. हळू हळू तू त्या मालतीच्या प्रेमपाशांत सांपडत आहेस, असें मला तर वाटतें. मग या प्रेमाला तूं तुझ्या शब्दकोशांतील कोणत्याहि शब्दानें संबोध; परंतु शेवट तामसिक प्रेमानेंच होणार, हें लक्षांत ठेव.”

“ मला तर तसें कांहीं वाटत नाहीं. तुह्मां सगळयांच्याच मनांत या-संबंधानें उदात्त विचार कां येत नाहींत, याचेंच मला आश्चर्य वाटतें. कोणत्याहि गोष्टीकडे क्षुद्र दृष्टीनें पाहिल्यास तींत अनेक दोष दिसतात. ”

“ तसेंच भ्रमामुळे अनेक वाईट गोष्टीहि चांगल्या दिसतात. दिनकर, मला वाटतें तुझी बुद्धि विकारवश झाली आहे आणि त्यामुळें तुझा सगळाच रंग पालटला आहे. बरें, तुझ्या भोंवतालची परिस्थितीहि अशी चमत्कारिक झाली आहे कीं, त्यामुळे तुझी ही विकारवशता वाढण्यास मदतच होत आहे. सगळया बाबतींत तुझें नीतिधैर्य चांगलें नजरेस येतें; पण त्या मालतीच्या बाबतींत मात्र तूं पक्का वेडा झाल्यासारखा दिसत आहेस. तिच्या साहजिक हंसण्याबोलण्यांतहि कांहीं गूढार्थ असावा, असें तुला वाटूं लागलें आहे. हा वेळपर्यंत तुझ्या चारित्र्यांत तेजस्वीतेचीच भर पडत गेल्यामुळें तुझ्या घराण्यासंबंधानें लोकांना अधिक आदर वाटूं लागला आहे; पण या मालतीच्या बाबतींत जर तूं कांहीं चूक केलीस, तर तुझ्या

सगळ्या चरित्राची माती होईल आणि त्या घरच्या तामसिक प्रेमाला तर मुकशीलच; पण तें इन्टेलेक्चुअल प्रेमहि शेवटीं लाभावयाचें नाहीं. तूं आतां एम्. ए. झाला आहेस; तेव्हां यासंबधानें शिकविण्याचा आतां मला अधिकार उरला नाहीं. बरें नीज. उद्यां भेटेन."

असें ह्मणून पांडुरंगानें दिनकरचा निरोप घेतला आणि तो आपल्या बिऱ्हाडीं गेला. इकडे दिनकरनेंहि आंथरूण पसरून त्यावर आपली देहयष्टि टाकली. 'मालतीच्या हंसण्याबोलण्यांतून तू गूढार्थ शोधून काढीत आहेस' असा पांडुरंगानें आज दिनकरवर आरोप केला होता आणि आंथरुणावर पडल्यावर दिनकरहि याच आरोपासंबंधानें साशक झाला होता. खरोखरच आपली बुद्धि विकारवश झाल्यामुळें तर मालतीची प्रत्येक कृति आपणास रम्य दिसत नाहीं ना? असें त्याचें मन त्याला विचारूं लागलें. त्यानें पुष्कळ विचार केला; पण त्याला मालतीच्या कृतींत कृत्रिमता अशी दिसेना. उलट या विचारामुळें त्याचें हृदय हलून गेलें आणि मालतीचा प्रवेश हृदयांत अधिक खोल जागीं त्यानें होऊं दिला. उद्यां मालतीच्या प्रत्येक कृतीकडे नीट लक्ष पुरविलें पाहिजे आणि त्यांत कृत्रिमपणा आहे कीं तिच्या स्वभावाचेंच त्यांत सर्वस्व आहे, हें पाहण्याचा निश्चय करून कशी तरी रात्र त्यानें घालविली आणि वेळ होतांच तो वामनरावांच्या बंगल्यावर जाऊन हजर झाला. मदन आणि वसंत या दोघांना शिकवून झाल्यावर तो त्या खोलींतून उठणार, तोंच तेथें मालती आली. तिला पाहतांच दिनकर हंसत हसत ह्मणाला, "तुमचा अभ्यास वगैरे बरोबर चालला आहेना?"

मालती हंसून व खालीं पाहून ह्मणाली, "तें आतां हळू हळू आपणाला समजेलच. आज पुष्कळ दिवसांनीं आपण पुन्हां शिकविण्यास येऊं लागलां, हें पाहून मला फार आनंद झाला आहे."

"आणि हें काम पुन्हां मिळाल्यामुळें मलाहि आनंद झाला आहे. येथें होतों तोंपर्यंत तुमच्या ओळखीत कांहीं विशेष आहे, असें वाटलें नाहीं; पण घरीं गेल्यावर मला अगदीं चुकल्याचुकल्यासारखें झालें."

"खरेंच!"

" खरेंच ह्मणून काय विचारतां ? तुमच्या सुस्वभावांत असाच कांहीं विलक्षण चटका आहे. मला खरोखरच करमत नसे; परंतु तुमचीं जेव्हां पत्रें येऊं लागलीं, तेव्हां मात्र माझ्या अंत:करणांतली हुरहुर बरीच कमी झाली. तुम्ही पाठविलेल्या पत्रावरून तुमच्या स्वभावांतली रम्यता चांगली समजून आली. तुह्मी स्वत: कांहीं सांगूं लागला म्हणजे जितका आनंद होतो, त्याहून अधिक आनंद आपल्या पत्रांवरून मला झाला."

लाजल्यासारखे करून मालती ह्मणाली, " आपण उगीच माझी स्तुति करतां. मी तर तीं पत्रें अगदीं साध्या शब्दांनी लिहिलीं होतीं."

" ह्मणूनच ती अधिक रम्य वाटलीं आणि शिवाय दुसरें हें कीं, आपण स्वत: किती मनोहर व सुवासिक आहों, हें गुलाबाच्या फुलाला कांहीं माहीत नसते. ती माहिती दुसऱ्यांनींच करून द्यावी लागते."

हळूच दिनकरकडे पाहून मालती ह्मणाली, " थोडे दिवस गावीं जाऊन रहावयाला मिळाल्यामुळे आपण जणू कवि झालां आहां ! "

दिनकर हंसत हंसत ह्मणाला, " होय. झालो आहे खरा; पण घरीं राहूनहि डोळे मुबईकडे लागल्यामुळें या काव्यस्फूर्तीचा उदय झाला आहे."

" आपलें म्हणणे मला समजले नाहीं."

" समजून घेण्याचें कारणहि नाहीं. बरें येतों आतां. तुह्मी हें घड्याळ दिल्यामुळे एकेका मिनिटाचा मला आतां हिशोब ठेवावा लागत आहे."

असें ह्मणून दिनकरनें मालतीकडे हसून पाहिलें आणि तो त्या खोलींतून बाहेर पडला. त्याला निरोप देतांना मालतीच्या चेहऱ्यावरहि थोडें हास्य उमटल्यावांचून राहिले नाहीं. या वेळीं दिनकर आपल्या बिऱ्हाडाकडे जाण्यास निघाला होता हें खरें; परंतु त्याचें चित्त या वेळीं इतकें अस्वस्थ झालें होतें कीं, त्यामुळें मुंबईचे सदोदित अस्वस्थ असणारे रस्तेहि त्याला शांत वाटत होते. आज त्यानें आपल्या मनाविरुद्ध वर्तन केलें होतें. मालतीशीं तो इतके दिवस अत्यंत शालिनतेनें बोलत असे; परंतु आज त्या सभ्यतेला रजा देऊन तो तिच्याशीं काव्यमय भाषेंत बोलत होता. हें जें त्यानें आज साहस केलें होतें, त्याबद्दल त्याचें मन त्याला खाऊं लागलें होतें. केवळ विकारविवशतेमुळें मालतीची प्रत्येक कृति तुला रम्य

वाटत आहे, असा जो पांडुरंगानें त्याच्यावर आरोप केला होता, तो आरोप कितपत खरा आहे, हें पाहण्यासाठीं त्यानें आज हें साहस केलें होतें. परंतु मालतीनें त्याला जीं उत्तरें दिलीं त्यावरून तो तिच्यावर अधिक लुब्ध झाला व त्याचें मन खरोखरच विकारवश झालें. आतां मालतीचें आचरण त्याला अधिक रम्य आणि अधिक मनोहर दिसावयाला लागलें, इतकेंच नव्हे, तर त्याच्या अंतःकरणांत जो एक अंधुक आशातंतु होता, तो आतां अधिक स्पष्ट झाला.

---

## प्रकरण नववें.



फुटबॉलप्रमाणें वाटोळ्या गरगरीत शरीराचे डॉक्टरसाहेब वामनरावांच्या बंगल्यांत हरहम्मेश दृष्टीस पडत आणि आश्चर्य हें कीं, ते तेथें तासाचे तास खुर्ची अडवून बसलेले असत. असल्या रिकामटेकड्या या डॉक्टरचा वामनरावाशीं एवढा दाट परिचय का होता, याचा या प्रकरणांत थोडा विचार केला पाहिजे. युनिव्हरसिटीच्या मंदिरांत सात वाऱ्या केल्यावर हे डॉक्तरसाहेब आठव्या वर्षी वैद्यकीच्या परीक्षेत उत्तीर्ण झाले होते. त्यांच्या आयुष्याला अशा रीतीनें रेंगाळण्याची जी संवय झाली होती, ती अखेरपर्यंत तशीच कायम राहिली. त्यांनीं कोणतेंहि कार्य हातीं घेतलें म्हणजे तें झटपट म्हणून केव्हांहि होत नसे. परीक्षा पास झाल्यावर पुढें काय करावें याचा विचार करण्यास डॉक्तरसाहेबांना सबंध एक वर्ष लागलें. यावरून कालाबरोबर झगडण्यास डॉक्तरसाहेब कसे वस्ताद होते, याचें अनुमान सहज कोणासहि करतां येईल. शेवटीं एका आगबोटीच्या कंपनीकडे खटपट करून यांनीं बोटीवरील डॉक्तरकीची नौकरी मिळविली. दैववशांत यांना आफ्रिकेकडे जाणाऱ्या येणाऱ्या आगबोटीवर नौकरी मिळाल्यामुळें पुष्कळ वेळां डॉक्टरसाहेबांना आपल्या वर्णबंधूशीं हस्तांदोलन करण्याचा प्रसंग आला. सुमारें पांच वर्षें ही नौकरी केल्यावर आगबोट कंपनीनें डॉक्टरसाहेबांना रजा दिली. नुसत्या रजेवरच भागल्यामुळें डॉक्टरांनाहि

मोठें समाधान झालें होतें. बोटीवरील औषधांचा सांठा लवकर लवकर रिकामा होत आहे, हें पाहून डॉक्टरसाहेब औषधें विकतात, असा आगबोटकंपनीला संशय येऊन कंपनीनें डॉक्तरसाहेबांची बोळवण केली. वास्तविक खरा प्रकार अगदीं निराळा होता. बोटीवरील समुद्राच्या हवेमुळें डॉक्तरसाहेबांची प्रकृति बिघडली आणि ती सुधारण्यासाठीं लाल रंगाच्या तरल पदार्थांनीं भरलेल्या मोठाल्या बाटल्या त्याना लागूं लागल्या. या बाटल्या बोटीवरील दवाखान्यांत नसल्यामुळें कांहीं औषधांच्या मोबदल्यांत त्या डॉक्तरसाहेबांनीं मिळविण्यास आरंभ केला. वस्तुस्थिति अशी असतां आगबोटकंपनीने डॉक्तरसाहेबांवर चोरीचा व दारूबाजीचा आरोप ठेवला आणि त्यांना रजा दिली. नंतर मुंबईच्या प्रसिद्ध गोकुळदास तेजपाळ दवाखान्यांत डॉक्टरसाहेबांना शभर रुपयांची नौकरी लागली. दोन वर्षे येथेंहि त्यांचीं सुरळीत गेलीं; परंतु एके दिवशीं एक परिचारिका आपल्या खोलींत निजलेली असतां डॉक्तरसाहेबांनींहि निद्रारोगाच्या भरांत त्याच खोलींत प्रवेश केला. या नव्या रोगानें डॉक्तर आजारी झाले आहेत, असें पाहून या परिचारिकेनें मोठ्यानें शंख केला. त्याबरोबर आणखी एक दोन डॉक्टर, कंपाउंडर वगैरे धांवून आले आणि त्यांनीं डॉक्टरसाहेबांच्या डोळ्यांत अंजन घालून त्यांना दवाखान्याच्या बाहेर घालवून दिलें. त्या परिचारिकेच्या अरसिकपणाला नांवें ठेवून डॉक्तरसाहेब पुन्हां विश्रांति घेऊं लागले. ही विश्रांति घेत असतां त्यांच्या पत्नीवर मृत्यूची कुऱ्हाड पडली आणि त्यामुळें सगळें जग डॉक्तरसाहेबांना ओकें ओकें दिसूं लागलें. तथापि ते निराश झाले नाहींत. ऐहिक सुखासाठीं त्यांनीं आपली कंबर इतकी कसून बांधली होती कीं, कोणत्याहि संकटानें ते नाउमेद होत नसत. यानंतर डॉक्टरनीं मुंबईतील बड्या डॉक्टरची ऐट आणून रोग्यांना फक्त औषधाची यादी लिहून देण्याचें ऑफीस उघडलें; पण मुंबईचे रोगी तरी कसले खमंग; त्यांनीं डॉक्टरना जागेचें भाडें मात्र वर्षभर भरावयाला लावलें. एक वर्षभर असा अनुभव आल्यावर डॉ. नीलकंठराव यांनीं मृतपत्नीच्या अंगावरील दागिने विकून ते मुंबईस दवाखाना घालून बसले. आज सुमारें पंधरा वर्षें त्यांचा हा दवाखाना कसा

तरी चालला असून त्यावर डॉक्टरसाहेबांचा निर्वाह कसा तरी चाललेला आहे. डॉक्टरच्या या एकंदर गत आयुष्याचा विचार केला म्हणजे त्यांचें आणि नशिबाचें बरेंच वांकडें असावें, असें सहज अनुमान निघतें. तसेंच इतकीं वर्षे काळाशीं झगडण्यांत गेलीं असल्यानें ते थोडेसे उतारवयाचे झाले आहेत. हें त्यांना विचारण्याचें कारण पडूं नये म्हणून त्यांनीं मस्तकावरच मुख्य चिन्ह ठेवलें आहे. त्यांच्या मस्तकावरील पिंजलेला पांढरा स्वच्छ कापूस पाहिला म्हणजे पुढें घालवावयाच्या आयुष्यापेक्षां त्यांनीं अधिक आयुष्य घालविलें आहे, असेंच स्पष्ट दिसून येतें. अशा स्थितींतहि निराशेचीं चिन्हें त्यांच्या चेहऱ्यावर दिसत नाहींत. एक दिवस तरी ऐहिक सुख आपल्या पायाशीं लोटांगण घालीत येणार, अशी त्यांची समजूत आहे व ती वेळ आतां कांहीं दूर नाहीं, असेंहि त्यांना वाटूं लागलें आहे.

त्या दिवशीं तीन चार वाजण्याच्या सुमारास डॉ. नीलकंठराव आपल्या दवाखान्यांत एका खुर्चीवर बसून रोग्यांची काळजी करीत होते. रोग्यांची काळजी याचा अर्थ रोगी कसे बरे होतील, असा कोणी कृपा करून करूं नये. दवाखान्यांत रोगी कसे येतील, याची ते काळजी करीत होते. गेल्या पंधरा वर्षांत कपाउंडरचें त्यांना कारणच न पडल्यामुळें ते स्वतःच सर्व कामकाज करीत होते. क्वचित् चुकून एकादा रोगी यांच्या हातीं लागला, तर त्याला ते आपल्या हातांतून लवकर सोडीत नसत. डॉक्टरसाहेबांच्या या व्यवहारामुळें कोणी त्यांना कास्याचा नायटा करणारे डॉक्टर असें म्हणत; पण त्यांचे व्यवसायबंधु त्यांना डॉ. लीच म्हणून म्हणत. दवाखान्याची झाडझूड करण्यासाठीं त्यांनीं एक छोकरा नौकरीला ठेवला होता. त्याचें नांव बाबू. डॉक्टरसाहेबांचीं बहुतेक कामें या एकाच मुलाला करावीं लागत असल्यामुळें तो बिचारा या नौकरीला अगदीं कंटाळून गेला होता. दवाखान्याच्या दरवाजाशीं एका मोडक्या खुर्चीवर त्या दिवशीं बाबू बसून झोंपेची डुकली घेत असतां तितक्यांत एक मोलकरीणबाई तेथें आली आणि बाबूला हालवून म्हणाली, "बाबू ऊठ. ऊठ. जा, डॉक्टरसाहेबांना लवकर बोलावलें आहे म्हणून सांग."

बिचारा बाबू त्या मोलकरणीकडे त्रासून पाहून डोळे चोळीत चोळीत आंत गेला आणि डॉक्टरला म्हणाला, "वामनरावांकडून बोलावणें आले आहे."

इतका वेळ नखावर नखें वाजवीत बसलेले डॉक्टर घाईनें उठले आणि डोक्यावर चिनई टोपी ठेऊन तसेच वामनरावांच्या बगल्यावर जाऊन हजर झाले. यावेळीं बगल्यांत कोणीहि नसून कमळाबाई पलंगावर पडून मोठ्यानें उः उंः असें कण्हत होत्या. डॉक्टरला पाहतांच कमळाबाई मोठ्याने उसासा टाकून कष्टानें म्हणाल्या, " डॉक्टर, मी या दुखण्यांतून वाचेनसें दिसत नाहीं. हात पाय फारच ठणकतात आणि छातीत फारच दुखत आहे. श्वास देखील घेतां येत नाही. उः उंः प्राण अगदीं कासावीस होतो. "

कमळाबाईचे हे शब्द ऐकून डॉक्टर त्यांना धैर्य देऊन म्हणाले, " भिऊं नका. तसें घाबरण्यासारखें नाहीं." असें म्हणून त्यांनीं खिशांतून रबराच्या नळ्या काढल्या आणि घाईनें त्याचीं दोन्हीं टोकें त्यांनी कमळाबाईच्याच कानाला लावलीं; परतु तितक्यांत ती चूक त्यांच्या लक्षांत येऊन त्यांनीं नळ्यांचीं टोंकें स्वतःच्या कानाला लावून दुसरें टोक कमळाबाईच्या छातीवर ते फिरवू लागले. याप्रमाणे थोडा वेळ परीक्षण केल्यावर त्यांनीं कागदावर कांहीं औषधांचीं नांवें लिहिलीं आणि तो कागद मोलकरणीजवळ देऊन तिला तीं औषधें आणण्यास सांगितले. मोलकरीण गेल्यावर कमळाबाईचा हात आपल्या हातांत घेऊन (कदाचित् नाडी पाहण्यासाठीं) डॉक्तर म्हणाले, " आपली ती नेहमींचीच व्याधी दिसते. कांहीं विशेष आहे, असें नाहीं. गेल्या एक दोन दिवसांत पोट फार दुखत होतें कीं काय ? " असें म्हणून डॉक्तर थोडे हंसले. कमळाबाईच्या चेहऱ्यावरहि हास्याची लकेर चमकली. कमळाबाई म्हणाल्या, " अहो, पोटदुखी कसली नी व्याधी कसली ! या घरांतल्या भानगडीनेंच मला अगदीं जीव नकोसा झाला आहे. त्यांत परवांपासून पुन्हां छाती दुखावयाला लागून काल थोडा तापहि आला होता. "

डॉक्तर हंसून म्हणाले, " आपणास व्यवस्थेनें वागण्यास मीं अनेक वेळां सांगितलें; पण तुम्ही त्याप्रमाणें वागत नाहीं, हें कांहीं चांगलें नाहीं.

तुम्ही दररोज तीन वेळां सूप घेत जा आणि सकाळ संध्याकाळ घरच्या गाडींतून समुद्राकडे फिरावयाला जात जा. याप्रमाणें एक दोन महिने नियमानें वागल्यास तुमच्या प्रकृतींत किती तरी फरक पडेल."

उजव्या कुशीवर वळून व डॉक्तरकडे चांगली दृष्टी पुरवून कमळाबाई थोड्या रागानें ह्मणाल्या, "डॉक्तर, आमच्या घरांतील सगळी हकीकत तुह्मांला माहीत तर आहेच. गेल्या उन्हाळ्यांत मला चार दिवस महाबळेश्वरी पाठवा ह्मणून किती तरी मीं गळ घातली; पण तेवढे कांहीं त्यांच्यानें करवलें नाहीं." असें ह्मणून कमळाबाईनीं आपल्या डोळ्यात पाणी आणलें.

डॉक्तरचें हृदय यामुळें हललें नाहीं, असें कांहीं नाहीं. सहानुभूति दर्शवून ते ह्मणाले, "वामनरावांनीं कां अमान्य केलें तें समजत नाही. पाहिल्यानें तुमचा शब्द कांहीं ते वांया जाऊं देत नसत. बरें पैशाच्यासंबंधानें ह्मणावें तर तशीहि कांहीं काटकसर दिसत नाहीं. उलट केव्हां केव्हां अनावश्यक खर्चहि झालेला दिसतो."

"पैशाची काटकसर कसली, उलट उधळपट्टीच चालली आहे; परतु माझ्यासंबंधानें मात्र कमी अधिक खर्च होतां कामा नये, असा कटाक्ष दिसतो."

डॉक्तर सहानुभूतिपूर्वक गंभीर स्वरानें ह्मणाले, "तसें असेल. तर तुह्मीहि यासंबंधानें सावधगिरी बाळगावयास पाहिजे. तसेंच वामनरावांनाहि थोडें सुचवून ठेवलेलें बरें."

"त्यांचें तर हितानहित ज्ञान सगळें लुप्त झालें आहे. कोणीहि गोड गोड बोलून दोन थापा मारल्या ह्मणजे खुष होतात. परवां एका लफंग्यानें पैसाफंडाचें व्याख्यान देतांच एकशें एक रुपये त्याच्या स्वाधीन केले. आपणासारख्या सुधारकाला यामुळें कमीपणा येईल, वगैरे मीं पुष्कळ सांगितलें; पण राष्ट्रहिताचीं कामें सुधारक आणि दुर्धारक यांसाठीं वाटलेलीं नाहींत, असें सांगून रुपये द्यायचे झाले."

इतक्यांत मोलकरणीनें दोन पेले चहा करून आणला आणि तो त्या दोघांच्या हातीं दिला. चहा पीत असतां डॉक्तर ह्मणाले, "असल्या कृत्याला वामनरावांनीं एकशें एक रुपये देणें ह्मणजे पैशाची उधळपट्टी करणें होय."

" आणि परवांची ती घड्याळाची गोष्ट! मास्तरनीं असा पराक्रम तो काय केला आणि त्यांना तें शभर रुपयाचें घड्याळ तें काय दिलें! सगळाच चमत्कार!"

" खरोखर मास्तरचा तो केलेला सन्मान पाहून मला तर हंसूंच आलें. वामनरावांसारख्या पाश्चात्य संस्कृतीस वाहिलेल्या गृहस्थानें मास्तरचा सत्कार करणें ह्मणजे पुन्हा पौर्वात्य संस्कृतीला चिकटणें होय. वाटर्लूच्या लढाईंत जगद्विजयी नेपोलियनला पकडणाऱ्या जनरल ब्लूचरचाहि एवढा सन्मान झाला नसेल !"

निराशेनें एक लांबलचक उसासा टाकून कमळाबाई ह्मणाल्या, "डॉक्टर, माझें दुःख ह्मणून ह्मणत्ये ते हेंच. असल्या एकेक गोष्टीची आठवण झाली ह्मणजे जिवाची कशी तळमळ होते. बरें, अशा अनावश्यक बाबींत जो खर्च होतो, त्यासाठीं मला एका शब्दानें तरी विचारतात का ? ती मालती आणि ते यांची सारखीं खलबते चाललेलीं असतात. पेटीची किल्ली तिच्या हातांत. बोलून चालून ती सवतीची मुलगी. माझ्या मुलांची आणि माझी ती कशाला काळजी घेईल? कारटीचा असा राग येतो; पण काय करणार ? "

पुन्हा कमळाबाईंचे डोळे पाण्यानें भरून आले. त्यांचा हात कुरवाळून धरून डॉक्टर ह्मणाले, " कमळाबाई, तुह्मी असे भोळेपणानें वागून चालणार नाही. मालतीचे लग्न झालें ह्मणजे या घराची तिला अर्थातच काळजी उरणार नाहीं. तुमचे तसे नाहीं. तुमच्यावर सर्व जबाबदारी आहे. दोन मुलें आहेतच. आणखीहि कदाचित् होतील; तेव्हां तुमचें नफानुकसान हें तुह्मीच पाहिलें पाहिजे. तुमच्या विवाहाच्या वेळेस हा बंगला तुमच्याच नांवानें करून दिल्याचें ऐकतों ? "

" हो. त्यावेळीं मी आग्रह धरला ह्मणून एवढें तरी झालें."

" हें आपण फार चांगलें केलें. शिवाय विमा आहे, नाहीं कां?"

" आहे, पाच हजार रुपयांचा."

" एवढाच! पांच हजार रुपये ह्मणजे अगदीं सामान्य रक्कम. तुमच्या दोन मुलांच्या शिक्षणाला देखील ही रक्कम पुरावयाची नाहीं. दोघांची

लग्नें वगैरे व्हावयाचीं आहेतच. तुह्मी संधी साधून वामनरावांना पुन्हां एकदां गळ घाला आणि आणखी पांच हजार रुपयांचा विमा उतरावयाला लावा. ह्मणजे मुंबईसारख्या ठिकाणीं दहा हजार रुपयांत कसाबसा निर्वाह चालेल."

"हो, पण हें त्यांनीं एकले पाहिजेना! हप्ते भरण्याची अडचण त्यांच्याकडून पुढें येईल; पण तसें केल्यावांचून कांहीं इलाज नाहीं, हेंहि खरें."

"मालतीसाठीं पोस्टाच्या ब्यांकेत दरमहा कांहीं पैसे वामनराव ठेवतात, असें मीं ऐकलें आहे, तेच पैसे या विम्याच्या हप्त्याला खर्च करा, असें सांगा ह्मणजे झालें. ह्मणजे एका टोल्यानें दोन पक्षी मारल्याचें श्रेय येईल."

पोटांत दुखत असल्यामुळे आंथरुणावर पडून कण्हत असलेल्या कमळाबाई हळू हळू उठून बसल्या, त्यांचा आवाजहि चढला. मधून मधून त्या हंसूंहि लागल्या. अगदी आवडता विषय जेव्हां सुरू झाला, तेव्हां तर त्या पलंगावरून उठून डॉक्टर शेजारींच खुर्ची घेऊन बसल्या. डॉक्टरनींहि अघळ पघळ बोलण्यास सुरवात केली. बोलण्याच्या रंगांत या दोन कृष्णाकृति केव्हां अगदीं संलग्न होत, केव्हां केव्हां विलग होत. त्या दिवशीं त्या अर्धवट अंधाराच्या जागेंत एक प्रचंड छाया दिनकरच्या दृष्टीस कशी पडली आणि नंतर एका छायेच्या दोन छाया कशा झाल्या, हें गूढ आतां वाचकांच्याहि चांगलें लक्षांत आलें असेल. पूर्वीं एक वेळ परिचारिकेचा धंदा करीत असलेल्या कमळाबाई आणि त्याच वेळीं त्यांच्या परिचयाचे झालेले डॉक्टर नीलकंठराव यांच्या पूर्वस्मृतीनें अधिक रमणीय वाटणाऱ्या गप्पा जेव्हां सुरू झाल्या, तेव्हां आपले शारीरिक दुःख कमळाबाईनीं व मानसिक दुःख डॉक्टरसाहेबांनीं विसरून जावें यांत कांहीं मोठेसें नवल नाहीं. दोघांसहि बोलण्याचा शीण बराच झाल्यावर कमळाबाईनीं खास स्वतःचें कपाट उघडून थोडें लाल रंगाचें पातळ औषध डॉक्टरना देऊन थोडें आपणहि घेतलें. यानंतर दोघांचें बरेंच बोलणें झालें; पण या किळसवाण्या प्रसंगाची आतां रजा घ्यावी हेंच उत्तम.

## प्रकरण दहावें.



मुंबईस चौपाटीच्या बाजूला असलेला एक सुंदर बंगला सहस्रावधि विद्यु-द्दीपांनीं प्रकाशमान् झालेला असून त्याच्या सभोंवतीं असलेल्या बागेतहि मधून मधून मोठाले दिवे लावले होते. बागेच्या दरवाजासमोर गाड्या मागून गाड्या येत होत्या आणि त्या गाड्यांतून नीटनेटका भपकेबाज पोषाख केलेले स्त्रीपुरुष बंगल्यांत जात होते. ज्या बंगल्यांत आज एवढा दीपोत्सव चालला होता, तेथें असें होतें तरी काय? असें जर कोणी विचारलें, तर कांहीं विशेष नाहीं, असें खरोखरच सांगावें लागेल.

पण मोठ्या लोकांचें सगळेंच मोठें या न्यायानें त्यांच्या घरीं सहजा-सहजीं देखील दिपोत्सव होतात. या बंगल्याच्या बागेला दोन फाटकें असून एकावर इन ( आंत ) आणि एकावर औट ( बाहेर ) असें लिहिलें होतें. तसेंच या अक्षरांच्यावर एका बाजूला इंग्रजींत दिलखुषगार्डन आणि दुस-ऱ्या दरवाजावर मराठींत दिलखुषबाग असें लिहिलें होतें. या बंगल्याच्या मालकाचें नांव मधुसूदन महादेव भार्गव असें असून ते दर्शविण्यासाठीं पितळेच्या पत्र्यावर कोरलेल्या अक्षरांची पाटीहि फाटकावर लावली होती. त्या पाटीवर इंग्रजींत एम्. एम्. भार्गव असें नांव होतें आणि या गृह-स्थालाहि तेंच नांव आवडत असे. मधुसूदनराव असें कोणीं म्हटलें किंवा तसें नांव लिहून त्यांना कोणीं पत्र लिहिलें, तर त्यांना राग येत असे. त्यांचें टोपणनांव आण्णासाहेब असें होतें. हें नांव त्यांना आवडत होतें; पण मिस्तर भार्गव या नांवावर त्यांचें विशेष प्रेम होतें आणि त्यांचे सर्व इष्टमित्र त्यांना मिस्तर भार्गव ह्मणूनच हांक मारीत असत. यांचे वडील महादेवराव भार्गव हे अव्वल इंग्रजी अमदानींत मोठ्या हुद्यावर असून त्यांनीं विपूल पैसा मिळविला होता. पुष्कळ दिवस महादेवरावांना संतती अशी झाली नाहीं. परंतु देवाच्या कृपेनें वृद्धापकाळीं त्यांना दोन मुलांचा लाभ झाला. लग्न करून कांहीं दिवसांनीं संसार ऐन रंगास आला कीं, बायको मरावी, असें महादेवरावांच्या मागें दुर्दैव लागलें होतें; पण वृद्धाप-

काळीं पांचवी बायको केल्यावर महादेवरावांचा संसार फलद्रुप झाला. त्यांनीं आपल्या वडील मुलाचें नांव मधुसूदन व धाकट्याचें मुकुंद असें ठेवलें होतें. हीं मुलें चार दोन वर्षांचीं होतात तोंच वयाच्या सत्याहत्तराव्यावर्षीं महादेवरावांनीं नुकत्याच नांवारूपास आलेल्या संसाराचा निरोप घेतला. महादेवरावांची ही पांचवी बायको एका सुशिक्षित गृहस्थाची मुलगी असून त्या वेळीं महाराष्ट्रांत सुधारणेची जी लाट उसळली होती, त्या तालमींत ती तयार झालेली असून तिनें आपल्या मुलांनाहि तेंच शिक्षण दिलें होतें. विपुल पैसा आणि लहानपणापासूनच ऐषआरामानें राहण्याची दोघांहि मुलांना संवय झाल्यामुळें दारिद्र्याची कल्पना अर्थातच त्यांना नव्हती. स्वदेश, देशाचें दारिद्र्य व गरीब स्वदेशबंधू यांविषयीं सहानुभूतिऐवजीं बेपर्वायी, वात्सल्याऐवजीं उदासीनता आणि दयादाक्षिण्याऐवजीं क्षोभ हींच या दोघांहि बंधूंच्या अंतःकरणांत आश्रय करून राहिलीं होतीं. पाश्चात्य संस्कृतीनें या दोघांहि बंधूंचे डोळे इतके दिपून गेले होते कीं, पौर्वात्यांना प्रत्येक बाबींत शिव्या देणें हें त्यांचें कर्तव्यच झालें होतें. नेहमीं साहेबी पोषाखानें राहणें आणि तितक्याच गुर्मीनें वागणें, यांतच मनुष्यत्वाचें सर्वस्व आहे, असें या दोघांनाहि वाटत होतें. दोघेहि बंधू वर्णानें काळे सांवळेच होते; परंतु पुष्कळ वेळां ते ‘ काळा आदमी ’ या लाडक्या शिवीचा उपयोग करीत असत. ज्या वेळची ही हकीकत देत आहों, त्या वेळीं, मधुसूदनरावांचें वय तीस बत्तीस वर्षांचें असून मुकुंदचें वय पंचवीस वर्षांचें होतें. मधुसूदनरावांचें शिक्षण बेताबातीचेंच झालें होतें; पण मुकुंदची म्याट्रिकची परीक्षा झाली असून त्यानें कॉलेजांतहि प्रवेश केला होता; परंतु कॉलेजांत एक तर काळ्याआदमीच्या सहवासांत अभ्यास करावयाचा आणि दुसरें हें कीं हा अभ्यासक्रम विशेष मनोरम असाहि नव्हता. यामुळें मुकुंदच्या मस्तकावर दोन वेळां ‘ नापास ’ असा शिक्का मोर्तब झालें होतें. अशा स्थितींत इकडच्या भिकार कॉलेजांत आयुष्य फुकट घालविण्यापेक्षां विलायतेस जाऊन ब्यारिस्टर होऊन यावें, असें मुकुंदनें ठरविलें. पैशाची कमतरता नसल्यामुळें आणि मधुसूदनरावांनाहि ही गोष्ट पसंत पडल्यामुळें लवकरच विलायतेस प्रयाण केलें आणि आज सुमारें तीन वर्षांनीं स्वारी

ब्यारिस्टर होऊन मुंबईस परत आली होती. आपले धाकटे बंधु इंग्लंडहून सुखरूप परत आले आणि त्यांची परीक्षाहि पास झाली या आनंदाप्रीत्यर्थ आज मधुसूदनरावांनी आपल्या मित्रांना व मुंबईतील सुधारकाग्रणी थोर थोर व्यक्तींना सहकुटुंब सहपरिवारें गार्डन पार्टीला बोलाविलें होतें. गार्डन पार्टीचा कार्यक्रम छापून तो निमंत्रण पत्रिकेसह सर्वांकडे पोहोचता करण्यांत आला होता आणि त्या निमंत्रण पत्रिकेप्रमाणें महाराष्ट्रीय साहेब आपापल्या लेडींना बरोबर घेऊन रात्री नवाच्या सुमारास नटूनथटून दिलखुष बागेंत जात होते. इंग्लडांत होणाऱ्या एकाद्या बड्या लार्डाच्या घरच्या गार्डन पार्टीची ही हुबेहुब नक्कल होती, एवढें सांगितलें म्हणजे या गार्डन पार्टीची कल्पना येईल. पार्टीसाठीं जमलेल्या सर्व पुरुषांचे पोषाख साहेबी थाटाचे असून स्त्रियांच्या पोषाखांतहि पौर्वात्य गचाळपणाचा लेशहि नव्हता. पार्टीसाठीं लागणाऱ्या सर्व खाद्यपेयादि वस्तूंचा मक्ता मुबईतील प्रसिद्ध अशा मांगोनी ब्रदर्सला दिला होता.

या गार्डन पार्टीनें कांहीं विशेष हेतु साधावयाचे असा मधुसूदनरावांचा मुळींच उद्देश नव्हता; परंतु निमंत्रित मडळींपैकीं कित्येकांनी पाश्चात्य लोकांच्या पद्धतीप्रमाणें या पार्टीची सधि साधून आपापलीं घोडीं पुढें दामटण्यास कमी केलें नाहीं. नुकत्याच गतभर्तृका झालेल्या श्रीमती भामिनीबाई पांडे यांच्या हातीं जेव्हां ही निमत्रण पत्रिका पडली, तेव्हां त्यांना मोठा आनंद झाला. आपल्या सतरा अठरा वर्षे वयाच्या विमला नांवाच्या मुलीला हांक मारून त्या ह्मणाल्या, "विमले, आज मिस्तर भार्गव यांच्याकडे रात्रीं गार्डन पार्टीला आपणां दोघांस निमंत्रण आहे. त्यांचे धाकटे बंधु विलायतेहून ब्यारिस्टर होऊन आल्यामुळें ही पार्टी व्हावयाची आहे. हें बघ, पोषाक कसा अगदीं नीटनेटका कर हो, आणि हें पहा, मिस्तर मुकुंदच्या वारंवार नजरेस पडण्याचा प्रयत्न कर. मधून मधून हसावें, बोलावें, समजलीस ना ?" यावर हंसत हंसत बरें ह्मणून विमला आंत निघून गेली. एकंदरींत ही गार्डन पार्टीची संधी साधून कोर्टशिप कशी करावी, याचाच धडा भामिनीबाईनीं विमलेला दिला. विमला आतां ऐन तारुण्यांत होती; पण तिचा वर्ण काळासांवळा असून बांध्यानेंहि ती थोडी स्थूल होती.

शिवाय मुख्य दोष नाकाचा. तें तरतरीत असण्याऐवजीं थोडें चापट होतें; तथापि त्या वेळच्या एकंदर स्त्री सुधारकांत नटण्या मुरडण्यांत विमलेचा नंबर पहिला असून तिच्या बापानें तिच्याबरोबर लग्न करणाऱ्या गृहस्थाला देण्यासाठीं पांचहजार रुपयांची प्रॉमिसरी नोट टेवली होती. तेव्हां विमले-च्या लग्नाची भामिनीबाईंना मोटी काळजी होती, असें नाहीं. तथापि मुलीला अठरावें वर्ष लागल्यावर त्यांना थोडीशी चिंता साहजिक वाटू लागली. अशा वेळीं ब्यारिस्टर मुकुंद यांचे विलायतेहून आगमन झाल्या-वर भामिनीबाईच्या मनांत साहजिक आशा उत्पन्न झाली आणि त्या या पार्टीच्या समारंभाला आपल्या कन्येला खूप नटवून घेऊन गेल्या.

दिलखुष बागेत असलेल्या बंगल्याच्या मागच्या बाजूच्या बागेत या पार्टीची व्यवस्था केलेली असून त्या आधीं एका मोठ्या दिवाणखान्यांत नटूनथटून आलेला स्त्रीपुरुष समूह एकत्र झाला होता. मिस्तर भार्गव यांच्याकडे पुरुष वर्गाचें आदरातिथ्य करण्याचें काम असून त्यांच्या गृहिणी मिसेस इंदुमती यांनीं स्त्रियांचा सत्कार करण्याचें काम घेतलें होतें. या-शिवाय त्यांना मदत करण्यास मिस लीला व डॉक्तर रोडके यांच्या पत्नी मिसेस चंद्रिकाबाई ह्याहि होत्या. मिस लीला ही नुकतीच बी. ए. झाली असून ती एका इंग्रजी कन्याशाळेवर मास्तरीण होती. मिस्तर भार्गव यांच्याशीं तिचा कांहीं नात्याचा संबंध होता. या दिवाणखान्यांत स्त्रियांसाठीं स्वतंत्र जागा होती, हें खरें; पण स्त्रीपुरुषांच्या एकत्र सम्मी-लनास येथें आडकाठी नसून त्याप्रमाणें पुष्कळ स्त्रिया पुरुषांजवळच खुर्च्यांवरून बसल्या होत्या. तसेंच कित्येक पुरुषहि स्त्रियांकडे जाऊन हळूच हंसून कांहीं प्रश्न करीत होते. अनेक विद्युद्दीपांचा पडलेला लख्ख प्रकाश, सुंदर पोषाख करून आलेल्या स्त्रिया आणि त्या बंगल्यांतील एकंदर थाटमाट यामुळें तो दिवाणखाना यावेळीं इंद्रभुवनाप्रमाणें दिसत होता. साधें आणि स्वाभाविक या सर्वांवर जणूं बहिष्कार पडला असून कृत्रिमतेचा येथें जयजयकार चालला आहे, असेंच स्पष्ट दिसत होतें. पोषाखांतली कृत्रिमता बोलण्यांतहि उघड होत होती. सृष्टींतील नैसर्गिक सौंदर्यावर लुब्ध होणारांना हा एकंदर देखावा इतका विचित्र दिसला

असता कीं, त्याला तें एक सकटच वाटले असतें. पुरुषांपेक्षां स्त्रियांच्या संभाषणाचा विषय ह्मणजे स्वतःची बडेजावकी हा होता. महाराष्ट्रांतल्या एकाद्या प्रसिद्ध पुरुपाशीं आपला जवळचा अथवा दूरचा संबंध दर्शवितां आला ह्मणजे मोठी कृतार्थता प्रत्येकीस वाटत होती. डॉ० रोडके बराच पैसा मागें ठेवून परलोकवासी झाल्यामुळे मिसेस चंद्रिकाबाईंना नट्टापट्टा करून साऱ्या गांवांत वणावणा करीत फिरण्याशिवाय दुसरा उद्योग उरला नव्हता. आज तर त्या मोठ्या अभिमानानें स्त्री समुहांत वावरत होत्या. त्या इंदुमतीला म्हणाल्या, " इंदुमती, तुह्माला तर माहितच असेल कीं, त्यांच्या शस्त्रक्रियेबद्दल केवढा लौकिक होता तें! मेडिकल कॉलेजचे प्रिन्सिपाल डॉ० स्वान देखील त्यांचा सल्ला घेत असत. पुढें तर गव्हरनरसाहेबांनीं त्यांची स्वतःचे डॉक्तर ह्मणून नेमणूक केली होती."

इंदुमती म्हणाली, " हो, हो! ते तर सगळ्यांना माहीत आहे. माझ्या काकाच्या मामाचे सासरे होते, तेहि चांगल्यापैकी शस्त्रवैद्य होते. त्यांच्याचजवळ डॉ० रोडके कांहीं दिवस अभ्यास करीत होते."

इतक्यांत एका रावबहादुर गृहस्थाची प्रौढ मुलगी ह्मणाली, " तर मग डॉक्तरसाहेबांना रावबहादूर हा किताब मिळाला असावा?"

चंद्रिकाबाईहि कांही कमी नव्हत्या. त्या म्हणाल्या; " छेः! ते स्वतः कांहीं रावबहादूर नव्हते; पण गव्हरनरसाहेबांजवळ दोन शब्द खर्च करून त्यांनीं कित्येकांना रावबहादूर केले होते."

आपला चष्मा सावरून व मनगटावरील घड्याळाकडे मोठ्या तोऱ्यानें पाहून मिसेस कौसल्याबाई म्हणाल्या, " या रावसाहेब रावबहादुरांच्या वर्तनावर आमच्या इकडून 'चंद्रकिरण' पत्रांत कशी पण खरमरीत टीका येत असते? इकडच्या विद्वत्तेमुळें पत्राचा खप तरी किती वाढला आहे! पूर्वीं अडीचशें प्रति खपत होत्या, त्या आतां तीनशें खपूं लागल्या आहेत."

वरील बोलण्यावरून कौसल्याबाई एडिटरसाहेबांच्या पत्नी होत्या, हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. त्यांच्या वर्तमानपत्राच्या प्रति तीनशें खपत होत्या, हें एकून कोणासहि हंसू येईल; पण हें पत्र फक्त सुधारकांसाठींच होतें, एवढें लक्षांत ठेवलें, ह्मणजे त्यांत कांहीं आश्चर्य वाटणार नाहीं.

बायकांचा जसा हा शुष्क वादविवाद चालला होता, त्याप्रमाणें पुरुषवर्गांत-हि निरस गप्पा चालल्या होत्या. अजूनहि कांहीं मंडळी यावयाची अस-ल्यामुळें त्यांच्या येण्यासबंधानेंहि टीका होत होती. वामनरावांना या पार्टी-साठीं सपरिवार बोलावणें होतें; परंतु आधीं न निघतां ते अगदीं वेळेवर मालती, कमळाबाई, व मुलें यांसह येऊन दाखल झाले. त्यांना पाहतांच मिस्तर भार्गव यांनीं मोठ्या सत्कारानें त्यांना खुर्चीवर आणून बसविलें. कमळाबाई तशाच स्त्रीसमुहांत निघून गेल्या; पण मालती वामनरावांजवळ-च बसली होती. वामनराव खुर्चीवर बसल्यावर त्यांची ओळख मिस्तर भार्गव यांनीं तेथील मंडळींना करून दिली. त्याबरोबर प्रोफेसर मंडपे त्यांच्याशी करमर्दन करून ह्मणाले, "ओहो! आपला परिचय झाला, याबद्दल फार संतोष वाटतो. आपलें नांव यापूर्वींच 'सोशल रिव्ह्यू' नांवा-च्या मासिक पुस्तकावरून माहीत झालें होतें. आज आपणास समक्ष पाहून फार आनंद झाला. त्या मासिकांत 'पौर्वात्य मनोभूमिकेवर पाश्चात्य संस्कृतीची लागवड' या सदराखालीं जे चार पांच लेख आपण प्रसिद्ध केले आहेत, त्यानें आमच्या समाजावर पुष्कळ परिणाम होईल, असें मला वाटतें."

मिस्तर भार्गव आश्चर्यानें म्हणाले, "ते लेख तुम्हीं लिहिले आहेत? वाः! फार उत्तम. आपली लिहिण्याची पद्धत आणि विषय प्रतिपादन कर-ण्याची शैली हीं अगदीं वाखाणण्यासारखी आहेत. इंग्रजी भाषेवर तर आपलें चांगलेंच प्रभुत्व आहे, इंग्रजींत आपण इतकें उत्कृष्ट लिहाल अशी माझी कल्पना नव्हती."

वामनराव शालिनता दर्शवून म्हणाले, "आपण माझे लेख इतक्या आदरानें वाचून पहातां, हे मी आपलें मोठें भाग्य समजतों; माझी भाषा वगैरेहि चांगली असेल; पण माझे विचार आपणास कितपत पसंत पडले असतील, याची मला शंका आहे."

एक शहाणे गृहस्थ आराम खुर्चीवर बसून चिरूट ओढीत होते. त्यांना सरकारी नौकरी असून दोन अडीचशें रुपये पगार होता. त्यांचें नांव गोविंद-राव. जणूं झोपेंतून उठून ते म्हणाले, "यांनीं त्या लेखांत काय असें लिहिलें आहे?"

प्रोफेसर मंडपे म्हणाले, " यांचें असे म्हणणें आहे कीं, पाश्चात्यांची समाजरीति चांगली आहे हें खरें; पण ती केवळ चांगली आहे, एवढ्याचसाठीं आम्ही पौर्वात्य संस्कृतीपासून पराङ्मुख होतां कामा नये. आमच्यांत जें वाईट असेल, तें आम्ही अवश्य टाकावें; पण आमचें सगळें वाईट आणि पाश्चात्यांचें सगळें चांगलें, अशी खोटी समजूत कोणी करून घेऊं नये. या खोट्या समजुतीमुळें भलतेंच बीज आपण भलत्याच जमिनींत पेरण्याचा प्रयत्न करीत आहों, असें यांचें म्हणणें आहे. आम्ही आमची संस्कृति कायम ठेवून तींत पाश्चात्य संस्कृतीवरून जरूर ते फेरफार करावेत, हा त्यांच्या लेखांतील मुद्दा आहे. "

मिस्तर गोविंदराव हसत हंसत म्हणाले, " हा मुद्दा दिसतो बरा; पण तो अशक्य आणि अप्रयोजक असा आहे. नवी दारू जुन्या बाटलींत, घातली, तर बाटली फुटते, अशी इंग्रजींत एक म्हण आहे. त्याप्रमाणें पौर्वात्य आणि पाश्चात्य संस्कृतीची भेसळ केली, तरी पौर्वात्य संस्कृतीचा आस्ते आस्ते लोप होणार; मग आतांच त्या संस्कृतीपासून अलिप्त होऊन पाश्चात्य संस्कृतीचा स्वीकार केलेला काय वाईट ? "

वामनराव आपल्या नेहमींच्या शांत व गंभीर स्वरानें म्हणाले, " पौर्वात्य समाजव्यवस्था जुन्या बाटली इतक्या किंमतीची आणि पाश्चात्य समाजव्यवस्था नव्या दारूच्या किंमतीची जर आपणास वाटत असेल, तर या बाबतींत आपणाशीं कसें बोलावें हाच प्रश्न आहे. पौर्वात्य संस्कृतीच्या पायाकडे आपण चांगलें लक्ष दिलें असावें असें दिसत नाहीं. हा पाया इतका भक्कम आहे कीं, त्यानें जगांतल्या अनेक तुफानांच्या लाटा मागून लाटा सोसूनहि तो आज अभंग आहे. ही समाजव्यवस्था ज्यांनीं स्थापित केली, त्यांच्या दूरदृष्टीचें जितकें कौतुक करावें तितकें थोडें. आमच्या हिंदुसंस्कृतीनें बुद्धकालाबरोबर टक्कर मारली आहे. मुसलमान तर या देशांत कांहीं शतकें राज्यकर्ते असून आणि त्यांनीं आपली संस्कृति आमच्यावर लादण्यासाठीं जुलूम केला असूनहि हिंदुसंस्कृति अभंग राहिली आहे. इंग्रज लोक राज्यकर्ते असून स्वतःच्या धर्मप्रसारासाठीं ते दीर्घोद्योगी आहेत हेंहि खरें. दुसऱ्यांच्या धर्मांत ढवळाढवळ करावयाची नाहीं, असें

जरी त्यांनीं अभिवचन दिलें आहे, तरी त्यांनीं आपली संस्कृति तुमच्यावर बलात्कारानें लादण्याचा प्रयत्न केला, अशी कल्पना केली, तरी आह्मां आर्यांच्या संस्कृतीचा पाया अभंगच राहील असें दिसून येईल. बुद्ध युगांत आम्ही बुद्धधर्मीयांच्या कांहीं चांगल्या चालीरीति घेतल्या आणि त्या आपल्याशा केल्या आहेत. मुसलमानांपासूनहि कांहीं चांगल्या गोष्टी घेतल्या आहेत. तसेंच पाश्चात्यांपासूनहि त्यांचें चांगले तेवढे आम्ही ग्रहण करूं;परंतु यावरून हिंदूंची उच्च संस्कृति नाहींशी होईल, अशी मात्र कोणी आशा करूं नये."

मिस्तर गोविंदराव विकृत स्वरानें म्हणाले, "पण आमची ही हिंदु-संस्कृति नाहींशी करण्याचा आम्हीच कां प्रयत्न करूं नये ?"

वामनरावांना निरुत्तर करणारा प्रश्न आपण केला, असें गोविंदरावांना वाटलें व ते मोठ्या तोऱ्यानें श्रोतृसमाजाकडे पाहूं लागले. वामनराव म्हणाले, "ती नाहींशी व्हावी अशी आपली इच्छा असेल आणि तुमच्याप्रमाणें दुसरेहि कांहीं तिलांजलि घेऊन उभे आहेत; परंतु त्या बरोबर जगाच्या इतिहासाकडेहि लक्ष पुरविलें पाहिजे. जें मरण्याच्या किमतीचें आहे, तें मरतें आणि जें जगण्याच्या किमतीचें आहे तें जगतें असा सृष्टीचा नियम आहे आमची आर्यसंस्कृति इतकी जिवट आहे कीं, तुमच्यासारख्या नरपुंगवांनीं तिच्यावर वज्रप्रहार केले, तरी ती अभंगच राहणार."

प्रोफेसर मंडपे म्हणाले, "वामनरावांचेंच ह्मणणें सयुक्तिक दिसतें. इतिहासांत अनेक जातींचा उल्लेख आढळतो; पण त्या जातींचें अस्तित्व आज कोठेंहि आढळून येत नाहीं. मोठमोठीं राज्यें लयास जाणें निराळें आणि एके काळीं देशचा देश पददलित करणारी जात नाहींशी होणें निराळें. या जाती नाहींशा झाल्या याचा अर्थ हाच कीं, त्या त्यांच्या जवळच्या उच्च संस्कृतीनें भूषित झालेल्या जातींत विलीन झाल्या. हिंदू-संस्कृतीचा इतिहासहि असाच आहे. या उच्च संस्कृतीनें भरतखंडांत अनेक जातींना आपल्या पोटांत घेतलें आहे."

वामनराव म्हणाले, "मी तरी माझ्या लेखांत हेंच प्रतिपादन केलें

आहे. पाश्चात्त्यांचे प्रत्येक बाबतीत अनुकरण करून हिंदुसंस्कृतीला नांवें ठेवणें म्हणजे आपलें मस्तक दगडावर आपटून दगड फोडण्याचा हास्यास्पद प्रयत्न करणें होय. अशानें दगड न फुटतां मस्तकाला मात्र टेंगळें यावयाचीं आणि ही गोष्ट सुधारकांत जे कांहीं किळसवाणे प्रकार दिसतात, त्यावरून स्पष्ट झाली आहे. त्यांची सदुद्यमशीलता आम्ही न घेतां त्यांची व्यसनें मात्र घेतलीं. त्यांची मर्दुमकी न घेतां मगरुरी मात्र घेतली. त्यांचें साहस आणि कंटकवृत्ति हीं न घेतां ऐषआराम मात्र घेतले. त्यांची जिज्ञासा आणि कल्पकता न घेतां विषयलालसा मात्र घेतली. त्यांचें देशप्रेम आणि स्वातंत्र्याची आवड हीं न घेतां नारकीय प्रेमाचे आम्ही उपासक मात्र झालों. एकदरीनें हें अनुकरण आम्ही इतक्या अध दृष्टीनें केलें आहे कीं, आमचा समाज म्हणजे शक्तिउपासक मंडळ होय, असें म्हणण्याची पाळी आली आहे. "

मिस्तर भार्गव यांना वामनरावांचे हे विचार अर्थातच पसंत पडले नाहींत. वामनरावांनीं हे आरोप जणू आपणावरच केले, असें त्यांना वाटलें आणि म्हणून चांगलें सणसणीत उत्तर देण्यासाठीं ते डोकें खाजवूं लागले; पण कांहीं जुळले नाहीं. शेवटीं ते मोठ्यानें हंसून म्हणाले, " वाः वामनराव ! आपणाला पुराणवादीमंडळानें वकीलपत्र दिलें आहे, असें दिसतें ? "

प्रोफेसर मंडपे म्हणाले, " छेः, छेः ! यांत पुराणवादीमंडळाचा कांहीं संबंध नाहीं, आणि असला तरी त्यांत वावगें असें काय आहे ? त्यांच्यांत कांहीं दुराग्रहि आहेत ही गोष्ट खरी; परंतु एकंदरीनें जुना समाज आपली आर्यसंस्कृति न सोडतां त्यांत पाश्चात्त्यांच्या योग्य संस्कृतीची भर घालण्याकडेच त्यांची प्रवृत्ति दिसते. आम्ही मात्र तसें करीत नाहीं. जुनें वाईट आणि नवें चांगलें अशा पक्षपातानें आम्ही वागतों. खरें पाहिलें असतां आपली संस्कृति चांगली कीं वाईट याचा संशय आतां पाश्चात्त्यांनाच वाटूं लागला आहे. 'मॉडर्न खिश्चानिटी' या नांवाचें एक पुस्तक एका विद्वानानें लिहिलें आहे. येशू ख्रिस्त जणू पुन्हां अवतीर्ण होऊन न्यूयार्क शहरांत जाऊन तेथें पूर्वींच्या त्या अत्यंत तेजस्वी अशा संस्कृतीचा शोध

करीत आहे, अशी त्या पुस्तकाची प्रस्तावना आहे. खरी श्रद्धा, प्रामाणिकपणा, वात्सल्य, सत्य, निर्लोभता, निर्दांभिकता आणि निर्व्यसनता इत्यादि ख्रिस्ताच्या आज्ञा त्या शहरांत कोणीहि पाळीत नाहीं, असें पाहून आपण ख्रिस्ती लोकांच्या शहरांत आलों नसून निराळ्याच लोकांना पहात आहों, असें येशूला वाटलें आणि तो निराश होऊन परत गेला, असा त्या पुस्तकाचा उपसंहार आहे. यावरून त्यांच्यांतच स्वतःच्या संस्कृतीसंबंधानें कशी लाथाळी सुरू झाली आहे, याचें अनुमान कोणासहि करतां येईल."

वामनराव म्हणाले, "तेच आतां आमच्या हिंदुसमाजाचे पहा. शंकराचार्यच कशाला; पण व्यास वाल्मिकासारखे प्राचीन ऋषि आले, तरी ते देखील निराश होणार नाहींत आणि आपण अगदींच परक्या लोकांत आलों आहों, असेंहि त्यांना वाटणार नाहीं."

या वरील वादविवादाकडे कांहीं थोड्या लोकांशिवाय इतरांचें अर्थातच लक्ष नव्हतें. परंतु मागाहून सगळ्यांना हा वादविवाद समजला व त्यांतील कित्येकांनीं वामनरावांना शिव्याहि दिल्या. आतां त्या त्यांच्या पश्चात दिल्या हे केवळ त्या कित्येक गृहस्थांचे सौजन्य होय. ब्यारिस्टर मुकुंद यांच्या आयुर्वृद्धीच्या चिंतनासाठीं या गार्डनपार्टींत उंची मद्याचा एकेक चषक देण्याची व्यवस्था मिस्तर भार्गव यांनीं केली होती; परंतु वामनराव व प्रोफेसर मंडपे यांनी आरंभींच जे विचार प्रगट केले, त्यामुळें मिस्तर भार्गव थोडेसे बावरले आणि त्यांनीं तेवढा कार्यक्रम रद्द केला. यापुढें असल्या पार्ट्यांना वामनराव व प्रोफेसर मंडपे यांना या मंडळींनीं निमंत्रणेंच दिलीं नाहींत.

आजचा हा समारंभ ब्यारिस्टर मुकुंद यांच्याचसाठीं असल्यामुळें अर्थात् कोणाहि नवागत गृहस्थाशीं व त्याचप्रमाणे स्त्रीशीं त्यांची प्रथम ओळख करून दिली जात होती. वामनराव आल्याबरोबरच हा कृत्रिम सभ्यतेचा विधि व्हावयाचा; पण पहिल्याच धडाक्याला हा वादविवाद रंगास आल्यामुळें हा विधि तसाच राहिला होता. मुकुंदला याबद्दल फारसें वाईट वाटलें नाहीं; पण हा शुष्क वादविवाद मालतीसारख्या रसिक तरुणीनें एकाग्र चित्तानें ऐकावा, हे त्याला आवडलें नाहीं. मिस लीलाशीं

इतका वेळ त्याचें बरेंच मेतकुट जमलेलें असल्यामुळें तो तिला सहज हसून म्हणाला, " मिस लीला, ती एक तरुणी पहा, कशी ' वॉल फ्लावर ' सारखी तेथें उगीच बसून राहिली आहे. तिला इकडे आपल्या मंडळींत घेऊन या. "

विलायतेहून परतलेल्या गृहस्थानें एका बी. ए. झालेल्या त्यांतून अविवाहित तरुणीवरून लक्ष काढून तें दुसऱ्या एका तरुणीवर ठेवावें, हें मिस लीला यांना अर्थातच रुचलें नाहीं; पण मालतीला बोलावून आणून आपण तिच्यापेक्षांहि श्रेष्ठ आहों, हें मुकुंदला पटवून दिल्यावांचूनहि तिला राहवेना. ती मालतीजवळ गेली आणि हंसत हंसत ह्मणाली, " आपलेंच नांव मालती ना ? आपल्याला आंत बोलावून न्यावयाचें विस्मृतीनें राहूनच गेलें. या, आंत या, मी आपली सगळ्यांशीं ओळख करून देतें."

मालतीचा नाइलाज झाला. ती उठली आणि लीलाबरोबर आंत गेली. आंतल्या दिवाणखान्यांत जांताच मिस लीला मुकुंदजवळ जावून म्हणाली, " मिस्तर मुकुंद, ही वामनरावांची कन्या मिस मालती."

मुकुंदनें हंसत हसत आपला हात पुढें केला. इच्छा नसतां मालतीनेंहि आपला हात पुढें केला आणि ब्यारिस्टरसाहेबाशीं हस्तांदोलन केलें. लीला मोठ्या अभिमानानें या वेळीं मालतीला म्हणाली, " मी बी. ए. झाल्ये. तेव्हां तुम्ही इंग्रजी सहावींत होतां, आतां बहुतकरून कॉलेजांत जात असाल ? "

मालती नम्रतेनें म्हणाली, " नाहीं. मी यंदा म्याट्रिकला बसणार आहें."

अशा रीतीनें लीलेनें आपलें प्रभुत्व पुन्हां स्त्रीसमाजांत प्रस्थापित केलें. या समारंभासाठीं भामिनीबाई पांडे आणि त्यांची कन्या विमला या दोघी आल्या होत्या; हे वर सांगितलेंच आहे. विमलेनें आज विलक्षण नट्टा पट्टा केला होता. कासोट्याला रजा देऊन पार्शी स्त्रियांप्रमाणें ती रेशमी साडी नेसून आली होती. शिवाय चष्मा, रिस्टवॉच, पोलकें, बूट वगैरे बाबतींतहि तिनें सर्वांवर ताण केली होती. पांढऱ्या पावडरीनें चेहराहि रंगविला होता; तथापि तिच्या चेहऱ्याचें एकंदर वळण मुकुंदच्या हृदयावर उमटत आहे, असें कांहीं दिसेना. विमलाहि अगदीं सावधपणेंच

वागत होती आणि मधून मधून तिची आईहि तिला सुचवीत होती. मुकुंद-कडे पाहून हंसावयाचें, मुरडावयाचें वगैरे अनेक चेष्टा ती करीत होती. मुकुंदनें कोणालाहि विचारलें, तरी मध्यें तोंड घालून विमलेकडून उत्तर मिळत असे. अशा रीतीनें विमलेनें प्रयत्नाची पराकाष्ठा केली; पण हा माकडछाप माल मुकुंदच्या पसंतीस पडण्याचीं कांहीं चिन्हें दिसेनात. इतक्यांत या समाजांत मालती आल्यानें तर विमला अगदींच मागे पडली; परंतु भामिनी पांडे अशा रीतीने आलेली ही संधी गमावण्यास तयार नव्हत्या. त्या मुकुंदकडे वळून ह्मणाल्या, "आमची विमला पियानो फार उत्तम वाजविते. आपणहि वाजवीत असाल?"

मुकुंदला आपलें स्वतःचे स्तुतिस्तोत्र गाण्याचा आजच्यासारखा सुप्रसंग या पूर्वी केव्हांहि आलेला नसल्यामुळे 'बालिश बायकांत बहु बडबडला' या न्यायानें त्यानें आज आपली जीभ यंत्राप्रमाणे चालविली होती. त्याच्या अंगीं अनेक दोष असतील; पण तो फार गोड व मोहक बोलणारा होता. तसेच इंग्लडांत असतां त्यानें शिक्षणापेक्षां ख्याली खुशालीकडेच अधिक लक्ष दिले होते. तिकडच्या नाटक तमाशांत त्यानें रात्रीच्या रात्री घाल-विल्या असून हलक्या लोकांच्या नाचगाण्याच्या मैफलींतहि तो वारंवार भाग घेत असे. या क्रमानें त्याला पियानो चांगल्या रीतीनें वाजवितां येत असे. बाजाची पेटीहि वाजवीत असे. हे जरी गुण असले, तरी इक-डच्या एकाद्या नाटक्याच्या अंगींहि हे गुण असतां, त्याला आपण जी किंमत देतों, तितकीच विलायतेस मुकुंदच्या या गुणाला गृहस्थां-कडून किंमत मिळत होती. परतु विलायतेहून आल्यामुळें मुकुंदचे हेच गुण इकडच्या सुधारकांना अत्यंत श्रद्धेय वाटू लागले. भामिनीबाई पांडे यांनीं मुकुंदला तसा प्रश्न करतांच तो ह्मणाला, "मला प्रथम पियानो वाजवितां येत नव्हता. इंग्लंडांत गेल्यावर मी शिकलों. एके दिवशीं लॉर्ड मिलफोर्ड यांच्या घरी मला बॉलसाठीं बोलाविलें होतें तेथें माझी लॉर्ड साहेबांची मुलगी मिस एमाशी ओळख झाली. ती खरोखरच अप्र-तिम पियानो वाजविते. पियानो शिकविण्याबद्दल मी तिला भीतभीतच विनंति केली होती; पण ती तिनें मोठ्या आनंदानें मान्य केली आणि

मला पियानो वाजविण्यांत तरबेज करून सोडलें. हळू हळू लॉर्ड साहेबांच्या एकदर कुटुंबाशीं माझा फार परिचय झाला. त्यांचे वडील चिरंजीव मला बरोबर घेतल्यावांचून हाइडपार्कमध्ये फिरावयाला जात नसत."

मुकुंदने ही स्वतःची टिमकी वाजवीत असतां किती वेळां तरी आपली नजर मालतीकडे फिरविली होती. विमलेला हे सहन झालें नाहीं; पण मुकुंदची दृष्टि स्वतःकडे कशी आकर्षून घ्यावी हें तिला समजेना. लीलेलाहि तें आवडलें नाहीं. ती मुकुंदला ह्मणाली, "हे तुमचे लॉर्ड मिलफोर्ड अस्सल लॉर्ड कीं नकली लॉर्ड ?"

युक्तिवाद करण्यांत मुकुंदाहि कांहीं कमी नव्हता. तो ह्मणाला, "आपण कल्पना करूं कीं ते नकली लॉर्ड आहेत. तरी पण हिंदुस्तानांतल्या अस्सल लॉर्डापेक्षां त्यांची योग्यता खचित अधिक ठरेल."

मुकुंदचें हें भाषण ऐकून सगळ्या स्त्रिया हसूं लागल्या. लीलेचा चेहरा मात्र बराच लाल झाला. भामिनीबाईंना ही संधि बरी आहे, असें वाटून त्यांनीं पियानो वाजविण्याविषयीं मुकुंदला आग्रह केला. ती ह्मणाली, "तुह्मी पियानो वाजवा. माझी विमला पियानोवर इंग्रजी गीतें फार चांगलीं म्हणते."

भामिनीबाईचे हे शब्द ऐकून सगळ्याजणींनीं एकवार विमलेकडे पाहिलें आणि नंतर त्या एकमेकींकडे पाहून उपहासानें हंसल्या. मुकुंदलाहि असली कांहीं गम्मत पाहिजेच होती. त्यानें लागलीच पियानो वाजविण्यास आरंभ केला आणि तो विमलेकडे 'गा' अशा आज्ञार्थानें पाहूं लागला. भामिनीबाईहि तिला उत्तेजन देऊं लागल्या. 'म्हण, म्हण, तें हें म्हण' असें त्या तिला सुचवूं लागल्या. शेवटीं कांपऱ्या व बेसूर सुरांत 'लॉ लॉ लॉ रॉ रॉ रॉ' असें कांहीं गाणें तिनें म्हटलें. तें कर्णकटू संगीत ऐकून पुन्हां सगळ्याजणी हसल्या. मुकुंदनें पियानो वाजविण्याचें बंद करून बाजाची पेटी वाजविण्यास आरंभ केला आणि लीलेला संगितांतलीं पद्यें ह्मणण्यास विनंति केली. आपण फार चांगलीं पद्यें म्हणतों, असा लीलेला अभिमान होता. तिनें एक पद म्हणून नंतर दुसऱ्या एका स्त्रीला गाणें ह्मणण्याविषयीं सुचविलें. या क्रमानें लवकरच मालती-

वरहि पाळी आली. प्रथम तिनें भीतभीतच एक पद ह्मटलें; परंतु तिचा तो गोड आवाज, पद्धतशीर ह्मणणें आणि तिचे स्वभावतःच मनोहर असे आलाप यामुळे तें गाणें सर्वांना आवडून इतका वेळ झालेलीं गाणीं अर्थातच फिक्कीं पडलीं. मालतीला आणखीं पद्यें ह्मणण्याविषयीं आग्रह होऊं लागला. आतां तिची भीति बरीच कमी झाल्यामुळे तिनें आणखी दोन तीन गाणीं फारच बहारदार ह्मटलीं. अगोदरच मालतीवर मुकुंदचें मन आकृष्ट झालें होतें. त्यांत आणखी तिची संगीतांतली ही गति पाहून मुकुंद तिच्याभोंवतीं त्या रात्रीं मधमाशीसारखा हिंडूं लागला. याबद्दल लीलेला तर वाईट वाटलेंच; पण आमच्या भामिनीबाई पांडे यांच्या विमलेला किती वाईट वाटलें असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. यानंतर बागेंत युरोपियन पद्धतीप्रमाणें अल्प उपहार होऊन सर्व आमंत्रित मंडळी मुकुंदला दीर्घायुष्य चिंतून घरोघर निघून गेली. घडलेल्या एकंदर प्रकाराचा मुकुंदच्या व मालतीच्या मनावर काय परिणाम झाला होता, तें त्यांचें त्यांनाच माहीत. तथापि इतकें खरें कीं त्या रात्रीं दोघांनाहि चांगली झोंप लागली नाहीं.

---

## प्रकरण अकरावें.



मागील प्रकरणांत सांगितलेल्या गार्डन पार्टीला एक महिना लोटून गेला होता. या एका महिन्यांत दिनकरच्या संबंधानें त्याच्या दृष्टीनें थोडी नावडती अशी एक गोष्ट घडून आली होती. मुंबईच्या एका श्रीमान् गुजराथी गृहस्थास इंग्रजी शिकण्याची हुक्की आली. हे गृहस्थ सट्टेबाजीच्या धंद्यांत वयाच्या पंचेचाळीसाव्या वर्षीं अकल्पित रीतीनें लक्षाधिश झाले होते. हातांत पैसा खेळूं लागल्यावर शेटजींनीं आपल्या बुद्धिसामर्थ्यानें अनेक धंद्यांत यश मिळविलें आणि मागचें सगळें अपयश धुवून टाकलें. हातांत पैसा असल्यावर बाजारांतल्या कीर्तीच्या दुकानांतून कीर्ति मिळविण्यास कितीसा वेळ लागणार! शेटजीहि त्याप्रमाणें कीर्तिमान् झाले; परंतु सरकार दरबारींहि आपणास चांगला मान मिळून आपण नामदार

व्हावें असें खूळ शेटजींच्या डोक्यांत शिरलें व तेवढ्यासाठीं ते इंग्रजी शिकविणारा मास्तर शोधूं लागले. इंग्लिश भाषेंत चांगलें प्राविण्य संपादन केल्यावर एक विलायतची सफर करावयाची असाहि शेटजींनीं संकल्प केला होता. हळू हळू या गुजराथी शेटजींचा दक्षिणी सुधारकाशीं परिचय झाल्यावर त्यांनी आपणास एक चांगला शिक्षक मिळवून देण्याविषयीं या मंडळींतील विशेष परिचयाच्या गृहस्थांना विनंति केली. दिनकर एम. ए. होऊन पुढें काय करावें या विवंचनेत आहे, ही गोष्ट वामनरावांना माहीत असल्यामुळें त्यांनीं दिनकरला शेटजीकडे नौकरी लावून दिली आणि दिनकरचा धाकटा भाऊ दिवाकर, याला आपल्या मुलांना शिकविण्यास सांगितले. ही नौकरी दिनकरला फार चांगली मिळाली होती; पण स्वतः दिनकरनें थोड्या नाखुषीनेंच ही नौकरी पत्करली होती. शेटजींचे प्रायव्हेट सेक्रेटरी व शिक्षक अशीं दोन नातीं या नौकरींत होतीं. पगार शंभर रुपये. शिवाय शेटजींच्याच घरीं चोविस तास रहावयाचें असल्यामुळें दिनकरचा सगळा कच्चा खर्च शेटजींनींच पत्करला होता. सकाळीं सात ते नऊ शेटजींना शिकवावयाचें. बाकी दोन्ही वेळां शेटजींच्या पत्नीला जेवून त्यांच्याबरोबर गाडी-मोटारी मधून हिंडावयाचें; एवढेंच दिनकरला काम होतें. दिनकरच्या या नौकरीचा पुष्कळ एम. ए. झालेल्या गृहस्थांना खरोखर हेवा वाटत होता; पण आश्चर्य हे कीं, स्वतः दिनकर मात्र दुर्मुखलेला होता, आणि याचें कारण काय, तर मालतीची आणि त्याची झालेली ताटातूट.

मालतीची आणि त्याची ताटातूट झाली होती; याचा अर्थ दिनकरशिवाय इतरांना सांगतां येणार नाहीं. फार काय; पण स्वतः मालतीला देखील या ताटातुटीचा अर्थ समजला नसता; परंतु दिनकर मात्र त्या ताटातुटीवर विरहाचीं कवने करूं लागला होता. वास्तविक दिनकरला वामनरावांकडे जाण्यास मनाई होती, असें कांहीं नाहीं. तो दिवसांतून तेथें दहा वेळां गेला, तरी त्याला तेथें कोणी प्रतिबंध करणारें नव्हतें; परंतु 'कां आलां' असें कोणी विचारलें, तर त्याला जबाब काय देणार, या भीतीमुळें मालतीकडे जाण्यास त्याचें मन मागें घेत असे. तरी आठ दहा

दिवसांनीं तो तिच्याकडे एकदां कोणत्या तरी निमित्यानें जाऊन येत असे. मालतीनें कांहीं कविता केल्या होत्या. त्या अर्थातच दिनकरला फार आवडल्यामुळें त्यानें त्या तिच्याजवळून मागून घेतल्या आणि कोठल्या तरी मासिकपुस्तकांत प्रसिद्ध करण्याचा प्रयत्न चालविला. 'राष्ट्रदीप' नांवाच्या मासिक पुस्तकाच्या संपादकानें त्या कविता प्रसिद्ध करण्याचें कबूल करून त्या आपल्या जवळ ठेवून घेतल्या. कविता प्रसिद्ध होतांच तो अंक घेऊन मालतीकडे जावयाचें, असे दिनकरनें मनांत मांडे खाण्यास आरंभ केला होता; पण संपादक कसले खमंग! त्यांनीं त्या महिन्याच्या अंकांत कविताच प्रसिद्ध केल्या नाहीत. दिनकरला त्या संपादकाचा असा राग आला; पण काय करणार? संपादकानें जागेची अडचण दर्शवून दिलगिरी दाखविल्यामुळें दिनकरचा अगदीं नाइलाज झाला. राष्ट्रदीपाच्या पुढच्या अंकांत मात्र त्या कविता प्रसिद्ध झाल्या आणि परभारें छापखान्यांतूनच चार आण्यांना तो गरमागरम अंक बरोबर घेऊन दिनकर मालतीच्या घरीं येऊन दाखल झाला.

दिनकर वामनरावांच्या बंगल्याच्या दरवाजाजवळ जातो, तोंच त्याला अपशकुन झाला. दरवाजासमोरच एका घोड्याची सुरेख विलायती गाडी उभी असलेली पाहून दिनकरच्या हृदयांत धस्स झाले आणि आंत मुकुंद तर नाहीं? अशी त्याला शंका आली. असेना मुकुंद असला तर आंत! त्यामुळें दिनकरच्या पोटांत एवढें धस्स होण्याचें कांही कारण नव्हतें; पण मालतीच्या बाबतींत दिनकरची मनःस्थिति हळू हळू इतकी नाजुक होत चालली होती कीं, त्याला असला धक्का सहन होईनासा झाला होता. ती गाडी पाहतांच दिनकरचा अर्धा अधिक उत्साह नाहींसा होऊन मंद पावलें टाकीत त्यानें बंगल्यांत प्रवेश केला. मुख्य दिवाणखान्यात कोणींहि नव्हतें. चतुष्पाद खुर्च्या वगैरे आसनें मौन स्वीकारून स्वस्थ उभीं होतीं. दिनकर तसाच आणखी पुढें गेल्यावर त्याला एका खोलींत काळया रंगाचा साहेबी पोषाख केलेला एक तरुण पियानो वाजवीत असलेला दिसला. मालती त्या तरुणाच्या जवळच एका खुर्चीवर बसलेली असून ती गात होती. हा देखावा दिनकरच्या दृष्टीस स्पष्ट पडला आणि तो थोडा वेळ त्या दोघां-

कडे एकाग्र दृष्टीनें पहात होता; पण मालतीचें लक्ष त्याच्याकडे गेलें नाहीं. ती गाण्यांत व तो तरुण वाजविण्यांत अगदीं तल्लीन झालीं होतीं. दिनकरलाहि पुढें जाण्यास धैर्य होईना. आपल्या जाण्यानें रसभंग होईल, अशी त्याला भीति वाटून तो मुलांची अभ्यासाची जी खोली होती, त्या खोलींत जाऊन बसला. या वेळीं मालतीचे ते आलाप किती तरी मधुर होते; पण दिनकरला ते आज तितके रम्य वाटले नाहींत. उलट त्यामुळें त्याची हुरहुर वाढत जाऊन शरीरांतली उष्णताहि वाढत होती. हा मत्सराचा तर परिणाम नसेल ना ? अशी देखील एक वेळ दिनकरला शंका आली; पण तिचा त्यानें फारसा विचार केला नाहीं. इतक्यांत गायन संपलें. पियानोचे सूरहि थांबले. तो तरुण आनंदानें हुरळून जाऊन मोठ्यानें ह्मणाला, " वा ! फार उत्तम, फार उत्तम ! मिस मालती, तुमचा आवाज खरोखर कोकिलेच्या आवाजासारखा हृदय हलवून सोडणारा आहे. म्हणण्याची पद्धताहि फार चांगली आहे. इंग्लंडांत देखील इतक्या मधुर कंठाचें गायन मी मिस रोजलिंड शिवाय दुसऱ्या कोणाचें ऐकलेलें मला स्मरत नाहीं. तुमच्या आवाजांत जी एक निकोप तानेची लकेर आहे, ती मात्र तिच्या आवाजांत नव्हती. "

वरील स्तुतीमुळें लाजल्यासारखें करून मालती हंसत हंसत ह्मणाली, " आपण माझी निष्कारण स्तुति करतां. मला खरोखरच इतकें कांहीं चांगलें गातां येत नाहीं. आपण मघां जिचें नांव घेतलें, ती मिस रोजलिंड कोण ? "

मुकुंद आश्चर्यानें हसून ह्मणाला, " आं ! मिस रोजलिंडचें नांव तुह्मी अद्याप ऐकलें नाहीं ? ललितकलांना वाहिलेलीं इंग्लंडांतलीं मासिकें जर तुह्मी वाचीत असतां, तर तिच्याविषयीं तुह्मांला पुष्कळ माहिती झाली असती. ती अभिनयकुशल व गानकुशल प्रसिद्ध नर्तकी असून एका श्रीमान् नाटक मंडळीकडून तिला दरमहा शेकडों पौंड मिळतात. तुह्मीं देखील आपला गाण्याचा अभ्यास असाच चालू ठेवा, म्हणजे ही गायनकला तुह्मांला देखील चांगली वश होईल. "

या स्तुतींत खरें तात्पर्य कितीहि असो; पण त्यामुळें आपला मुकुंदनें

गौरवच केला असें वाटून मालती ह्मणाली, " पियोनो वाजविण्यांत आपण खरोखर अद्वितीय आहां. पडद्यावरून आपलीं बोटें कशीं यंत्रासारखीं फेरतात. माझा हात तसा चालत नाहीं. आपण शिकवाल का ? "

" हो हो ! मोठ्या आनंदानें. तुह्मीं फार थोड्या दिवसांत तयार व्हाल अशी माझी समजूत आहे. मला देखील प्रथम चांगला वाजवितां येत नव्हता आणि यामुळे माझी लॉर्ड मिलफोर्ड यांच्या येथे एकदां चांगली फजिती झाली. यांची कन्या मिस एमा पियानो अप्रतीम वाजविते. तिनें आपण होऊन पियोना वाजविण्यास शिकण्याचा मला आग्रह केला. मी तिच्याचजवळ शिकलों. थोडे दिवस चांगली मेहनत घेतल्यावर माझी या विद्येंत बरीच गति झाली. तुह्मी देखील लवकरच शिकाल. त्यांत विशेष कठिण नाहीं. " असें ह्मणून मुकुंदनें जाकिटाच्या खिशांतून एक लहानसा रेशमी रुमाल काढला आणि त्याचा दोन तीन वेळां वास घेतला. नंतर तोच रुमाल मालतीच्या नाकाजवळ नेऊन ह्मणाला, " या सेंटचा वास किती सुंदर आहे, हे पाहिलेंत का ? इंग्लडांत एका श्रीमान् डचेसच्या घरीं बॉल-साठी गेलों असतां तिनें हा सेंट शिंपडून मला नजर केला. याला वर्ष होऊन गेलें, तरी वास अजून तसाच कायम आहे. "

मालतीनें तो रुमाल मुकुंदच्या हातांतून घेऊन त्याचा नाजुकपणा पाहिला आणि त्याचा वास घेऊन म्हणाली, " खरोखर मोठा मनोहर वास आहे. इकडे कांहीं असलें सुवासिक सेन्ट मिळत नाहींत." असें म्हणून मालती तो रुमाल परत देऊं लागली; परंतु तो परत घेण्याचें नाकारून मुकुंदनें आपल्या हातानें मालतीच्या खिशांत तो ठेवला. बिचारा दिनकर हा सर्व प्रकार दुरून इतका वेळ कांहींसा शांतपणे पहात होता; पण या पुढें तसेंच स्वस्थ बसणें त्याला अशक्य झाले. तो तसाच उठला आणि त्या प्रकाराकडे आपलें लक्षच नाहीं, असें दाखवून मालतीच्या खोलीकडे गेला. कोणी परका पुरुष इकडे येत आहे, हे पाहून मुकुंदनें कांहींसें रोखून दिनकरकडे पाहिलें आणि तशाच अर्थानें त्यानें मालतीवरहि नजर टाकली. दिनकरला पाहतांच मालती खुर्चीवरून उठली आणि दिनकरकडे एक खुर्ची सरकावून म्हणाली, " या दिनकरराव, बसा." त्याप्रमाणें दिन-

कर त्या खुर्चीवर बसल्यावर मालती आपल्या खुर्चीवर बसून मुकुंदला म्हणाली, "हे आमचे मास्तर. हो, पण आतां माजी मास्तर. कारण हे हल्लीं एका श्रीमान् गृहस्थांचे प्रायव्हेट सेक्रेटरी असून यांचे धाकटे बंधु आम्हांला शिकवावयाला येत असतात."

दिनकरची ही अशी माहिती मालतीनें मुकुंदला करून दिल्यावर त्यानें प्रसन्न दृष्टीनें दिनकरकडे पाहून युरोपियन पद्धतीप्रमाणे किंचित् मस्तक लवाविलें आणि हस्तांदोलनासाठीं हात पुढें केला. दिनकरनेंहि स्मित करून हात पुढें केला आणि मुकुंदशीं हस्तांदोलन केले. इतका वेळ मुकुंदचा भाषणओघ जो अविरतपणे वहात होता, तो अर्थातच दिनकरच्या आगमनामुळे थांबला. दिनकरचें ते सुदृढ शरीर, त्याचा तो गोरा वर्ण आणि तेजस्वी व रुबाबदार चेहरा हीं पाहून मुकुंदसारख्या काळ्या साहेबाला साहजिक थोडें चमत्कारिक वाटले. थोडा वेळ या सभेने मौनच स्वीकारलें होतें. कोणी बोलत नाहीं, असें पाहून दिनकर मालतीला म्हणाला, "तुह्मांला देण्यासाठीं आज एक आनंददायक वस्तु आणली आहे." असें ह्मणून दिनकरनें राष्ट्रदीप मासिकाचा अंक मालतीच्या हातीं दिला.

त्या अंकावर वर वर नजर टाकून तो तसाच तिनें हातांत धरला आणि त्यांत कांहीं विशेष नाहीं. असें दर्शवून ती ह्मणाली, "त्या कविता वाटतं! इतक्या दिवसांनीं माझें भाग्य सुप्रसन्न झालें म्हणावयाचें? याबद्दल त्या संपादकाचे उपकार मानले पाहिजेत आणि आपले उपकार मानले पाहिजेत. इतक्या तांतडीनें हा अंक कशाला आणला? आणखी चार दिवसांनीं आमचा आलाच असता."

अरेरे! किती आशेनें आणि केवढ्या उत्सुकतेनें तो अंक घेऊन दिनकर आला होता! तो अंक पाहतांच मालतीला किती तरी संतोष होईल आणि त्यामुळे मजविषयीं तिला कितीतरी आदर वाटेल, अशी मनोराज्याची इमारत दिनकरनें बांधली होती; परंतु मालतीनें त्याला अगदीं नाउमेद करून टाकलें. इकडे मुकुंदला मात्र खरोखर फार आनंद झाला. मालती कविता करते, हें ऐकून त्याला कां आनंद होणार नाहीं? तो मालतीकडे आनंदानें व आश्चर्यानें पाहून ह्मणाला, "अं:! मला वाटलें तुह्मांला

नुसतें गातांच
क्रमच मला
तील का ? "

मालती
ह्मणाली, "छे:
आपण त्या पाह

मुकुंदहि कां
हंसत तो अंक म
विनोदानें पाहून तो
अरसिक नाहीं; आणि
संपादकानें छापल्याच नसत्या.
" कायहो, मी ह्मणतों तें खरंना
केल्या आहेत ? "

या वेळीं दिनकरची स्थिति मोठी अनुकंपनी
कल्पनाहि नसलेला प्रसंग आपण पहात आहों, असें वाटून
शीलता कसाला लागण्याच्या बेतांत आली होती. मुकुंदचा
ऐकून तो कांहींसा उदसीनतेनें ह्मणाला, " या कवितावर ' कोकिळ '
शिरोनाम आहे. शेले कविच्या ' स्कायलार्क ' कवितांवरून ह्या कविता रचलेल्या आहेत; पण त्या कवितांचा हा केवळ अनुवाद नसून स्वतंत्र विचार असे पुष्कळ आहेत आणि त्यावरून कवियत्रीची प्रतिभा चांगली दिसून येते. "

काव्यानंदानें अगदीं बेहोष होऊन मुकुंद ह्मणाला, " ओ, स्कायलार्क स्कायलार्क ! अहाहा ! किती गोड कविता त्या, आणि त्यांतले काव्य तरी किती रम्य !

> Hail to thee, blithe Spirit !
> Bird thou never wert,
> That from heaven or near it,
> Pourest thy full heart

मालतीकडे
ळ' कवित-
उंच भराऱ्या
क उच्च होत
ळ' कवितेची
ा मुग्ध होऊन
mystery ह्मणून
पक्षी आणि मनुष्य

are those
dest thought.' "

प्रगट करण्याच्या उद्देशानें मुकुंद ह्मणाला, "खरोखर
वचन मला फार आवडलें. शेलेचीं काव्यें मला देखील
तात. आपण फार बहुश्रुत असून आपलें वाचनहि फार दांडगें
. आपल्या ओळखीनें मला फार आनंद झाला. आपण हल्लीं काय
करीत असतां! "

दिनकर कांहीं उत्तर देणार तोंच त्या खोलींत वामनराव आपल्या दोघां मुलांना बरोबर घेऊन तेथें आले. त्यांना पाहतांच दिनकर खुर्चीवरून उठला आणि त्यानें वामरावांना नमस्कार केला. वामनरावांनींहि त्याला उलट नमस्कार करून बसण्याविषयीं सुचविलें. ते मुकुंदला ह्मणाले, " तुह्मीं केव्हां आलां? दिनकररावचा आणि तुमचा चांगला परिचय नाहीं असें दिसतें? यांच्याशीं तुह्मीं अवश्य ओळख करून घ्या. हे फार विद्वान् गृहस्थ आहेत. नुकतेच एम्. ए. झाले आहेत. यांची वृत्ति सरळ, तेजस्वी व सत्याग्रही असून तसेच ते अंतःकरणाचे फार थोर आहेत. "

मुकुंद हंसून ह्मणाला, "तुह्मी ह्मणतां त्याचा अनुभव मला नुकताच आला. शेले व वर्डस्वर्थ या दोघां कवीसंबंधानेंच आह्मीं बोलत होतों.

यांनीं जें काय सांगितलें त्यावरून हे रसिक व बुद्धिमान् गृहस्थ आहेत, अशी माझी खात्री होऊन चुकली आहे. यांच्यासारख्या विद्वान् गृहस्थानें विलायतेस जाऊन आतां तिकडील ज्ञानोदधि मथन करावा, असें मला वाटतें. यामुळे यांचा तर फायदा होईलच पण आमच्या देशाचेंहि पुष्कळ हित होईल."

वामनराव कांहीं बोलण्याच्या आधीच मालती ह्मणाली, "तुह्मी ह्मणतां तें खरें; पण विलायतेस जाण्याला ते तयार होतील कीं नाहीं, याची मोठी शंका आहे. ते कांहीं तुमच्या आमच्यासारखे हिंदु नाहींत, ते पक्के हिंदु आहेत."

असें ह्मणून मालती हसूं लागली. मुकुंदलाहि हंसूं आलें. तो ह्मणाला, "ती शंका मला यांना पाहताच यांच्या पोपाखावरून आली."

दिनकर ह्मणाला, "आमच्या राष्ट्राचा जो पोपाख आहे, तो मी करतो. ह्यांत अनुचित तें काय? उलट परकियांच्या पोपाखानें नटणें ह्मणजे आह्माला आमच्या राष्ट्राचा अभिमान नाहीं, असें कबूल करण्यासारखें आहे."

विलायतेस जाण्याची मला देखील पुष्कळ इच्छा आहे; पण पैशाच्या अडचणीमुळे मला अद्याप त्या बाबतींत कांहीं करतां आलें नाहीं. आतां आपण ज्ञानाच्या संबधानें ह्मणाल, तर तें इकडे संपादन करतां येणार नाहीं, असें कांहीं नाहीं. तसा प्रयत्न मात्र झाला पाहिजे. टेम्स नदीच्या पाण्यानें स्नान केल्यावांचून खरें ज्ञान प्राप्त होत नाहीं, ही समजूत ह्मणजे अमुक तीर्थावर स्नान केलें असतां मुक्ति मिळते; हें मानणाऱ्या हिंदुप्रमाणेंच अंधश्रद्धेचें आहे. पण आम्हीं हिंदूंना हंसतों, यांना मात्र हंसत नाहीं. सिव्हिलसर्विसची परिक्षा हिंदुस्थानांत सुरू झाली, तर पुष्कळ तरुण सिव्हिलियन होतील; पण ती सोय नसल्यामुळें टेम्सच्या कांठीं तर्पण करण्यास जावें लागतें. यामुळे इकडच्या दरिद्री; पण बुद्धिवान् गृहस्थांपेक्षां मठ्ठ; पण श्रीमान् गृस्थच सिव्हिलियनची अथवा तिकडच्या अन्य परीक्षा देऊन येतात. आतां इतकें खरें कीं, पाश्चात्य लोक शिक्षणाच्या बाबतींत आमच्यापेक्षां पुष्कळ पुढे आहेत आणि तिकडे शिकविण्या-

ऱ्या पद्धतीहि फार चांगल्या असतील. आमच्या इकडच्चीं कॉलेजें ह्मणजे नौकर तयार करणारे कारखाने आहेत. स्वतंत्र बुद्धिमत्तेचीं माणसें पैदा व्हावींत अशी शिकविण्याची पद्धतीच नाहीं. असें असूनहि इकडे रानडे, टिळक, प्रो. बोस यांसारखीं माणसें पैदा झालीं आहेत, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. इंग्लंडप्रमाणें इकडचेंहि शिक्षण अगदीं स्वतंत्र असें होईल, तर इकडे अनेक बुद्धिमान् लोक आहेत, असें दिसून आल्यावांचून राहणार नाहीं."

दिनकरच्या या म्हणण्यास चांगलें उत्तर देऊन या छोट्या सभेंत आपलें श्रेष्ठत्व प्रस्थापित करावें, असें मुकुंदला फार वाटलें; पण त्या वेळीं त्याची समयसूचकता त्याला तितकी प्रसन्न झाली नाहीं. तेव्हां अर्थातच त्याला दिनकरचें म्हणणें थोडेबहुत कबूल करावें लागलें. तो म्हणाला, "माझ्या बोलण्याचा अर्थ आपण निराळा केला, असें दिसतें. आपल्या देशांत विद्वान् लोक नाहींत, असें कांहीं मी म्हणत नाहीं; पण हेच लोक जर विलायतेस जाऊन तेथील विद्वानांच्या सहवासांत कांहीं दिवस राहतील, तर विद्वत्ता तिकडे कशी पाणी भरीत आहे, हें आपणास दिसून येईल. ज्ञान संपादन करण्याचीं तिकडे जीं विविध साधनें आहेत, त्यांची आपणास इकडे नुसती कल्पनाहि करतां येणार नाहीं. शिल्प आणि विज्ञान हीं दोन्ही जणूं तिकडे सजीव दिसतात. सरस्वती प्रत्यक्ष सशरीर तेथें नांदत आहे, असें वाटतें."

दिनकर कांहींच बोलला नाहीं. वामनराव म्हणाले, "तुमचें म्हणणें खरें दिसतें. आमच्या इकडच्या शिक्षणांत सजीवता म्हणून नाहीं."

खुर्चींत येऊन मुकुंद म्हणाला, "फार लांब पहावयाला नको. आमच्या कॉलेजांतून शेक्स्पीयरचीं नाटकें वाचतात; पण तीं आम्हांला किती तरी निर्जीव वाटतात. हींच नाटकें इंग्लंडांतल्या कॉलेजांत आपण शिकूं लागलों म्हणजे शेक्स्पीयरच्या नाटकांतील प्रत्येक व्यक्ति आपणापुढें सजीव उभी राहून तीच जणूं आपलें मनोगत सांगत आहे, असें वाटतें. शिवाय थियेटरांतून होणारीं नाटकें. नाट्यकलेचें इतकें उज्ज्वल स्वरूप इंग्लंडशिवाय दुसऱ्या कोठेंहिं पहावयाला मिळावयाचें नाहीं. इकडील विद्यार्थ्यांनीं

तर तीं नाटकें पाहणें फार फायद्याचें असतें. त्याच शेक्सपीयरची इकडे कशी हेळसांड होते, हें तुम्हाला माहीत असेलच ? ''

दिनकरला हा विषय अगदींच रुक्ष वाटूं लागला; पण तो तरी काय करणार ? हो, नाहीं, असें कांहीं तरी उत्तर दिल्यावांचून इलाज नसल्यामुळें तो म्हणाला, '' आमच्या इकडे कोणत्याहि नाटकाचें घ्या, प्रोफेसरसाहेब जीं काय टिपणें घ्यावयास सांगतील, तेवढेंच त्या नाटकाचें रहस्य. शेक्सपीयरचें एक असो; पण घरच्या कालिदासाला तरी पाहणारे कोठें आहेत ? ''

वामनराव मुकुदला म्हणाले, '' इंग्लंडांत सर हेनरी आरविंग नांवाचे अत्यंत अभिनयकुशल असे नट आहेत, त्यांना कित्येक नाटकांतून नटाचें काम करतांना तुम्ही पाहिलें असेल ? ''

लांब लांब हातवारे करीत मुकुंद म्हणाला, '' वाः ! तर काय तीन वर्षें मीं विलायतेस उगीच काढलीं ? सर हेनरी आरव्हिंगचें नाटकांतलें काम मीं पाहिलें, एवढेंच नाहीं, तर अभिनय कसा करावा, हें त्यांच्याजवळ शिकून मी आपलें स्वतःचें कामहि त्याला दाखविलें. ''

मुकुंदचें हें भाषण ऐकून सगळेच त्याच्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले. स्वारी कांहीं कमी गप्पीदास नाहीं, अशा अर्थानें वामनराव व दिनकर या दोघांना आश्चर्य वाटलें. मालतीला मात्र मुकुंदबद्दल खरोखरच कौतुक वाटलें. वामनराव म्हणाले, '' विलायतेंतलीं हीं तीन वर्षें तुमचीं फारच चांगल्या रीतीनें गेलीं म्हणावयाचीं, त्या नाट्याचार्यांची आणि तुमची कशी काय गांठ पडली ? ''

मुकुंद म्हणाला, '' आमच्या कॉलेजांत कायद्याचा अभ्यास करणारे जेवढे विद्यार्थी होते, त्यांनी एक ड्राम्याटिक क्लब स्थापन केला होता. अजूनहि हा क्लब आहे. एकदां आम्ही हॅम्लेट नाटक बसविलें आणि त्याचा खाजगी प्रयोग लॉर्ड मिलफोर्ड यांच्या वाड्यांत केला. तो पाहण्यास मोठमोठाले विद्वान् व श्रीमान् गृहस्थ आले होते. त्यांतच सर हेनरी आरव्हिंग हेहि आले होते. ''

दिनकर म्हणाला, '' या नाटकांत तुम्ही कोणती भूमिका घेतली होती ?''

मुकुंद म्हणाला, " हॅम्लेटची. "

वामनराव कांहींच बोलले नाहींत; पण मालती मोठ्या कौतुकानें म्हणाली, " मग पुढें काय झालें ? "

मुकुंद म्हणाला, " त्या दिवशीं माझी ती हॅम्लेटची भूमिका फारच चांगली उठली. सर हेनरी आरव्हिंग शेवटपर्यंत बसले होते. प्रयोग संपल्यावर त्यांनीं मला बोलावलें आणि माझ्याशीं शेकह्यांड करून मला आपल्याजवळ बसविलें. "

मालतीची जिज्ञासा अधिकच वाढली. ती म्हणाली, "पुढें काय झालें ?"

मुकुंद म्हणाला, " माझ्या एकंदर भूमिकेचें परीक्षण करून त्यांनीं मला माझे थोडे दोष दाखविले. नंतर ते मला म्हणाले, 'मिस्तर मुकुंद, आपण जर या आमच्या नाटकाच्या धंद्यांत पडाल, तर लवकरच माझा पहिला नंबर आपण पटकवाल आणि मला दुसऱ्या नंबरावर जाऊन बसावें लागेल.' मीं लागलीच त्यांची ती स्तुति सव्याज परत करून 'तुम्हांला ही भीति बाळगण्याचें कारण नाहीं' म्हणून सांगितलें. आमच्या देशांत हा धंदा फार कमी प्रतीचा समजतात, असें जेव्हां मीं त्यांना सांगितलें, तेव्हां तर त्यांच्या आश्चर्याला सीमाच राहिली नाहीं. यानंतर त्यांच्या व माझ्या अनेक मुलाखती झाल्या. तसेंच त्यांच्यामुळें इंग्लंडांतील कांहीं बड्या बड्या गृहस्थांच्याहि ओळखी झाल्या. "

वामनराव संतुष्ट झाल्यासारखें दाखवून म्हणाले, " खरोखर आपण आपला वेळ इंग्लंडांत फार चांगल्या रीतीनें घालविला. सर हेनरी आरव्हिंगसारख्या बड्या गृहस्थानें आपली स्तुति केली, यावरून आपली योग्यता सहज समजते. "

मालती म्हणाली, " त्यांनीं हा तुमचा गौरव केला असें म्हणण्यापेक्षां आमच्या हिंदुस्थानाचाच गौरव केला, असें म्हटलें पाहिजे. नाहीं मास्तर ?"

मास्तर—दिनकर—काय आपलें कपाळ सांगणार ? मास्तर इतके दिवस मालतीकडे महाराष्ट्र गौरव म्हणून प्रसिद्ध होते; पण आतां त्यांच्याहि वरची अशी ही ब्यारिस्टर साहेबांची 'भारत गौरवा मूर्ति' आल्यामुळें बिचाऱ्या दिनकरच्या अंतःकरणाची तळमळ सुरू झाली होती. बळेंच

हंसल्यासारखें करून डोकें खाजवीत खाजवीत तो म्हणाला, " हो, हो ! तसें म्हणावयाला कांहीं हरकत नाहीं; पण सर हेनरी आरव्हिंग—"

दिनकरला पुढें बोलू न देता मुकुंद मध्येंच म्हणाला, " त्यांच्या वागणुकीसंबंधानें म्हणतां होय ? वा: ! ते फार सुशील आणि सज्जन गृहस्थ आहेत. त्यांना अभिमान असा मुळींच नाहीं. तसेंच हिंदी गृहस्थांसंबधानें त्यांच्या ठिकाणीं पूर्ण सहानुभूति आहे. त्यांची गुणग्राहकता, तर अपूर्व आहे."

वामनराव म्हणाले, " तसें असल्यावाचून ते जगात इतक्या पुढे आले नाहींत, हें स्पष्टच दिसतें. "

मालती म्हणाली, " ते नाटकी म्हणून सभ्य समाजांत त्यांचा व्हावा तसा आदरसत्कार होत नसेल ? "

मुकुंद म्हणाला, "छे:, छे:! तें कांहीं हिंदुस्थान नाहीं आणि तिकडील नटहि पण इकडील नटाप्रमाणें व्यसनी, शीलहीन व गचाळ नाहींत. त्यांतून सर हेनरी आरव्हिंग यांच्या चरित्रावर तर नजर टाकण्यास मला चांगलीच संधि मिळाली. त्यांचा आणि माझा परिचय जसजसा दाट होत गेला, तसतशी त्यांची निर्दोष वागणूक माझ्या दृष्टोत्पत्तीस येऊं लागली. एकदां त्यांच्या आग्रहावरून हॅम्लेट नाटक पहावयाला गेलों होतों. हॅम्लेटची भूमिका स्वत: त्यानींच केली होती. त्या वेळीं त्यांची ती अभिनय-कुशलता पाहून जणू त्यांच्या हृदयांतील उदात्तताच पहात आहे, असें मला वाटलें.

There is a soul of goodness in things evil
Could we but opservingly distil it out.

हे शब्द त्यांच्या तोंडांतून इतक्या बहारीनें निघाले आणि त्यांतहि त्यांनीं Soul शब्दावर जो जोर दिला, त्यामुळें त्यांच्या स्वत:च्याच आत्म्याची ओळख जणू ते प्रेक्षकाना करून देत आहेत असें वाटलें.

आतां या बाबतीत कांहीं बोलावयाचें नाहीं, असा दिनकरनें निश्चय केला होता; पण आता मात्र त्याला बोलल्यावांचून राहवेना. तो म्हणाला, " तुमची चूक तर होत नाहीं ना ? वरील शब्द शेक्स्पीयरच्याच हॅम्लेटचे आहेत ना ? "

मुकुंद किंचित् ठासून ह्मणाला, " होय. हॅम्लेटचेच आहेत. "

वामनराव ह्मणाले, " मास्तर, तुह्मालाच कदाचित् विस्मरण झालें असावें. मिस्तर मुकुंद यांनीं हॅम्लेट वाचले आहे, असे नाहीं; तर हॅम्लेटची त्यांनीं भूमिकाहि केली आहे. "

मिस्तर मुकुंदहि फुगून जाऊन ह्मणाले, " हॅम्लेट अथपासून इतीपर्यंत मीं मुखोद्गत केले आहे. हॅम्लेटचें पारायण केल्यावांचून कांहीं मला ती भूमिका करतां आली नाहीं. मिस्तर दिनकरराव, ह्मणूनच मी म्हणतों कीं, कोणतेंहि शास्त्र तिकडे सजीव आहे आणि इकडे आम्ही निर्जीव विद्येचें पूजन करीत आहों. तिकडचा ज्ञानरवी कसा प्रखर आहे, याची कल्पना सांगून यावयाची नाहीं. प्रत्यक्ष तेथंच कांहीं दिवस घालविले पाहिजेत. तिकडच्या ज्ञानाची आपण इकडे नुसती छाया पाहतों. प्रतिध्वनि ऐकून खऱ्या शब्दाचें स्वारस्य कसें कळणार ? आतां तिकडे पैसे थोडे अधिक लागतात हे खरें; पण मिस्तर दिनकरराव, तुह्मी पैशाची कांहीं काळजी करूं नका. तुह्मी विलायतेस जाण्याच्या उद्योगाला लागा, ह्मणजे पैशाच्या बाबतींत काय करावयाचें, हें तुमचें तुह्मांलाच ठरवितां येईल. खरोखर आपल्यासारख्या विद्वान गृहस्थानें इग्लंडांत अवश्य जावयास पाहिजे. त्यामुळे तुमचा तर फायदा होईलच; पण आमच्या देशाचेंहि पुष्कळ कल्याण होईल. "

दिनकर ह्मणाला, " मी मोठा विद्वान आहे, असे आपणास वाटत असेल; पण तसें समजूं नका. कशी तरी एम्. ए. ची परीक्षा पास झालों आहे, एवढेंच आतां कोठे तरी पाचपन्नास रुपयांची नौकरी मिळाली, म्हणजे आमच्या शिक्षणाचें सार्थक झालें ! "

वामनराव म्हणाले, " दिनकरराव, तुमच्यासारख्या आशावादी गृहस्थानें असें निरुत्साह होतां कामा नये. विलायतेस जावयाचेंच असा तुह्मी निश्चय करा म्हणजे पैशाची कांहीं तरी व्यवस्था झाल्यावांचून राहणार नाहीं. "

हंसत हंसत मुकुंद ह्मणाला, " महत्त्वाकांक्षा हा गुण देखील आम्हीं पाश्चात्यांपासूनच शिकावयाला पाहिजे. मनुष्यानें समाधानवृत्तीनें रहावें हें खरें; पण योग्य कारणासाठीं त्यानें आपली महत्त्वाकांक्षाहि जागृत

ठेवली पाहिजे. दोष दिनकररावांचा नाहीं, तर इकडच्या शिक्षणाचाच आहे. मनुष्याची जिज्ञासा वाढत न जातां ती कमी व्हावी, असा इकडच्या शिक्षणांतच दोष आहे. अहो, म्युझियम आणि राणीचा बाग हीं तर या शहरांत आहेत ना; पण तीं तरी काळजीपूर्वक किती पाहतात ? "

यावर दिनकर कांहीं सांगणार तोंच मालती आपल्या बापाला ह्मणाली, " बाबा, खरेच किती तरी दिवसांपासून राणीच्या बागेत जाण्याचा बेत चालला आहे; पण अजून कांहीं जाणें झालें नाहीं. या रविवारीं चला ना आपण सगळेच जाऊं. "

वामनराव ह्मणाले, " रविवारीं तर मला मुळींच यावयाला व्हावयाचें नाहीं. " नंतर ते मुकुंदकडे वळून ह्मणाले, " मिस्तर मुकुंद, या रवि-वारीं मालती, मदन आणि वसंत यांना घेऊन तुम्ही राणीच्या बागेंत घेऊन जाना ! त्यांना नीट सगळें दाखवा आणि समजावूनहि द्या. "

प्रफुल्लतेनें मुकुंद ह्मणाला, " हो, हो, मोठ्या आनंदानें. इंग्लंडांत असतां ब्रिटिश म्युझिअम, हाईडपार्क वगैरे पाहण्यासारखीं ठिकाणें मीं गेल्याबरोबर पाहिलीं; पण त्यांत विशेष असें मला कांहीं वाटलें नाहीं. पुढें मी आणि लॉर्ड मिलफोर्ड यांची मुलगी मिस एमा असे उभयतां म्युझिअम पाहण्यास गेलों असतां त्या मुलीनें एकेका वस्तूची माहिती करून देऊन जेव्हां ती ती वस्तु मला दाखविली, तेव्हां मी देखील आश्चर्यानें थक्क होऊन गेलों. तेव्हांपासून असलीं विशेष ठिकाणें पहाव-याचीं कशीं याचा मी थोडासा अभ्यासच केला. येथल्या राणीच्या बागेंत देखील पुष्कळ लोक जातात आणि येतात; पण चिकित्सक बुद्धीनें पाह-णारे असे फारच थोडे असतात. असे बाग पहात असतां वनस्पतिशा-स्त्राची माहिती फार चांगली होते. मी येत्या रविवारीं या सर्वांना अवश्य घेऊन जाईन. "

मालती हंसत हसत ह्मणाली, " पहा, मग विसराल हो. "

मुकुंदहि हसून व मालतीकडे पाहून ह्मणाला, " छेः, छेः ! त्याची तुह्मांला काळजी नको. दुपारीं दोन वाजतां मी माझी स्वतःचीच गाडी घेऊन येतों. "

मालती दिनकरकडे वळून ह्मणाली, " मास्तर, तुह्मी याल का रविवारीं बागेत ? "

दिनकरची स्थिति अगदींच चमत्कारिक झाली होती. विशाल बुद्धि, बाणेदार वृत्ति आणि अन्यायाची चीड हे गुण स्वभावतःच दिनकरच्या अगीं होते. मुकुंद आणि मालती या दोघांच्या हास्यविनोदाचा त्याच्या मनावर परिणाम होण्याचें वास्तविक कांहीं कारण नव्हतें; परंतु दिनकर-सारखा सद्गुणशील तरुण या वेळीं मत्सरानें ग्रस्त झाला. इतके दिवस आपणाशीं गोड बोलणारी मालती मुकुंदचें दर्शन होतांच आपणास विस-रून गेली, हें जेव्हां दिनकरच्या लक्षांत आलें; तेव्हां आपल्या न्याय्य वस्तूवरच जणू कोणी घाला घातला, असें त्याला वाटलें. ज्याच्या अंतः-करणांत नेहमीं उदात्त विचार यावयाचे, त्याच्याच अंतःकरणांत हे असे क्षुद्र विचार उत्पन्न व्हावेत याबद्दल कोणासहि उद्वेगच वाटेल. मालतीच्या प्रश्नाला दिनकरकडून चटकन उत्तर मिळत नाहीं, असें पाहून वामनराव ह्मणाले, " नको. त्यांना आग्रह करूं नकोस. त्यांनीं आतां नोकरपेशा उच-लला आहे. त्यांना यायला व्हावयाचें नाहीं. "

अजूनहि दिनकर मुकाट्यानेंच बसला होता. मुकुंदनें मात्र डोक्याला साहेबी टोपी घातली आणि रविवारचा बेत नक्की करून तो निघून गेला. जाताना त्यानें हसत हसत मालतीशीं हस्तांदोलन केलें आणि मग तो निघून गेला. मागून मालतीहि त्या दिवाणखान्यांतून दुसरीकडे निघून गेली. आतां जाहाजम झटकायची वेळ आली असें पाहून दिनकरनेंहि वामनरावांचा निरोप घेतला आणि हळू हळू आपल्या घराकडे चालूं लागला. आज तो किती तरी उत्साहानें आला होता; पण त्या बिचाऱ्याची आज कल्पनेच्या बाहेर निराशा झाली होती. मालतीच्या कविता प्रसिद्ध व्हाव्यात ह्मणून त्यानें किती तरी खटपट केली होती; पण या सर्व परिश्रमाचा मोबदला मालतीकडून अगदीं चमत्कारिक असा मिळाल्यामुळें त्याला आतां दाही दिशा शून्य दिसूं लागल्या होत्या. त्याच्या हृदयावर आज जो आघात झाला होता, तो त्याच्याच चुकीमुळें झाला होता. खोटी आशा बाळगल्यामुळें त्यानें स्वतःच आपलें चित्त उद्विग्न करून

घेतलें होतें. दिनकरसारख्या तेजस्वी तरुणानें केवळ काव्यमय ऐहिक सौख्याच्या कल्पनेला बळी पडून इतकें दुर्बळ बनावें, याबद्दल कोणालाहि आश्चर्य वाटेल. स्त्री असावी, तर अशी अशी असावी वगैरे त्याचे विचार वाचकांना पूर्वींच माहीत झालेले आहेत. मालतीच्या स्वभावाचें निरीक्षण दिनकरनें जर चांगल्या रीतीनें केलें असतें, तर स्वतः दिनकरलाहि आपल्या अंगीं अनेक दोष आहेत असें दिसून आलें असतें. त्याला पियानो विकत घेण्याची शक्ति नव्हती, वाजवितांहि येत नव्हता आणि पियानोचा व ऐहिक सौख्याचा काय संबंध असतो, असें जर कोणी विचारलें असतें, तर त्याचें त्याला उत्तर देतां आलें नसतें. बाजाच्या पेटीचेंहि तसेंच. गाण्याची गोष्टहि तशीच. स्त्रीला बरोबर घेऊन हातांत हात घालून फिरण्यानें ऐहिक सौख्यांत कशी भर पडते किंवा संसारांतल्या कोणत्या आपत्ति टळतात? असें जर त्याला विचारलें असतें, तर तो खचित निरुत्तर झाला असता. आपलें मन भलत्याच मार्गानें—अन्यायाच्या मार्गानें—वहावत आहे, हें त्याच्या लक्षांत येत नसे असें नाहीं; पण स्वतःच्या प्रकृतीचा तो आतां जेता नसून जित होता. त्याचें मन कृत्रिम प्रेमाच्या देखाव्यानें दिपून गेलें होतें आणि त्यामुळें आपल्या स्वतःच्या गृहलक्ष्मीचा आपण अपराध करीत आहों, हेंहि त्याच्या लक्षांत येईनासें झालें होतें. मालतीकडे एकटा मुकुंदच काय पण आणखी दहा तरुण तिच्या बरोबर हसण्याबोलण्यास आले, तरी त्याबद्दल दिनकरला विषाद वाटण्याचें कारण नव्हतें; परंतु त्याचें मन मत्सरग्रस्त झाल्यामुळें मुकुंदनें मालतीशीं हंसणें बोलणें ह्मणजे आपला अपमान करणें होय असें त्याला वाटूं लागलें.

---

## प्रकरण बारावें.



स्वाभाविक सद्गुणाकडे ओढा असलेल्या दिनकरला देखील ते दोनचार दिवस थोडे कठिणच गेले. आतां पुन्हां मालतीच्या घरीं जावयाचें नाहीं, असा निश्चय करून तो प्रकृतीवर विजय मिळविण्याच्या उद्योगाला लागला.

कांही कारणामुळें शेटजींच्या बरोबर त्याचे सात आठ दिवस बाहेर गावी जाणे झाल्यानें हा त्याचा उद्योग बराच फलद्रुप झाला. हळू हळू मालतीला तो विसरू लागला. आपल्या अंतःकरणांत मालतीला आश्रय देण्याचा न्यायतः आपणास कांही अधिकार नाही, असे त्याला वाटलें. ज्याच्यावर सर्वस्वी त्या गृहदेवतेची—त्या लक्ष्मीची—मालकी आहे आणि जी केवळ विश्वासु रक्षक ह्मणून स्वतःच्या स्वाधीन जिने केली आहे, ती हृदयातील प्रेमज्योति मी मालतीला मालवूं देणार नाही, अशी त्याने प्रतिज्ञा केली. मुंबईस परत आल्यावर आणखी आठ दहा दिवस त्याचे मालतीच्या भेटीवांचूनच गेले. असेच कांहीं दिवस दिनकरने घालविले असते तर—

पण तेवढा मनोनिग्रह पाहिजे ना ? मनावर सत्ता चालवावयाची वाटते सोपे; पण ते तितके सोपे नाही. अगदी क्षुल्लक कारणामुळे देखील हा मनाचा निग्रह ढांसळतो, आणि दिनकरचेंहि तसेच झाले. शेटजींनीं त्याला जी एक स्वतंत्र खोली दिली होती, त्या खोलींत तो स्वस्थ बसलेला असतां शेटजींच्या मनुष्याने एक पत्र त्याच्या हाती आणून दिलें. पत्रावरील आवरण पाहतांच ते मालतीचे पत्र आहे, हे त्याने हस्ताक्षरावरून तेव्हाच ओळखलें. ते पत्र पाहतांच मोठ्या कष्टाने जे विचार दिनकरने इतक्या दिवसाच्या प्रयत्नाने थोपटून निजविले होते, ते पुन्हां जागृत होऊं लागले. जे आशेचे तंतु तुटले होते, ते ते पत्र वाचून पाहण्याच्या आधींच पुन्हां गांठणीनें सांधूं लागले. यावेळीं मनोनिग्रहाची दिनकरला फार आवश्यकता होती; परंतु काव्यमय प्रेमाच्या कल्पना इतक्या वाढल्या की, त्याला त्या कल्पनांचे दास व्हावे लागले. कदाचित् त्या पत्रांत निराशेचा तडाखाहि असेल, अशी दिनकरला शंका आली; पण एकंदरींत त्याने तें पत्र मोठ्या उत्सुकतेनेच फोडले.

मुंबई, शांतीसदन. तारीख—

श्रीयुत दिनकरराव यांस.

प्रेमपूर्वक सविनय सा. नमस्कार, आपली भेट नाहीं व निरोप वगैरेहि नाहीं यामुळें मोठी हुरहुर वाटते. आज जवळ जवळ वीस

दिवसांत तुमचे दर्शन नाहीं. एवढी अवकृपा कां? राष्ट्रदीप मासिक-पुस्तकांत माझ्या कविता प्रसिद्ध झाल्यापासून मला कवयित्रीचा मान मिळाला आहे आणि आतां दुसरे संपादक कविता लिहून पाठवाव्या म्हणून माझी विनवणी करूं लागले आहेत. त्या कवितेतल्या सगळ्या कल्पना दिनकररावांकडून उसन्या घेतल्या आहेत, हे जर त्यांना समजलें तर—पण जाऊं द्या, मी त्या बाबतींत मौनच धरलें आहे. आपले बंधु दिवाकरपंत मुलांना फार चांगलें शिकवितात; पण त्या व्यतिरिक्त ते येथें क्षणभरहि थांबत नाहींत. माझ्याशीं तर ते एक शब्दहि बोलत नाहींत. तुमच्या बोलण्यांत जी मधुरता, जें स्वारस्य आणि जिवाला चटका लागण्याची जी खुबी आहे, ती त्यांच्या बोलण्यांत नाहीं. तुमच्या याच गुणामुळें मला अगदीं चुकल्या चुकल्यासारखें होतें. सवडीत सवड करून एकदां या. तुमच्याशीं मला पुष्कळ बोलावयाचें आहे. अधिकोत्तराबद्दल क्षमा असावी, ही विनंति.

मालती.

पत्रांतला हा गोड—अगदीं गोड—मजकूर वाचून दिनकरची वृत्ति पुन्हां बावरल्यासारखी झाली. यापुढें कशा रीतीनें वागावें याचा विचार न करतां हा वेळपर्यंत मालतीशीं अढी धरल्याबद्दल त्याला अनुताप वाटूं लागला. मुकुंदशीं तिचें जें वर्तन दिसून आलें, त्याचा आपण अगदींच निराळा अर्थ केला होता; पण त्यांत तिचा बिलकुल वाईट हेतु नव्हता, अशी आतां दिनकरची समजूत झाली आणि तो पुन्हां मालतीच्या भेटीला गेला. त्या वेळीं ब्यारिस्टर मुकुंद कांहीं कामासाठीं बाहेर गांवीं गेल्यामुळें त्या सात आठ दिवसांत मालतीच्या आणि दिनकरच्या पुन्हां पूर्वींसारख्या येथेच्छ गप्पागोष्टी झाल्या. मालतीच्या आग्रहावरून एकदां तो तिच्या बरोबर नाटकालाहि गेला. तसेंच परभारें शेटजींच्या मोटारींतून मालतीला चार दोन वेळां हिंडावयास नेण्यासहि दिनकरनें कमी केलें नाहीं. हळू हळू दिनकरच्या मनांतलें सगळें किल्मिष निघून जाऊन त्यानें मालतीला पुन्हां हृदयसिंहासनावर जागा दिली. परंतु त्यानंतर लवकरच मुकुंदची स्वारी

आली आणि पूर्वीप्रमाणे आतांहि मालतीचे दिनकरकडे दुर्लक्ष होऊं लागलें. मालतीचा आणि मुकुंदचा विनोद पूर्वीप्रमाणे सुरू झाल्यावर दिनकरचें मन पुन्हां अस्वस्थ झाले आणि त्यानें मालतीकडे जाण्याचे बंद केलें. दिनकरचा हा निश्चयहि फारच थोडे दिवस टिकला. पूर्वीप्रमाणें मालतीचे गोड मजकुराचे पत्र येताच सर्व विसरून जाऊन दिनकर पुन्हां मालतीच्या घरीं जाऊन दाखल झाला. अशा रीतीने दिनकरने चार पांच वेळां आशा निराशेच्या थपडा खाल्ल्यावर त्याने योग्य बोध घेऊन सावधगिरीने वागावयास पाहिजे होते; परंतु तसे न होतां त्याची मनस्थिति अधिकच घोटाळयाची झाली. मुकुंदविषयीं त्याच्या मनांत विलक्षण मत्सर उत्पन्न झाला, आणि मालतीविषयीं त्याच्या मनांत एक प्रकारची सहानुभूति उत्पन्न झाली. मुकुंद वाईट मनुष्य असून मालतीला तो फसवीत आहे, तेव्हां त्याच्यापासून मालतीचे संरक्षण केलें पाहिजे, असा निराळाच विचार दिनकरच्या मनांत उत्पन्न झाला. या विचाराने पुढे संकल्पाचें स्वरूप धारण केले आणि त्यामुळेच दिनकरच्या सगळ्या आयुष्याचा रंग पालटला.

आतां मुकुंदच्या पुर्वेतिहासाकडे दिनकरचें लक्ष गेलें. मुकुंदचे सगळे चरित्र मिळवावयाचे आणि ते मालतीपुढे ठेवून तिच्या मनातील मुकुंदविषयींचा आदर नाहींसा करावयाचा, असा बेत योजून दिनकर त्या उद्योगाला लागला. हळू हळू मुकुंदची बरीच माहिती दिनकरला मिळाली आणि त्यावरून मुकुंद हा एक छाकटा तरुण आहे. अशी त्याची खात्री झाली. आतां तर मालतीच्या संरक्षणाचा भार जणूं ईश्वरानेंच आपणावर सोंपविला, असें दिनकरला वाटूं लागले. यानंतर मुकुंदविषयीं माहिती गोळा करीत असतां दिनकरला एक अगदींच चमत्कारिक हकीकत समजली. इंग्लंडांत असतां एका हलकट युरोपियन मुलीबरोबर मुकुंदने सलगीनें वागण्याचा प्रयत्न केला. पुढे त्या मुलीनें कायद्याची मदत घेऊन मुकुंदला विवाहित पति ह्मणून ठरविले आणि आपली स्वतःची अन्नवस्त्राची व्यवस्था तिनें लावून घेतली. या संबंधांत मुकुंदच्या वडील भावानें सुमारें पंधरावीस हजार रुपये खर्चून मुकुंदची कशीबशी सुटका करून

घेतली होती. दिनकरलाहि या व शिवाय अन्य कांहीं चमत्कारिक गोष्टी समजल्या खऱ्या; पण ही माहिती इतकी अपुरी होती की, ती पुराव्यावांचून मालतीपुढे ठेवण्यास त्याचें मन मागें पुढें घेऊं लागलें. याच संधीस मालतीसंबंधानेंहि कांहीं माहिती दिनकरला समजली. बी. ए. झाल्यावांचून तिचें लग्न करावयाचें नाहीं, विलायतेहून परत आलेल्या सुशिक्षित गृहस्थाबरोबर तिचा विवाह करावयाचा आणि या दांपत्यास पांचहजार रुपये हुंड्याच्या स्वरूपानें द्यावयाचे, असा वामनरावांचा विचार होता. साधल्यास शेटजींच्या बरोबर विलायतेस जावयाचें, असा इतके दिवस दिनकरचा विचार होता; परंतु विलायतेहून परत आलेल्या गृहस्थाबरोबर मालती विवाह करणार आहे, हें समजल्याबरोबर दिनकरला विलायतेस जाण्याची अनिवार इच्छा होऊं लागली. आपलें जर विलायतेस जाणें झालें, तर मुकुंदच्या चारित्र्याची खरी हकीकत सरकारी सहीशिक्यानिशी मिळेल, हाहि विचार दिनकरच्या मनांत साहजिक उद्भवला. विलायतेस गेल्याबरोबर ही सर्व माहिती मालतीकडे पाठवून दिली, म्हणजे आपलें सगळें काम होईल, या आशेमुळें विलायतेस जाण्याचे विचार दिनकरच्या मनांत पक्के होऊं लागले. पण दिनकर, घरीं तुझी गृहदेवता आहे, हें तुझ्या लक्षांत आहे ना?

शेटजींचा विलायतेस जाण्याचा विचार होताच. त्यांत आणखी एका गोष्टीची भर पडून दिनकरला विलायतेस जाण्याला अधिकच मदत झाली. एका संस्थानिकानें तत्त्वज्ञानाच्या अभ्यासासाठीं तीन वर्षे एका विद्यार्थ्यास विलायतेस पाठविण्याचें ठरवून त्यासाठी उमेदवारांना सहा महिन्याची मुदत देऊन कच्च्यापरीक्षेसाठीं स्वतःच्या संस्थानांत बोलाविलें. एकंदर अकरा विद्यार्थ्यांनीं या परीक्षेसाठीं अर्ज केले होते. दिनकरहि अशीच एकादी संधि शोधीत असल्यामुळें त्यानेंहि अर्ज केला आणि तत्त्वज्ञानाचा तो अभ्यास करूं लागला. वामनरावांनीहि या बाबतींत त्याला चांगला उत्साह दिला होता. याच वेळीं दिवाकरची प्रकृति थोडी बिघडल्यामुळें त्या सात आठ दिवसांत मुलांना शिकविण्यासाठीं दिनकरला वामनरावांच्या घरीं जावें लागलें. तेथें मालतीची गांठ घ्यावयाची नाहीं आणि पडली

तरी भाषण करावयाचें नाहीं, अशा निश्चयानें दिनकर तेथें जात होता व त्याप्रमाणे चार पांच दिवस त्या क्रमानें त्याचे गेलेहि; परंतु दिनकरची ही मूकवृत्ति मालतीला सहन झाली नाहीं. मुलांना शिकवून दिनकर घरीं जाण्यास निघाला असतां मालतीनें मुद्दामच त्याची गांठ घेतली. ती हंसत हंसत म्हणाली, " स्टेट स्कॉलरशिप मिळाल्यावर आपण विलायतेस जाणार ना ? नाहीतर तुमचे जुन्यामताचे मित्र वेळेवर आडवे यावयाचे ? "

दिनकरचें मन पुन्हां विरघळलें. तो ह्मणाला, " माझी मित्रमंडळी अशी अनुदार मताची नाहीं. पूर्वी मला स्वतःलाच विलायतेस जाण्याची इच्छा नव्हती; परंतु आतां दोन कारणासाठीं मी तिकडे जाण्याचें मुद्दाम ठरविलें आहे. "

स्मित करून मालती म्हणाली, " अशीं कोणतीं दोन कारणें तीं ? "

मालतीकडे खोचदार दृष्टीनें पाहून दिनकर ह्मणाला, " ज्ञानविज्ञान विभूषिता सरस्वती देवीचें प्रत्यक्ष दर्शन घेऊन पावन व्हावें. ही एक इच्छा आणि— "

" आणि म्हणून थांबलांत कां ? दुसरी कोणती इच्छा ? "

" कांहीं विलायतेस जाऊन आलेले तरुण इकडे आल्यावर जो थापे-बाजीचा धंदा करीत असतात, त्यांत कितपत तथ्य आहे, हेंहि पाहण्याची माझी इच्छा आहे. "

असें म्हणून आपल्या शब्दाचा काय परिणाम झाला, हे पाहण्यासाठीं दिनकरनें आपली दृष्टि मालतीच्या मुखावर वळविली. हे शब्द मुकुंदच्या सबधानेंच वापरले आहेत, हें लक्षांत येऊन मालतीचा चेहरा थोडा लाल झाल्यासारखा दिसला. दिनकर पुढे तेथें थांबलाच नाहीं. तो चटकन् घरीं निघून गेला. याचा परिणाम मालतीवर मात्र निराळाच झाला. तीन चार दिवस ती दिनकरशीं कांहीं बोललीच नाहीं. पुढे दिवाकर शिकविण्यास जाऊं लागल्यामुळें पधरा वीस दिवसांत तिची आणि दिनकरची गांठहि पडली नाहीं. शेवटीं मालतीनें पुन्हां आपलें ते लेखणीचें हत्यार उचललें आणि पूर्वीसारखेंच गोड मजकुराचें पत्र दिनकरला लिहिलें. या पत्रानें दिनकरचें हृदयक्षत थोडें थोडें भरून येऊं लागलें. मालतीच्या आणि

त्याच्या पुन्हां पूर्वींसारख्या भेटी परत भेटी होऊं लागल्या. आणखी थोड्याच दिवसांनी दिनकरची तत्त्वज्ञानाची परीक्षा झाली. ही परीक्षा झाल्यानतर उन्हाळ्यांत दिनकरचे शेटजी महाबळेश्वरीं निघून गेले आणि दिनकर दिवाकराला बरोबर घेऊन थोडे दिवस रामपुराला राहण्यासाठी आला. जाते वेळी मालतीची गांठ घेऊन जावें अशा विचारानें तो तिच्याकडे गेला होता; परंतु ती मुकुंदबरोबर कार्ल्यांची लेणीं पहावयास गेली आहे, हा निराशेचा निरोप ऐकून त्या बिचाऱ्याला मुंबई सोडावी लागली होती.

दिनकर रामपुराला येण्याच्या आधींच त्याचा विलायतेस जाण्याचा बेत घरांत सगळ्यांना समजला होता आणि त्यामुळें घरांतील बायकांना साह-जिक वाईट वाटत होतें. घरीं गेल्यावर आपणास पुष्कळ बरें वाटेल, असें दिनकरला वाटत होतें; परंतु मुकुंदबरोबर मालती कार्ल्याला गेली आहे, हें ऐकून त्याच्या मुखावर उद्विग्नता पसरली होती, ती अद्यापीहि कायम होती. तो ज्या दिवशीं रामपुराला पोहोंचला होता, त्याच दिवशीं त्याच्या वडील बहिणीनें—यमुनेनें—त्याला पहिला प्रश्न हाच केला. ती ह्मणाली, " दिनकर, पूर्वी घरीं आलास म्हणजे तुझा चेहरा किती तरी आनंदी दिसत असे; पण या वेळीं तसा कांहीं दिसत नाहीं. एवढी कसली काळजी तुझ्या मागें लागली आहे ? "

दिनकर हसत हसत ह्मणाला, " यमुताई, ही तुझी कल्पना. दुसरें काय ? इंग्लंडांत शेक्सपीयर या नांवाचा एक कवी होऊन गेला, तो ह्मणतो कवी आणि वेड या दोघाना कल्पनासृष्टीशिवाय दुसरें काहींच दिसत नाहीं. "

यमुताई ह्मणाली, " दिनकर, हीं तुझीं विद्वत्तेचीं भाषणें आह्मां खेड्यापाड्यांतल्या लोकांना मुळींच समजावयाचीं नाहींतरे बाबा ! येथें कांहीं मालतीसारख्या विद्वान् मुली नाहीत. "

दिनकर मुद्दामच ह्मणाला. " मालती ? ती कोण ? "

" आहाहा ! जसें कांहीं माहीतच नाहीं. अरे, ती तुझी शिष्यीण ! जिला तू मुंबईस शिकवीत असतोस ती ! "

" छेः ! ती आतां माझी शिष्यीण नाहीं. ती स्वतःच आतां दुस-

त्यांना शिकवील इतकी हुशार झाली आहे, आणि तिच्या येथें आतां मी शिकवायला जात नाहीं. दिवाकर जात असतो."

"आणि तू अगदीं त्या रस्त्याला देखील जात नाहींस ना? आणि पत्रव्यवहार तर अगदींच बंद असेल?"

दिनकर त्रासल्यासारखें करून ह्मणाला, "यमूताई, कसल्या या चमत्कारिक गोष्टी काढल्यास?"

"या चमत्कारिक गोष्टीना? तर मग याहून गोड गोष्टी रात्रीं ऐकावयाला मिळतील हो! पण हें लक्षांत ठेव मात्र कीं, आज तुह्माला अनेक गोष्टींचे जबाब द्यावे लागतील. आतांपासूनच प्रत्युत्तरांची तयारी करून ठेवा."

"प्रश्नांची याद तुह्मींच करून दिली असेल?"

यमुना कांहीं बोलली नाहीं. ती तशीच घरांत निघून गेली. रात्रीचीं जेवणें झाल्यावर ओसरीवरच्या दिव्याजवळ एक पुस्तक वाचीत दिनकर बसला. दहा वाजून अकरा वाजण्याची वेळ आली, तरी दिनकरचें वाचन चाललेंच होतें. घरांतलीं बहुतेक मंडळी आपापलीं कामें आटोपून निजण्याच्या उद्योगास लागली होती. इतक्यांत उमा बाहेर आली आणि ह्मणाली, "भावोजी, हे काय? अकरा वाजून गेले तरी निजावयाची वेळ नाहीं झाली का? पूर्वीं घरीं आलां म्हणजे दिवे लागले न लागले तोंच तुमच्या डोळ्यांवर झोंप येत होती!"

पुस्तक खालीं ठेवून दिनकर तसाच उठला आणि ह्मणाला, "वैनी, रात्र इतकी झाली असेल, हे माझ्या लक्षांतच आले नाहीं. पुस्तक मोठें गमतीचें आहे. वाचूं लागले म्हणजे आनंद होतो."

"आणि हा आनंद मनुष्याजवळ दोन हितगुजाच्या गोष्टी बोलत बसल्यानें होत नाहीं ना?"

"हो. कां होणार नाहीं? पण तसें मनुष्य असेल तर?"

"मालतीसारखें. नाहीं?"

"वैनी, तूंहि त्या यमूचाच कित्ता उचललास."

"तें असो. तुह्मी अगोदर निजावयाला जा पाहूं."

दिनकर तसाच निजावयाच्या खोलींत गेला. तो येण्याच्या आधींच

लक्ष्मी येऊन पलंगावर निजली होती. पूर्वी तो घरीं आला म्हणजे संध्याकाळचें जेवण होण्याबरोबर खोलींत जाऊन लक्ष्मीची वाट पहात बसलेला असे; परंतु आतां दिनकरचें चित्त इतकें नीरस झालें होतें कीं, त्याला बरीच रात्र झाली आहे, ही आठवण दुसऱ्यानें करून द्यावी लागली. हळू हळू ती उन्हाळ्याची सुटी दिनकरनें अगदी उदासीनतेनेंच घालविली. आपल्या पतीचें मन नेहमी सुप्रसन्न असावें, अशा इच्छेनें लक्ष्मी आपल्या शक्तीप्रमाणें व समजुतीप्रमाणें खटपट करीत होती; परंतु तिच्या प्रयत्नास यश आलें नाहीं. पतीचें मन सुप्रसन्न राहण्यास स्त्रीच्या अंगीं जे गुण असावयास पाहिजेत, ते गुण आपल्या अंगीं नाहींत, असें वाटून लक्ष्मी अत्यंत निराश झाली. त्यांत आणखी पतीची स्वारी लवकरच विलायतेस जाणार आहे, हें ऐकून तर तिच्या काळजानें ठाव सोडला होता. इकडे दिनकरचें मनहि हळू हळू निष्टुर होऊं लागलें. त्यांतच आणखी ईर्षेची भर पडली. इकडे आल्यावर मालतीकडून एकादें तरी पत्र येईल अशी त्याला फार आशा होती; परंतु तिच्याकडून एकहि पत्र न आल्यामुळें त्याला मोठें चमत्कारिक वाटूं लागलें. शेवटीं दिनकरनेंच मालतीला एक पत्र लिहिलें. त्यांतला सारांश असाः—" मुंबईहून येतांना आपल्या भेटीसाठीं आलों होतों; पण आपण कार्ल्यास जाणें झाल्यामुळें भेट झाली नाहीं. परीक्षेचा निकाल या चारदोन दिवसांत लागणार आहे, तेव्हां तिकडे लक्ष ठेवून निकाल मला कळवाल, तर फार उपकार होतील."

सुमारें सात आठ दिवसांनीं मालतीकडून या पत्राचें दिनकरला उत्तर आलें, तें असें, " तत्त्वज्ञानाच्या परीक्षेत एकंदर तीन विद्यार्थी पास झाले. पहिला नंबर आपलाच येऊन स्टेट स्कॉलरशिप आपणासच मिळाली आहे. आतां विलायतेस जाण्यास कोणतीच हरकत दिसत नाहीं. आमची कार्ल्याची सफर फारच आनंददायक झाली. प्राचीन कलाकौशल्य समजावून सांगण्यांतहि ब्यारिस्टर मुकुंद फार हुषार आहेत. त्यांनीं लेण्यासंबंधानें मला इतकी नवी नवी माहिती सांगितली कीं, त्यामुळें त्यांच्या अगाध ज्ञानाचें मला मोठें कौतुक वाटलें, वगैरे." मुकुंदबद्दल दिनकरच्या मनांत मत्सर तर उत्पन्न झालाच होता; पण मालतीच्या या पत्रानें दिन-

करचा मत्सर द्विगुणित वाढला. तो चरित्रहीन तरुण मालतीला भुलवीत आहे आणि मालतीहि त्याच्या थापांवर विश्वास ठेवून फसत आहे, हें पाहून दिनकरनें मालतीला एक सावधगिरी बाळगण्याबदलचें पत्र लिहिलें. " पत्रोत्तर मिळालें. पाहून फारच आनंद झाला. कारण उत्तर येईल अशी आशा नव्हती. आपण काव्यांचीं लेणीं अगदीं नव्या दृष्टीनीं पाहिलीं हे फार चांगलें केलें; पण ब्यारिस्टर साहेबांवर इतका विश्वास टाकणें चांगलें नव्हे, अशी मी आपणास वेळेवरच सूचना देत आहे. याचा आपण विपरीत अर्थ करूं नये ही विनंति." अशा अर्थाचा मजकूर दिनकरनें त्या पत्रांत लिहिला होता. आपल्या या पत्राचा मालतीवर फार चांगला परिणाम होईल, अशी दिनकरला मोठी आशा होती; परंतु परिणाम अगदींच निराळा झाला. या पत्राचें मालतीकडून अगदीं निराळेंच उत्तर आलें. " एका भल्यागृहस्थासंबधानें आपण अशा प्रकारचे उद्गार काढाल अशी मला कल्पना नव्हती. त्यांची आपण पुढील पत्रांत क्षमा मागाल असा मला भरंसा आहे. त्यांची क्षमा मागितल्यावांचून आपल्या कोणत्याहि पत्राचें मजकडून उत्तर मिळणार नाहीं."

झालें! हा पत्रव्यवहार येथेंच थांबला. ज्याच्यावर मनुष्यत्वाचा नुसता आळ आला होता अशा मुकुंदची क्षमा मागण्याविषयीं मालतीनें लिहिलेलें पाहून दिनकरला विलक्षण राग आला. आतां मुंबईला जावें आणि त्यानें विलायतेस कशीं अनन्वित कृत्यें केलीं, याचा पाढा मालतीपुढें वाचावा, असें दिन-करला वाटूं लागलें; पण याबद्दलचा प्रत्यक्ष असा पुरावा त्याच्याजवळ नसल्यामुळें तसें करणेंहि त्याला धोक्याचें वाटूं लागलें. परंतु इतक्यावरच हें प्रकरण सोडावयाचें नाहीं, असा मात्र दिनकरनें पक्का निश्चय केला. विलायतेस जाऊन आलेले तरुण इकडे जो थापेबाजीचा धंदा करतात त्यांतलें रहस्य शोधण्यासाठीं आपण विलायतेस जाणार आहों, असें तो एकदां मालतीजवळ सहज म्हणाला होता. त्याची दिनकरला या वेळीं आठवण झाली व तत्त्वज्ञानाच्या अभ्यासाशिवाय या कारणासाठींहि त्यानें विलायतेस जाण्याचें निश्चित केलें. इतके दिवस तो विलायतेस जाईल किंवा नाहीं, याची अनेकांना शंका होती. स्वतः दिनकरचें मन देखील

डळमळतच होतें; परंतु आतां मालतीपुढें पुराव्यानिशीं मुकुंदचें चरित्र ठेवावयाचें अशीच जेव्हां वेळ आली, तेव्हां दिनकरनें विलायतेस जाण्याचा आपला निश्चय कायम केला. त्याच्या सर्व आप्तेष्टांनाहि तो आतां विलायतेस गेल्यावांचून रहात नाहीं, हें कळून चुकलें. भास्कर व दिवाकर याना आपला बंधु इंग्लंडास जात आहे, याबद्दल थोडा अभिमानच वाटला, पण यशोदा व लक्ष्मी या दोघींना मात्र काळजी उत्पन्न होऊन त्याना फार वाईटहि वाटूं लागलें. कशावरून असेल तें असो; पण हें विलायतेस जाणें केवळ मालतीसाठीं आहे, अशी लक्ष्मीची समजूत झाली होती. उद्यां दिनकर मुंबईस जाण्यासाठीं निघणार आणि तेथून मग विलायतेस जाणार, असें जेव्हां नक्की ठरलें, तेव्हां त्या दिवशीं रात्रीं दिनकरला यांतलें रहस्य विचारावयाचें असें लक्ष्मीनेंहि नक्की ठरविलें. पतीला अशा बाबतींत विचारणें, यांत मोठेसें कठिण काय, असें पुष्कळांना वाटेल; परंतु लक्ष्मीला तें एक साहसच वाटलें. रात्रीं दिनकर जेव्हां खोलींत येऊन पलंगावर बसला, तेव्हां लक्ष्मीचें हृदय कळवळून येऊन तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. दिनकरलाहि या वेळीं राहवेना. त्याचेंहि डोळे भरून आले. लक्ष्मीला जवळ घेऊन तो म्हणाला, " हें काय असें वेड्यासारखें ! "

स्फुदत स्फुदत लक्ष्मी म्हणाली, " मी वेडी नसतें, तर इकडे कशाला विलायतेस जाण्याचा विचार सुचला असता ? तुम्हाला आपल्याजवळ ठेवून घ्यावें असे माझ्या अगीं कोणतेच गुण नाहींत. तुम्हांलाच माझी कांहीं दया येऊन राहिलां तर राहिलां. तुम्हींच पायानें ढकलून दिल्यावर मी कशाच्या आधारावर दिवस कंठावयाचे ? "

तिला कुरवाळून दिनकर म्हणाला, " इतके दिवस गेले, तशींच आणखी तीन वर्षें घालवावयाचीं. तीन वर्षें म्हणजे काही फार नाहीत. आता बोलबोलतां जातील. त्या विलायतची तुला एवढी भीति कां वाटते ? तेथें काहीं राक्षस नाहींत. आपल्याचसारखीं माणसें आहेत. अलीकडे तर किती तरी विद्यार्थी विलायतेला जातात नी येतात. "

अश्रु पुशीत पुशीत लक्ष्मी म्हणाली, " तुमचें विलायतेस जाणें या इतर विद्यार्थ्यांसारखेंच असतें, तर मला एवढें वाईट वाटलें नसतें; पण

माझ्यापासून तुम्हांला सुख मिळालें नाहीं, म्हणून तुम्हीं विलायतेस जात आहां, यामुळे फार वाईट वाटतें. आतांच आपण माझा एवढा तिरस्कार करतां. विलायतेहून आल्यावर तर मी अधिक तिरस्काराला पात्र होईन."

लक्ष्मीचे हे शब्द ऐकून दिनकरचें चित्त साहजिक थरारलें. सात कुलुपांत ठेवलेल्या रहस्याचा भेद झाल्याप्रमाणें त्याला वाटून त्याचा चेहराहि किंचित् उद्विग्न झाला. तो म्हणाला, "तुम्हां सगळ्यांच्याच डोक्यांत हें काय वेड शिरलें आहे, कोणास माहीत ! मी त्या मालतीसाठीं विलायतेस जात आहें, ही अगदीं खोटी गोष्ट. तिच्याबरोबर विवाह करण्याची माझी इच्छा नाहीं आणि इच्छा असली, तरी तिचा माझा विवाह होणें शक्य नाहीं."

लक्ष्मी हळूच म्हणाली, "कां ?"

"तिचे वडील सुधारक असून फार समंजस गृहस्थ आहेत. एक बायको जिवंत असतां दुसरी करण्याची सुधारक परवानगी देत नाहींत. तेव्हां मालतीचा आणि माझा विवाह होणें शक्य आहे कीं अशक्य आहे, याचा तूंच विचार करून पहा."

दिनकरच्या या भाषणानें लक्ष्मी कांहींशीं प्रसन्न झाल्यासारखी दिसली. ती थोडा वेळ कांहींच बोलली नाहीं, नंतर म्हणाली, "तर विलायतेस जाण्याला मी तुम्हांला आनंदानें निरोप देतें. तुमच्या सुखाचा एक मार्ग माझ्या हातीं आहे, हें मला आज समजलें. परमेश्वर करो आणि त्या मालतीच्या सहवासानें तरी तुम्हांला सुख मिळो !"

लक्ष्मीचे हे शब्द ऐकून दिनकरच्या हृदयावर विलक्षण आघात झाला. लक्ष्मीची योग्य शब्दांनीं समजूत घालावी असें त्याला फार वाटूं लागलें; परंतु काय बोलावें हें त्याला सुचेना. या वेळीं पांडित्याची आवश्यकता नव्हती, तर अंतःकरणांतल्या खऱ्या प्रेमाच्या चारच शब्दांची आवश्यकता होती. दिनकरनें आपलें हृदयकपाट पुष्कळ धुंडाळलें; पण त्याला ते चार शब्द कांहीं सांपडले नाहींत. बराच वेळ तो मौन स्वीकारून बसला होता. नंतर त्यानें उद्वेगाचा एक उसासा टाकला आणि आंथरुणावर तो स्वस्थ पडून राहिला. लक्ष्मीहि यानंतर कांहीं बोलली नाहीं. तीहि निजली या-

पैकीं निद्रादेवीच्या अंकावर कोण लोळत होतें आणि स्वप्नसृष्टींत कोण वावरत होतें, तें ज्याचें त्याला माहीत.

दुसऱ्या दिवशीं सगळ्यांचा निरोप घेऊन दिनकर मुंबईस निघून गेला. तेथें विलायतेस जाण्याची तयारी करण्यासाठीं तो चार आठ दिवस होता; पण त्या अवधीत त्यानें मालतीची गांठ घेण्याचा मुळींच प्रयत्न केला नाहीं. दिनकर विलायतेस जात आहे, हें पाहून त्याच्या शेटजींनीहि याच वेळीं विलायतेस जाण्याचें ठरविलें. दोघांची तयारी होतांच शेटजीसह दिनकर ' मदिना ' नांवाच्या मेलबोटीनें विलायतेस निघून गेला.

## प्रकरण तेरावें.



वामनरावांच्या बंगल्यांतल्या मुख्य दिवाणखान्यांत मिसेस कमळाबाई व मिस मालती या दोघी सचिंत बसलेल्या असून जवळच डॉ. निळकंठराविह दुर्मुखून बसले होते. मालतीचा चेहरा विशेष दुःखी दिसत असून तिचे डोळेहि पाण्यानें भरून आलेले दिसत होते. या तिघांत थोडा वेळ अगदीं निस्तब्ध अशा स्थितींत गेल्यावर कमळाबाई एक लांब उसासा टाकून ह्मणाल्या, " माले, त्यांना जाऊन एक महिना झाला. हा महिन्याचा हिशोब पाहून माझ्या तर पोटांत धडकी भरली आहे. पुढें कसें चालणार ते परमेश्वराला माहीत. तुझें ठीक आहे, तूं उद्यां लग्न झालें म्हणजे नवऱ्याकडे जाऊन राहशील; पण माझ्या पोरांचा अजून विद्याभ्यास व्हावयाचा आहे. "

असें ह्मणून कमळाबाई स्तब्ध राहिल्या. कमळाबाईनें मालतीपुढें ही जी प्रस्तावना केली, त्याचें उत्तर मिळण्यापूर्वी थोडीशी हकीकत वाचकांना कळविली पाहिजे. दिनकर विलायतेस निघून गेल्यावर सहा महिन्यांनीं वामनराव अजारी पडले आणि वरील डॉ० निळकंठराव यांची औषधयोजना झाल्यावर दहाबारा दिवसांच्या अवधींत वामनरावांनीं इहलोकचा निरोप घेतला. वामनरावांच्या पश्चात मालतीचा कांटा कमळाबाईला

विशेष सलूं लागला. सल्ला मसलतीला पुष्कळ दिवसांच्या परिचयाचे डॉक्तर असल्यामुळें या बाबतींत तिला मोठासा विचार करावा लागला नाहीं. बोलून चालून सवतीची मुलगी आणि त्यांतहि ती आजपर्यंत मनाविरुद्ध वागत आलेली; तेव्हां तिला दूर करणें हें कमळाबाईला व डॉक्तरला आपले पहिलें कर्तव्य वाटावें यांत कांहीं नवल नाहीं. लोकलज्जेस्तव दोघांनीं एक महिना दम काढला, हेंच त्यांचें मोठें औदार्य. कमळाबाईनें आतां केलेली प्रस्तावना आणि घरांत या महिन्यांत झालेल्या कुरबुरी यामुळें मालतीच्या डोळ्यापुढें पुढील भेसूर चित्र उभें राहून ती भयाकुल झाली. वामनरावांनीं या पूर्वीच जर आपले लग्न करून दिलें असतें, तर फार बरें झालें असतें, असें तिला वाटूं लागले; पण आतां तसें वाटून उपयोग काय? मी बी. ए. झाल्यावर लग्न करणार आणि तेंहि स्वतःच्या मतानें करणार, असे जे मालतीनें ठरविलें होते, त्याबद्दल तिला आतां कांहींसा अनुताप होऊं लागला. मालती स्तब्ध उभी आहे, असे पाहून डॉक्तर गंभीरतेने म्हणाले, " मालतीबाई, असे स्तब्ध राहून कसें चालेल. तुह्मी सुशिक्षित आहां. कमळाबाईपेक्षांहि तुह्मी समजूतदार आहां; तेव्हां तुह्मीच आतां कांहीं तरी तोड काढली पाहिजे. "

असें ह्मणून डॉक्तर मालती काय म्हणते, याची वाट पाहूं लागले. मालती अजूनपर्यंत स्तब्धच; उभी होती. डॉक्तर पुन्हा ह्मणाले, " मालतीबाई, कमळाबाईची काय इच्छा आहे, ते आतां तुह्माला कळवितों. दोन्ही मुलांना घेऊन एकाद्या चाळींतल्या खोलींत जाऊन रहावयाचें आणि हा बंगला भाड्यानें द्यावयाचा, असें त्यांनी ठरविले आहे. या बंगल्याला भाडेकरीहि मिळाला आहे. परवांपासून तो रहावयाला येणार असून त्यानें साठ रुपये भाडे देण्याचें कबूल केलें आहे. तेवढ्यांत कमळाबाईचा आणि दोघां मुलांचा कसा तरी निर्वाह होईल. तेव्हां तुह्मी आपली स्वतंत्र व्यवस्था पाहणें भाग झालें आहे. मला वाटतें तुह्मी कॉलेज क्वार्टर्समध्यें जाऊन रहावें हें बरें. ब्यांकेंत तुमच्या नांवानें कांहीं पैसे आहेतच. "

डॉक्तर आणि कमळाबाई हीं दोघेंहि किती क्षुद्र बुद्धीचीं आहेत, हें आतां मालतीच्या चांगलें लक्षांत आलें आणि त्यामुळें ती साहजिक उद्विग्न

होऊन त्या दोघांचा तिला रागहि आला. ती ह्मणाली, "तुह्माला जसें सोयीचें पडेल, तसें तुह्मी करा. माझ्या संबधानें तुह्मांला काळजी नको. परमेश्वर मला आतां जो मार्ग दाखवील तो मी पत्करीन."

डॉक्तर सहानुभूति दर्शवून म्हणाले, "परमेश्वरावर तुमचा एवढा विश्वास आहे, हे फार चांगलें. तुमचा सांभाळ करावयाला कमळाबाईंना कांहीं हरकत नव्हती, पण एक तर त्यांची पैशाची अडचण आणि दुसरें तुह्मी आतां जाणत्या झाल्यामुळें तुमच्या संगोपनाची आवश्यकताहि नाही. तुह्मांला आतां जे काय करावयाचे असेल, तें मात्र लवकर करा. कारण तीनचार दिवसांत या घरात भाडेकरी येणार आहे."

"होय. ते मला आतांच समजले आहे. मजवर असा प्रसंग येईल, अशी मला कल्पना नसल्यामुळे पुढील मार्ग शोधण्याचा मी विचारच केला नाहीं. आतां पुढें काय करावयाचे, तें मी एकदोन दिवसांतच ठरविते."

"त्यांत एवढी काळजी करण्यासारखें काय आहे? तुह्मी एकादी स्वतंत्र जागा पाहून तींत रहा आणि स्वतःच्या विवाहाच्या उद्योगाला लागा. आपणा सुधारकांतले अनेक तरुण विवाहास योग्य असे आहेत."

मालती किंचित् रागानें ह्मणाली, "ती सल्ला आपण मला द्यावयाला नको. पुढें काय करावयाचे, ते माझे मीच ठरवीन."

डॉक्तर म्हणाले, "तुह्मी अशा रागावतां कां? मीं कांहीं तुह्मांला वाईट सल्ला दिली नाहीं. तुमच्या वडिलांचा एक मित्र या नात्यानें मला जें सांगणें इष्ट वाटले तें मीं तुह्माला सांगितलें." असें ह्मणून डॉक्तर तेथून निघून गेले. कमळाबाईहि सचिंत बसल्या होत्या. आपल्या सावत्र आईला थोडी विनति करावी, असें मालतीच्या मनांत आलें; पण आईकडून काय जबाब मिळणार, हे मालतीला चांगलें माहित असल्यामुळे मालती तशीच तेथून निघाली आणि आपल्या खोलींत जाऊन अश्रु ढाळीत बसली. घर-दार सर्व कांहीं असून बापाच्या आकस्मिक मृत्युमुळें आज आपणांस बस-ण्यासाठीं सत्तेची अशी दोन हात जागाहि कोठें नाहीं, हें जेव्हां तिच्या लक्षांत आलें; तेव्हां आश्रयहीनतेचें भेसूर चित्र तिच्या डोळ्यापुढें दिसूं

लागलें आणि व्यवहारापासून अगदींच अलिप्त असलेली मालती त्यामुळें भयाकुल व शोकाकुल झाली. स्वतःच्या नांवावर ब्यांकेंत पैसे आहेत, हें तिला माहीत होतें; परंतु पैसा हें कांहीं खरें आश्रयस्थान नव्हे, हें तिच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. आपल्यासारख्या तरुण मुलीनें एकाकी राहणें, हेंच तिला मोठें कठिण वाटूं लागलें. या काळजीनें मालती किती त्रस्त झाली असेल, याची कल्पनाच केली पाहिजे. ती अशा दुःखांत असतां तिच्या सुदैवानें कीं दुर्दैवानें तें कोणास माहीत; पण तेथें एका-एकीं ब्यारिस्टर मुकुंद यांची स्वारी आली. मुकुंदला समोर पाहतांच मालतीला अधिकच रडें कोसळलें आणि इकडे मुकुंदनेंहि डोळ्याला हात रुमाल लावून स्वतःचें अंतःकरण कळवळून आल्याचें दाखविलें. तो शोकार्त स्वरानें ह्मणाला, " मालती, मी बाहेर गांवीं गेल्यामुळे मला तुझ्या-कडे इतके दिवस येतां आलें नाहीं; याबद्दल मला क्षमा कर! वामन-रावांची मृत्युवार्ता ऐकल्यापासून मला अगदी चैन पडेनासें झालें आहे. आह्मां सुधारक मंडळीचा एक मोठा आधारस्तंभ आणि मार्गदर्शक गेला. आह्मां त्रयस्तांना जर इतकें वाईट वाटतें, तर तुझ्यावर तर आकाशच कोसळलें आहे. पण याला कोणाचा उपाय आहे ? " असें ह्मणून मुकु-दनें आपला शोक प्रदर्शित केला. नंतर त्यानें एकवार मालतीकडे दृष्टि वळविली. मालतीचे अश्रू तिच्या गालांवरून पडतांना पाहून तो मनांत ह्मणाला, " या अश्रूंमुळें हिचें सौंदर्य किती तरी अधिक खुलतें." नंतर तो गंभीर स्वरानें सहानुभूतिपूर्वक ह्मणाला, " मालती, तूं सूज्ञ आहेस; तेव्हां असा शोक करणें बरें नव्हे. जगाकडे पाहून आपलें दुःख गिळलें पाहिजे."

मालती आर्त स्वरानें ह्मणाली, " मुकुंद, तुम्ही ह्मणतां ते सगळे खरे; पण माझ्या दुर्दशेची हकीकत तुह्माला जर समजली, तर रडण्याला हा नुकताच मीं कोठें आरंभ केला आहे, असें दिसून येईल. मला आतां प्रत्यहीं असेंच रडावयाचें आहे. रडण्यासाठींच मला देवानें जन्मास घातलें आहे ! "

" तूं हें काय म्हणतेस ? मला कांहींच समजलें नाहीं. मालती, सांग; सांग. तूं कोणत्या संकटांत आहेस, हें मला स्पष्टपणें सांग. मी वाटेल तो प्रयत्न करून तुझी ही दुर्दशा दूर करीन."

स्फुंदत स्फुंदत मालती ह्मणाली, " बाबांच्या मृत्यूमुळें मी नुसती पितृहीन झाले नाहीं, तर आश्रयहीनहि झालें आहे. घर वगैरे सर्व संपत्ति माझी सावत्र आई कमळाबाई यांच्या नांवानें आहे. त्यांनीं आजच मला हें घर सोडून जाण्यास सांगितलें आहे. अर्थात् माझी स्थिति भिकाऱ्यापेक्षांही शोचनीय झाली आहे."

मुकुंद ह्मणाला, " अरेरे ! कमळाबाईंच्या अतःकरणांत एवढी देखील दयामाया नाहीं ? "

" असेलहि कदाचित्; पण त्यांना सल्लामसलत देणारे ते डॉक्टर नीलकंठराव आहेत ना ? त्याच्या डोळ्यांत तर मी शल्यासारखी सलते."

मुकुंद थोडा वेळ स्तब्ध राहून नंतर सहानुभूतीनें गंभीर स्वरांत ह्मणाला, " मालती, एक गोष्ट तुझ्याजवळ बोलावी म्हणून पुष्कळ दिवस मनांत आहे, पण कांहीं कारणामुळें बोलण्याचें धैर्यच झालें नाहीं. माझ्याविषयीं तुझ्या मनात किती आदर आहे, हें मला अर्थातच सांगतां येणार नाहीं; पण तुझ्याविषयीं ह्मणशील, तर माझ्या मनांत पूर्ण आदर आहे. तुला ज्या दिवशीं प्रथम पाहिले, त्याच दिवशीं मीं तुला आपल्या अतःकरणांत उच्चस्थानीं जागा दिली आहे. मजविषयीं जर तुझ्या अंतःकरणांत थोडें फार प्रेम असेल, तर तुजबरोबर विवाह करावा, अशी माझी इच्छा आहे. तुझ्यासारख्या सद्गुणी स्त्रीचा लाभ झाल्यानें मला तर धन्यता वाटेलच; पण माझे वडील बंधु आणि त्यांची स्त्री यांनाहि आनंद झाल्यावांचून राहणार नाहीं. तुमची इच्छा असेल, तर तुमचें स्वतःचें असें जे काय सामान असेल, तें घ्या आणि आतांच माझ्याबरोबर चला. माझी गाडी दाराशींच उभी आहे."

मुकुंदचे हे गोड शब्द ऐकून आणि मुख्यतः मालती प्रसंगांत असल्यामुळे मुकुंद आपणास पदरांत घेत आहे, हें मालतीला त्याचे मोठे उपकार वाटले. ती एका सुधारकाची तरुण मुलगी असून मुकुंदच्या पूर्वींच ओळखीची झालेली होती खरी; तरी या विचारानें तिच्या चेहऱ्यावर लज्जेची अशी कांहीं चमत्कारिक छाया पसरली कीं, त्यामुळें ती मुकुंदला विशेष सुंदर दिसून आपल्या म्हणण्यास संमतीच दर्शवीत आहे, असें मुकुंदला

वाटलें. मालती इतकी धीट होती हें खरें; पण या वेळीं लज्जेनें तिला कांहीं बोलवले नाहीं. मुकुंदकडे चोरट्या नजरेनें पाहून ती किंचित् हंसली मात्र. झालें! हीच या विवाहाची मान्यता. यानतर दोघेहि थोडा वेळ स्तब्ध होतीं. मग मुकुंद ह्मणाला, "तुह्माला बरोबर काय काय घ्यावयाचें आहे?"

मालती कांहींच बोलली नाहीं; पण ती आंत गेली आणि आपलीं पुस्तकें व कपडे आणून तिनें दोन पेट्या भरून तयार केल्या. या कातड्याच्या पेट्या भरावयाच्या वेळेस तेथें कमळाबाई हजर होत्या, आणि त्यांनीं या बाबतींत मालतीला कांहीं हरकतहि केली नाहीं. मालतीनें कमळाबाईचा जेव्हां निरोप घेतला, तेव्हां तिला फार वाईट वाटलें. आपल्या बापाच्या घरांतून आपण आतां कायमचेंच बाहेर पडत आहों, हा विचार जेव्हां तिच्या मनांत आला, तेव्हां डोळे भरून येऊन तिनें मोठ्या कष्टानें मुकुंदच्या गाडींत पाय ठेवला. आणखी चार आठ दिवस गेल्यावर मालतीचा मुकुंदबरोबर मोठ्या थाटानें सुधारकांच्या पद्धतीप्रमाणें विवाह झाला आणि त्याच दिवसांपासून मुकुंद मालतीसह बधूपासून निराळा राहूं लागला.

आतां या पुढें न शिकतां सवरतां दांपत्यसुखाचा स्वाद यथेच्छ घ्यावयाचा या उद्देशानें मोठ्या आशेनें मालती आपला संसार थाटवीत होती. हाताखालीं गडीमाणसें असून शिवाय मधून मधून तिची वडील जाऊहि येऊन तिला संसाराची मांडणी करण्यास मदत करीत असे. मुकुंदची वागणुक पूर्ण साहेबी थाटाची असल्यामुळें मालतीनेंहि त्याच दृष्टीनें आपला संसार थाटला होता. आपले दिवस या पुढें अत्यंत सुखानें जातील, अशी मालतीला फार आशा होती; आणि सुखाचा शोध करीत असतां आपणास योग्य असा मार्ग सांपडला अशी तिची समजूत झाली होती; परंतु विवाह होऊन चार दोन महिने झाले नाहींत, तोंच तिची आशा हळू हळू ढांसळूं लागली आणि पुन्हां तिला निराशेचें भेसूर चित्र दिसूं लागलें. यांत मुकुंदचा कांहीं दोष होता असें नाहीं. तो तरी काय करणार? तो नवीनच ब्यारिस्टर झाल्यामुळें जुन्या ब्यारिस्टरांना मागें ढकलून पुढें येण्यासाठीं त्याला नानायुक्त्या योजाव्या लागत व त्यामुळें पुष्कळ ठिकाणीं त्याला जावें यावें लागे. सकाळीं उठल्यावर त्याला आफिसांत तर गेलें पाहिजे;

नाहीं गेलें तर कसें चालेल? दहा वाजतां जेवण होतें न होतें तों हायकोर्टांत जाण्याची घाई. काम असो वा नसो; पण रोज कोर्टांत तर जाऊन बसले पाहिजे? मुकुदचें हें म्हणणें मालतीला रास्त वाटे व ती बिचारी कशिदा किंवा लिहिणें अथवा पियानो वाजविण्यांत दुपारचा कसा तरी वेळ घालवी. पण हायकोर्टाचे दरवाजे बंद झाल्यावर तर मुकुदनें घरीं यावें कीं नाहीं? कोर्टांतलें काम-काज आटोपल्यावरहि पतीबरोबर दोन हितगुजाच्या गोष्टी सांगण्यास मिळू नयेत, याचें मालतीला फार वाईट वाटे. परंतु मुकुंद तरी काय करणार? त्याच्यासारख्या सुशिक्षिताचें लक्ष घरच्या संसारापेक्षां राष्ट्राच्या संसाराकडे असणें साहजिक होय. विलायतेहून परत आलेल्या गृहस्थांनीं राष्ट्रोन्नती-साठीं एक क्लब स्थापन केला होता. त्या क्लबांत हायकोर्टांतून निघाल्या-बरोबर दिनकरला जाणें भाग पडे. तेथें अनेक विषयांची चर्चा होतां होतां रात्रीचे अकरा सहज वाजत. येथलें राष्ट्रकार्य, समाजसेवा वगैरे संपल्यावर मग मात्र बारा एकाच्या सुमारास मुकुंद आपल्या घरीं परत येई. असेल! कदाचित् ही राष्ट्रकार्याची आणि समाजसेवेची सबबहि खरी असेल! पण पतीची स्वारी घरांत आल्यावर अशी झुलते कां? आणि त्यांच्या तोंडाला अशी आंबूस घाण कशाची येते? या गोष्टीचा विचार करतां करतां मालतीची छाती दुभंग होऊन जाई, आणि तिच्या डोळ्यांतून अश्रूंचा पूर वाहू लागे. मालती, तुला कांहीं आपल्या दैवासंबंधानें रड-ण्याचा अधिकार नाहीं. तू प्रौढ, समजूतदार, सुशिक्षित व पतीची निवड तूं स्वतः केलेली; तेव्हां मी अल्पवयाची असतां असें झालें, अथवा मी अज्ञान असल्यामुळें किंवा माझ्या आईबापांच्या चुकीमुळें मजवर ही आपत्ति आली, असें तुला मुळींच ह्मणतां येणार नाहीं. तुझें सुख ह्मणजे ऐश्वर्य लालसा! याच मार्गानें गेले असतां सुखाचा शोध लागेल, अशी तुझी समजूत होती; परंतु या बाह्य देखाव्याच्या पडद्याआड असलेलें रहस्य पाहून सुखाचा शोध करीत असतां कशी फसवणूक झाली, याचें तुझें तुलाच आश्चर्य वाटेल. पण मालती, पतीच्या तोंडाला जर आंबुस घाण आली, तर त्याचा एवढा विषाद वाटावयाला नको. तें एक पाश्चात्य

संस्कृतीचें अनुकरण आहे. मद्यपानांत एवढा दोष नाहीं. अतिरिक्त मद्य-पान करणें हें मात्र दोषास्पद समजतात; तेव्हां आली आंबूस घाण तर आली! वास येणार नाहीं, इतक्या लांबून पतीबरोबर हंसलें बोललें ह्मणजे झालें. हें कांहीं मनाचें खरें समाधान नव्हतें, तरी अशा स्थितीतहि समाधान मानून मालती चार आठ दिवस काढते न काढते, तोंच एके रात्रीं लाल डोळे करून मुकुंदची स्वारी डोलत डोलत घरांत शिरली. समोर मालतीला पाहून तो मोठ्यानें हसला. नंतर ' बाल ' नाचाप्रमाणें आपल्या तंगड्या उडवून " ड्यान्स माय मेरी, किस् मी स्वीट " हे वाक्य इंग्रजी गाण्याच्या पद्धतीनें वारवार ह्मणूं लागला. हा प्रकार पाहून मालतीची स्थिति वेड्यासारखी झाली. इकडे मुकुंद तर अगदीं तल्लीन झाला होता. तो मालतीजवळ जाऊन ह्मणाला, " Oh my love--my sweetest, dearest loveliest love my mary smith! Are you Miss smith? Kiss me-kiss me miss! " ही मिस मेरी स्मिथ कोठून आली आणि ही आहे काय भानगड? मालती तर या प्रकारानें विलक्षण उद्विग्न झाली. तिचे डोळे पाण्यानें भरून आले आणि ती लहान मुलीप्रमाणें रडूं लागली. पण असें रडून रडून रडणार तरी किती? तिनें शेवटीं धैर्य करून मुकुंदला धरलें आणि त्याला बिछान्यावर नेऊन निजविलें. मालतीहि न जेवतां तशीच निजून राहिली. मालती निजली खरी; पण तिची ती उद्विग्नता कांहीं केल्या दूर होईना. या विवाहानें आपण स्वर्गसुखापेक्षांहि रम्य अशा सुखाचा उपभोग घेऊं, अशी तिला फार आशा होती; पण या आशेवर विरजण पडून उलट सुखाऐवजीं दुःखानें मात्र तिची पाठ पुरविली. अशा वेळीं कोणाची तरी योग्य सल्ला मिळवावी असें कोणासहि साहजिक वाटतें. त्याप्रमाणें मालतीनें कांहीं मैत्रिणींना आपल्या घरीं चहासाठीं बोलावून आपली कहाणी त्यांना निवेदन केली. या आतां आपणास कांहीं तरी चांगली सल्ला देतील असें मालतीला वाटलें; पण आश्चर्य हें कीं, प्रत्येकीनें आपलीहि तशीच दुःखद कहाणी सांगून मालतीला नुसती सहानूभूति दर्शविली. एकीनें ह्मटलें, ' आमच्या येथेंहि असेंच आहे.' तर दुसरी ह्मणाली, ' हें तरी बरें; पण आमच्या येथें तर त्या नादांत मला

मारतात देखील.' तिसरी एकजण ह्मणाली, 'आमच्या इकडे मारीत कांहीं नाहींत; पण पंधरा पंधरा दिवसांत घरीं येत नाहींत. मध्येंतर त्या भामिनी बाईनाच बरोबर घेऊन माथेरानला गेले आणि शेंदोनशें रुपयांची नुसती राख केली.' बिचारी मालती हें सर्व मुकाट्यानें ऐकत होती. आमचा हिंदूसमाज अगदीं विस्कळित आहे, तेव्हां समाजांत कांहीं तरी सुधारणा केली पाहिजे, ह्मणून आह्मी सुधारक समाज व्यवस्थित करूं लागलों, तर आह्मी स्वतःच अव्यवस्थेच्या फेऱ्यांत पडलों, हा विचार मालतीच्या मनांत आल्यामुळें तिला फारच वाईट वाटलें. खावें, प्यावें आणि चार दिवस पशुप्रमाणें वागून चैन करावी, या सुधारकी विचारापासून मालती पुष्कळ दूर होती. समाजांत खरोखरच सुव्यवस्था व्हावी, अशी तिची इच्छा होती आणि ह्मणून पाश्चात्य संस्कृतीनें अलंकृत झालेल्या मुकुंदाच्या गळ्यांत तिनें वरमाळ घातली होती. आपणा उभयतांकडून समाजाची खरी सेवा व्हावी, अशी तिची फार इच्छा होती; परंतु पतीनें आपलें खरें स्वरूप जेव्हां प्रगट केलें, तेव्हां ती अर्थातच काळजीनें वेडी होऊन गेली. आलेल्या मैत्रिणींनींहि तिला निरुत्साहच केलें. इतकेंच नव्हें, तर एकीला धोरण न राहून ती ह्मणाली, "आणि त्या भामिनीबाईची ती मुलगी विमला, तिला घेऊन ब्यारिस्टर मुकुंद खुशाल रस्त्यानें देखील हिंडतात. आपल्या मंडळींतच यासंबधानें किती तरी टीका होते; पण तिला त्याची लाजच नाहीं."

आं! इतका वेळ मिस मेरी स्मिथच्या नांवानें मालती बोटें मोडीत होती, तों ही आणखी विमला मध्यें कोठून आली? बिचाऱ्या मालतीचा जीव अगदीं सुकून गेला. आलेल्या मैत्रिणींना चहा देऊन त्यांची कशी तरी तिनें रवानगी केली आणि ती पुन्हां अश्रु गाळीत बसली. या गोष्टीस चार आठ दिवस झाले नाहींत तोंच पतीची स्वारी मद्यपानानें विशेष रंगल्यामुळें त्या रात्रींहि पुन्हां तें मिस मेरीचें गाणें व नृत्य यांची आवृत्ति मुकुंदनें मालतीपुढें केली. मुकुंदच्या या अशा कृतीनें मालती संसारसुखासंबंधानें तर पूर्ण निराश झालीच; पण पुढें कशा रीतीनें वागावें हेंहि तिला न सुचून तिची अवस्था वेड्यासारखी झाली. आतां तिला दिनकर

मास्तरची आठवण झाली. त्यानें आपणास मुकुंदसंबंधानें पूर्वींच बजावलें होतें; परतु त्या वेळीं आपण दिनकरलाच दोष देऊन मुकुंदची माफी मागण्याविषयीं त्याला लिहिलें होतें, याचीहि तिला त्याबरोबरच आठवण झाली. एक वेळ तिला वाटे दिनकरला पत्र पाठवून ही सर्व कहाणी त्याला कळवावी आणि त्याची सल्ला विचारावी; परतु ज्या लेखणीनें दिनकरला माफी मागण्यास लिहिलें त्याच लेखणीनें आतां दिनकरला शरण जाणें तिला फार अनुचित वाटूं लागलें. अशा विचारांत तिचे चार दोन दिवस जातात न जातात तों दिनकरचेंच पत्र तिच्या हातीं पडलें. विलायतेहून आलेलें ते लांबलचक व मोठें थोरलें पाकीट पाहून मालतीला साहजिकच आश्चर्य वाटलें. तिनें तें पाकीट फोडून त्यांतले कागद काढून प्रथम पत्र वाचण्यास आरंभ केला. "थोड्या दिवसांपूर्वी ब्यारिस्टर मुकुंद यांच्यासंबंधानें आपणास सावधगिरी बाळगण्याविषयी मीं लिहिलें होतें; परंतु त्यावेळीं याचा आपणास राग येऊन मला त्यांची क्षमा मागण्याविषयीं लिहिलें होतें. त्यांची क्षमा मागण्याचीं साधनें त्या वेळीं माझ्या हातीं नसल्यामुळें आपली आज्ञा मला मोडावी लागली. आतां तीं साधनें माझ्या हातीं आल्यामुळें आपण सांगाल त्या शब्दानीं ब्यारिस्टरसाहेबांची क्षमा मागण्याची माझी तयारी आहे. हीं साधनें कोणतीं, तें सोबतच्या कागदांवरून समजेलच." पत्र वाचीत असतां त्यांतलीं हीं पांच सहा वाक्यें जेव्हां मालतीनें वाचलीं, तेव्हां तिचें हृदय गहिंवरून येऊन त्या एकांतांत ती मोकळ्या कंठानें रडूं लागली. या पत्रामुळें पूर्वीच्या अनेक गोष्टींची स्मृति तिला झाली आणि डोळ्यापुढें त्या सर्व गोष्टी दिसूं लागल्यानें तिच्या जीवाची तळमळ अधिक वाढली. रडून रडून हृदयावरील दुःखाचा भार कांहींसा कमी झाल्यावर पत्रासोबतचे कागदपत्र पाहण्यास मालतीनें आरंभ केला. हे सर्व कागदपत्र लंडनच्या कोर्टाच्या सहीशिक्याचे होते. दारू विक्रीच्या दुकानांत नौकरीस असलेल्या मिस मेरी स्मिथ नांवाच्या हलकट मुलीबरोबर मुकुंदनें लग्न करून नतर या मिसेस मुकुंदचें व मुकुंदचें बिनसल्यामुळें कोर्टानें दरमहा पधरा पौंड मेरी स्मिथला देण्याविषयीं मुकुंदवर हुकुमनामा दिला होता. एका सभ्य स्त्रीशीं चावटपणा केल्याबद्दल मुकुंदला दोन

आठवड्याची साध्या कैदेची शिक्षा झाली होती, त्या हुकमाची नक्कल आणि एकदां रस्त्यांत दारू पिऊन दंगा केल्याबद्दल झालेल्या दंडाच्या हुकुमाची नक्कल; असे तीन कागद पाहिल्यावर मालतीच्या डोळ्यापुढें काळाकुट्ट अंधार दिसूं लागला आणि त्या अंधारांत आपण खोल खोल चाललों आहों, असें तिला वाटूं लागलें.

मालतीनें दिनकरला कांहींच पत्रोत्तर पाठविलें नाही. काय पाठविणार विचारी ! मुकुंदविषयीं मात्र तिच्या मनांत अधिकच तिरस्कार उत्पन्न झाला. कसाहि असो, आपला पति आहे, हे विचार अशिक्षित स्त्रीच्या मनात आले असते; पण मालती सुशिक्षित असल्यामुळें तिला मुकुंदच्या सहवासांत दिवस घालविणें असह्य झालें. इकडे मुकुंदचे व्यसन हळूहळू अधिकच वाढून मालतीला तो वारंवार शिव्या देऊं लागला. यामुळें मालतीचे विचारहि हळू हळू अगदी निराळे असे होऊं लागले. सुख तर नाहींच नाहीं; पण प्रत्येक दिवस तिचा दुःख, हाल आणि कष्ट यांत जाऊ लागला. या अशा उद्वेगजनक स्थितीची तिला कल्पनाहि नव्हती; उलट आपली संसारयात्रा इतरांपेक्षा अधिक सुखदायक होणार; असा तिला भरंवसा होता. अशा स्थितींत मालतीला हा निराशेचा आघात अर्थातच सहन झाला नाहीं. एके रात्री तर मुकुंदचे वेडेचार पाहून तिला जगांत तोंड दाखवूं नये असें वाटूं लागलें. दुसऱ्या दिवशी मुकुंद शुद्धीवर आल्यावर मालती त्याच्यासमोर उभी राहून अश्रू गाळीत; पण रागानें ह्मणाली, " मला तुह्मी खरोखर फसविलंत ! तुमच्या त्या गोड गोड शब्दांवर विश्वास ठेवून मी फसले. माझ्या सगळ्या आयुष्याची तुमच्या या अशा कृतीनें दुर्दशा झाली. "

मुकुंद निर्लज्जपणें ह्मणाला; " यांत कसली दुर्दशा ? मद्य पिण्यांत दोष तो कसला ? कोर्टाच्या कामानें मेंदूला जो शीण होतो, तो घालविण्यासाठीं दारूशिवाय दुसरें चांगलें औषध नाहीं, ह्मणून मी दारू पितों. केव्हां केव्हां क्लबांत मोठमोठ्या लोकांनीं आग्रह केला, तर जास्त पितो. त्यांत एवढें बिघडलें कोठें ? "

इतके दिवस मालतीनें हें सगळें मुकाट्यानें सहन केलें होतें; पण

आज तिचा सांचलेला राग सगळा बाहेर पडला. ती त्वेषानें ह्मणाली, " अहो, दररोज ज्या पेयानें मनुष्यत्वाला मुकून पशूपेक्षां पशू होतां, त्यांत काहीच बिघडलें नाहीं, असें तुह्माला वाटतें तरी कसें ? इग्लंडांत त्या मेरी स्मिथची भानगड करून ठेवलीच आहे आणि येथेंहि त्या विमलेला बरोबर घेऊन हिंडतां. तिनें तर लाजच सोडली आहे; पण तुह्मांला कांहीं मानापमान आहे कीं नाहीं ? "

मुकुंद विद्रुप स्वरानें ह्मणाला, " आणि तूं कशाला एवढे नाकानें कांदे सोलतेस ? तो दिनकर तुझ्याकडे कशासाठीं येत जात होता, हे मला माहीत नाहीं, असें कांहीं नाहीं ! "

" केलें इतकें पाप पुरें न वाटून आतां त्या भल्या गृहस्थाच्या नांवाला काळें लावायला निघाला वाटतें ? दिनकररावांच्या पायधुळीइतकी देखील तुमची योग्यता नाहीं. त्यांनी केव्हां माझ्याकडे पापदृष्टीनें पाहिलें देखील नाहीं ! "

" मालती, कोणत्या स्थितींत मीं तुला आश्रय दिला आहे, हे लक्षांत ठेवून तूं बोलत आहेस ना ? कमळाबाईंनीं तुझी अवस्था भिकाऱ्या-पेक्षांहि शोचनीय केली होती, अशा वेळीं तुझ्याबरोबर विवाह करून तुला वैभवशाली मीं केलें आहे. "

" पण हा आश्रय न स्वीकारतां त्या वेळीं जर भिक्षा मागून राहिलें असतें तर आज मी अशी विडंबना न भोगतां पुष्कळ सुखांत असतें. असले पाशविक वैभव भोगणें ह्मणजे मनुष्यत्त्वाला तिलांजलि देणें होय. असल्या वैभवाचा आपण खुशाल उपभोग घ्या. मला त्यांत मुळीं सौख्य नाहीं, मान नाहीं आणि आशाहि नाहीं. तुमचे अलंकार आणि वस्त्रें हीं सगळीं मीं काढून ठेविलीं आहेत; आणि ज्या वस्त्रानें तुमच्या घरांत आलें त्याच वस्त्रानें तुमचा मी निरोप घेतें. "

असें म्हणून मालती खरोखरच घराच्या बाहेर पडली आणि वाट फुटेल तिकडे चालू लागली. इकडे या प्रकारानें मुकुंद दगडाच्या पुतळ्याप्रमाणें थोडा वेळ स्तब्ध उभा होता.

## प्रकरण चवदावें.



इकडे रामपुरला लक्ष्मीची प्रकृति हळू हळू बिघडत चालली होती. तिचा वर्ण फिकट पडत चालला होता, अंगानें ती कृष होत चालली होती, आणि तिला कांहींसा अन्नद्वेषहि झाला होता. ज्याची पहिली बायको आहे, अशा नवरदेवास सुधारक आपल्या मुली देत नाहींत, हें लक्ष्मीला यापूर्वींच समजलें होतें; परतु दिनकर विलायतेस जाते वेळीं ते शब्द लक्ष्मीजवळ जेव्हां बोलला; तेव्हां त्याचा भावार्थ लक्ष्मीच्या मनावर निराळाच उमटला. 'माझें मालतीबरोबर लग्न व्हावें अशी माझी फार इच्छा आहे; पण तूं जिवत आहेस, तोपर्यंत कांहीं ती आशा नाहीं.' असें कांहीं दिनकर म्हणाला नव्हता; परतु त्यानें चार दोन शब्द उच्चारते वेळीं जो भाव दर्शविला होता, त्यावरून हाच अर्थ उत्पन्न झाल्यामुळे लक्ष्मीसारख्या निर्मळ व कोंवळ्या मनाच्या स्त्रीवर त्याचा अर्थातच अनिष्ट परिणाम झाला होता. लक्ष्मीची प्रकृति अशा रीतीनें बिघडल्यामुळे एका चांगल्या डॉक्टरला दाखवून भास्करनें तिला औषधहि सुरू केलें होतें; परंतु चिंतेसारख्या रोगावर कोणत्या धन्वतरीचें औषध लागूं पडणार ?

एक वर्षभर निरनिराळ्या डॉक्टर वैद्यांचे औषधोपचार करूनहि लक्ष्मीची प्रकृति मुळींच सुधारली नाहीं. उलट दिवसेंदिवस ती अधिक अशक्त होत चालली आहे, असें सगळ्यांना स्पष्ट दिसूं लागलें. शेवटीं क्षय-रोगाचीं सर्व लक्षणें लक्ष्मीच्या अंगावर दिसून आल्यामुळें सगळ्यांनाच फार काळजी उत्पन्न झाली. लक्ष्मीनें आपल्या गोड स्वभावामुळें आणि निर्मळ व साध्या वागणुकीनें जो विसूकाकांच्या घरांत लौकिक संपादन केला होता, त्यामुळे लक्ष्मीवर प्रत्येकाची विलक्षण ममता बसली होती. विशेषतः दिनकरवरच्या एकनिष्ठ प्रेमामुळे लक्ष्मी अशी सुकत चालली आहे, हें सर्वांच्या लक्षांत असल्यामुळें लक्ष्मीची ती अवस्था पाहून प्रत्येकाचें अंतःकरण कळवळून येत असे. मुलीला आज बरें वाटेल, अमक्याच्या औषधानें गुण येईल, असें केलें म्हणजे तिला आराम पडेल, वगैरे सगळे प्रयत्न करूनहि

रोगाचें पाऊल जेव्हां मागें पडेना, तेव्हां विसूकाकांच्या घरांतील सर्वांच्याच डोळ्यांतून वेळीं अवेळीं अश्रु वाहूं लागले. आणखी दोन वर्षे तिचा जीव जगवून दिनकरची आणि तिची गांठ पडली म्हणजे मिळविली, असें सगळ्यांना वाटत होतें.

लक्ष्मीची शुश्रुषा अशी कोणास करावी लागत नव्हती. कारण लक्ष्मी-लाच कोणी आपली सेवा करावी हें पसंत नव्हतें. ती आपले सगळे व्यवहार आपल्या हातानेंच करीत असे. तथापि लक्ष्मीची काळजी उमा-वैनी विशेष खबरदारीनें घेत असे. तिच्या मनाला बरें वाटावें म्हणून ती तिला अनेक धीराच्या गोष्टी सांगत असे. एके दिवशीं दुपारच्या वेळीं जवळ दुसरें कोणी नाहीं, असें पाहून उमा म्हणाली, "लक्ष्मी, झालें तें झालें. आतां कसलीहि काळजी करूं नको म्हणून आम्ही सगळे सांगत असतां, तूं कोणाचेंच ऐकत नाहीस, हें काय ? आम्हा सगळ्यांना दुःखांत लोटून जायचा विचार आहे ना ? "

हे शब्द उच्चारतां उच्चारतांच उमाचे डोळे पाण्यानें भरून आले. लक्ष्मीच्या डोळ्यांतहि अश्रु चमकूं लागले. ती म्हणाली, "उमाताई, तुम्ही असे माझ्यासाठीं डोळ्यांतून पाणी काढीत जाऊं नका. त्यांच्यापासून मला जें सुख मिळालें, तें पुष्कळ मिळालें; पण माझ्यापासून मात्र त्यांना सुख मिळालें नाहीं. तेव्हां त्यांच्या सुखाच्या मार्गांत मी कशाला कंटक होऊन राहूं. माझें मरण, हेंच माझें आतां सुख."

लक्ष्मीला आपल्याजवळ घेऊन आणि तिचे डोळे पुसून उमा म्हणाली, "लक्ष्मी, तुला सगळें समजतें. तूं अशी निराश कां होतेस ? भावोजींचें विलायतेहून येणें होऊ दे, म्हणजे मग पहा ? तुझ्यासाठीं ते कसे वेडे होतील."

"माझ्यासाठीं वेडे होतील तेव्हां होतील; पण आज तर त्या मालती-साठीं ते वेडे झाले आहेत. हा विलायतेस जाण्याचा खटाटोप केवळ तिच्यासाठीं; तेव्हां त्यांना ज्यामुळें सुख होईल, तीच गोष्ट आतां परमे-श्वरानें केली पाहिजे. मी मरण्यांत मलाहि सुख आहे, त्यांचाहि सुखाचा मार्ग मोकळा होणार आहे."

" वेडे, असें धैर्य सोडून कसें चालेल. भारत–रामायणांतल्या सीता, दमयंती, शकुंतला यांच्या कथा तूं वाचल्या नाहींस का? त्यांनीं धैर्यानें संकटें सोसलीं, तेव्हां त्यांना पुन्हा सुखाचे दिवस दिसले. "

" उमाताई, तुम्ही म्हणतां तें खरें; पण त्या देवता होत्या, आणि मी तर दुर्बल मनाची लहान पोर आहें, आणि मी वाचण्यानें त्यांना सुख होण्याचा संभव असता, तर मीहि जगण्यांतच सुख मानलें असतें; परतु माझ्या मरण्यांतच जर त्यांचें सुख समावलेलें आहे, तर मी मृत्यूच्या दाराशीं जाऊन कां उभी राहूं नको. "

यावर उमा तरी काय सांगणार! तिनें प्रत्यहीं लक्ष्मीला दोन समजुतीच्या गोष्टी सांगून तिला धैर्य द्यावें, परतु या वरील ठरलेल्या मुद्याशिवाय लक्ष्मीकडून दुसरें तिसरें कांहीं ऐकावयाला मिळत नसे. लक्ष्मीची प्रकृति बरीच बिघडल्यावर तिला माहेरीं पाठवावें असें भास्करनें ठरवून तिच्या आईबापांना बोलाविलें; परंतु लक्ष्मीनें आपली सत्तेची जागा सोडण्याचें साफ नाकारलें. यापूर्वींहि तिच्या आईनें तिला दोन तीन वेळां माहेरीं नेण्याचा प्रयत्न करून पाहिला; पण तो साधला नाहीं. जन्मगांवीं जाऊन राहिल्यानें क्षयरोग बरा होतो, असा डॉक्टरनें या वेळीं लक्ष्मीला सल्ला दिली होती आणि त्यासाठीं तिच्या आईनेंहि पराकाष्ठा केली; परतु लक्ष्मीनें आपला हट्ट सोडला नाहीं. तिची जी निजावयाची खोली होती, त्या खोलींत आईला नेऊन ती म्हणाली, " आई, तुझ्या मी पायां पडतें. मला येथून नेऊ नकोस. ही खोली म्हणजे मला देवघराप्रमाणे पूज्य वाटते. या आरामखुर्चीवर ते पुस्तक वाचीत बसत असत आणि या पलंगावर ते झोंपत असत. कित्येक वेळेला माझ्याबरोबर सुखदुःखाच्या गोष्टी बोलून त्यांनीं व मीं रात्रीच्या रात्री येथें जागून काढल्या आहेत. आई, असल्या या देवमंदिरांतून मला दुसरीकडे नेऊं नकोस. माझें जें कांहीं बरें वाईट व्हावयाचें असेल, तें आतां येथेंच होऊं दे. "

तिची आई तरी यावर काय उत्तर देणार! मुलीचे हे शब्द ऐकून आईचें हृदय फाटून गेलें. अश्रु ढाळून तिनें मुलीच्या डोक्यावर जणूं अभिषेक केला; आणि शेवटीं मुलीचें तें म्हणणे तिला मान्य करावें लागलें.

मुलीचीं चिन्हें बरीं दिसत नाहींत असें पाहून तीहि तेथेंच राहिली. आणखी तीन चार महिने गेल्यावर तर हिंडण्या फिरण्यासहि लक्ष्मीला शक्ति न राहून तिला आंथरूण धरावें लागलें. ज्या दिवशीं तिनें आंथरूण धरलें, त्या दिवशीं ती उमावैनीला ह्मणाली, " उमाताई, माझें एक काम आहे. कोणाला न सांगता केले पाहिजे."

उमा तिच्या अंगावरून प्रेमानें हात फिरवून ह्मणाली, " लक्ष्मी, तुझें काम मी ऐकणार नाहीं, असें केव्हां तरी होईल का? सांग सांग."

लक्ष्मी कांहींसें लाजल्या सारखे करून ह्मणाली, " त्या लहानशा कपाटांत एक फोटो आहे, तेवढा—"

लक्ष्मी पुढें कांहीं बोलणार त्याच्या आधींच उमा ह्मणाली, "समजलें. दिनकर भावोजींचा फोटो तुझ्या जवळ आणून ठेवावयाचा एवढेंच ना तुझें काम?" असें ह्मणून उमा उठली आणि तिनें लक्ष्मीचें कपाट उघडलें. पाहते तो आंत दिनकरचा फोटो व्यवस्थेनें ठेवलेला असून त्याला फुलांची माळ घातलेली होती. तेथलि एकंदर स्वरूपावरून त्या फोटोला लक्ष्मीकडून दररोज सुवासिक फुलांची माळ वाहिली जात होती, हें उमाच्या लक्षांत आल्यावांचून राहिलें नाहीं. लक्ष्मीच्या या आचरणामुळें उमाचें अंतःकरण साहजिक गहिंवरून आलें. तो फोटो घेऊन ती लक्ष्मी जवळ आली आणि लक्ष्मीच्या हातीं तो फोटो देऊन ती ह्मणाली, " लक्ष्मी, भावोजींना खरोखर रत्न लाभलें होतें; पण त्यांनीं तुला ओळखलें नाहीं."

त्या फोटोला वंदन करून लक्ष्मी ह्मणाली, " उमाताई, दोष त्यांचा नाहीं, दोष माझ्या नशीबाचा. मला वेडी ह्मणा, खुळी ह्मणा; पण माझे देवाधिदेव हेच. हातपाय चालले, तोंवर त्यांची वेडीवाकडी पूजा केली; पण आतां मानसपूजेवरच समाधान मानलें पाहिजे. उमाताई, मला अक्षय दिसेल, अशा ठिकाणीं हा फोटो लावा."

लक्ष्मीच्या या कृतीनें उमाच्या डोळ्यांतून सारखे अश्रु गळत होते. तिनें लक्ष्मीच्या समोरच्याच भिंतीवर तो फोटो लावला. रोज सकाळीं कोणाला नकळत फुलांची माळ करून ती तिनें लक्ष्मीला द्यावी आणि फोटो तिच्या जवळ नेऊन ती लक्ष्मीनें फोटोला वाहिली कीं, पुन्हां

पूर्ववत् फोटो भिंतीला टांगावा, असा क्रम चार महिने चालला होता. एकेक दिवसानें लक्ष्मीची प्रकृति बिघडत जाऊन तिची स्थिति काळजी करण्यासारखी झाली होती. पुढें पुढें तर तिच्यानें फोटोला माळ घालावयाचेंहि होईना. अशा स्थितींत लक्ष्मी आयुष्याचा एकेक दिवस मोजीत असतां, एके दिवशीं तिची प्रकृति फारच बिघडली आणि आज लक्ष्मी वांचत नाहीं, असें सगळ्यांना कळून चुकलें. अर्थात् आज लक्ष्मीच्या खोलींत सगळेच मधुन मधुन येऊन बसत होते. इतरांच्या दृष्टीनें तिची प्रकृति इतकी बिघडली आहे, असें दिसत नव्हते; पण डॉक्टरनें भास्करच्या कानांत ती गोष्ट हळूच सुचविली होती. अशुभ गोष्टीचा तेव्हांच प्रसार होतो, या न्यायानें हीहि घरांतील बहुतेकांस कळली होती. लक्ष्मीच्या पलंगाजवळ उमा, लक्ष्मीची आई आणि यमुना अशा तिघी बसलेल्या असता लक्ष्मी क्षीण स्वरानें ह्मणाली, " उमाताई, कांहीं सांगावयाचे आहे. तुम्ही अशा रडूं नका. " असें म्हणून लक्ष्मीनें एकवार आईकडे आणि एकवार यमुनाकडे पाहिलें. दोघींनीं बाहेर उठून जावें, असाच भाव तिच्या त्या पाहण्यांत होता. परंतु उमाला इतक्या एकांताची अवश्यकता वाटली नाहीं. ती ह्मणाली, " लक्ष्मी, त्या का कोणी परक्या आहेत, सांग खुशाल सांग काय सांगावयाचें असेल तें! लक्ष्मी, तू अशी निराश होऊं नकोस. डॉक्तर आतांच ह्मणाले, कांहीं भीति नाहीं म्हणून. "

" उमाताई, मी निराशहि झालें नाहीं आणि मी भीतहि नाहीं. माझी आशा आज पूर्ण होणार. मरणाची मला मुळींच भीति वाटत नाहीं. मी तर त्याची उत्कंठेनें वाट पहात आहें; पण उमाताई, एक आशा माझी तशीच राहिली. "

लक्ष्मीचे हे शब्द ऐकून सगळ्या डोळे पुसूं लागल्या. शोकार्त स्वरानें उमा ह्मणाली, " कोणती ती आशा लक्ष्मी ? "

" त्याना एकवार डोळ्यांनीं पाहण्याची इच्छा होती. समजून न समजून मीं त्यांचे अनंत अपराध केले आहेत, त्याची क्षमा मागावयाची होती. उमाताई, ते परत आल्यावर माझी एवढी इच्छा त्यांना कळवा; मग ते क्षमा करोत वा न करोत ! "

उमा स्फुंदत स्फुंदत ह्मणाली, " लक्ष्मी, हां हां ह्मणतां अडीच वर्षे तर झालीं. आणखी सहा महिने झाले, कीं, ते परत येतील. मग खुशाल त्यांच्याशींच काय बोलावयाचें तें बोल."

" नाहीं ! मी तितकी भाग्यवान् नाहीं. उमाताई, माझी ही एवढी इच्छा तुम्ही पुरी करा. त्यांचा फोटो तेवढा आणा आणि तो माझ्या हृदयावर ठेवा. मला त्यांचें दर्शन घेऊं द्या." लक्ष्मीची ही इच्छा उमानें लागलीच पुरी केली; परंतु लक्ष्मीचे हात इतके शिथिल झाले होते कीं, तो फोटो तिला स्वतःला धरतां येईना. तेव्हां ती म्हणाली, " उमाताई, फोटो माझ्या समोर धरा. मला धरतां येत नाहीं—अगदीं माझ्या डोळ्याजवळ आणा—काय ह्मणतां डोळ्याजवळ आणला ? मग मला दिसत कसा नाहीं ?— माझ्या डोळ्यांतली दृष्टिशक्ति गेली वाटतें— उमाताई, फोटो माझ्या हृदयावर ठेवा आणि त्यावर माझे दोन्ही हात उचलून ठेवा. आई, मला सगळीकडे अंधारच दिसूं लागला, तूं कोठें आहेस ? उमाताई कोठें आहेत ?"

लक्ष्मीची शेवटची घटका जवळ जवळ येत चालली आहे, असें सगळ्यांना कळून चुकलें. लक्ष्मीची आई तर या दुःखानें वेडीच झाली होती. उमाचा कंठ भरून आला होता. ती ह्मणाली, " लक्ष्मी, आम्ही सगळ्या तुझ्या जवळच आहों. भिऊं नकोस."

" आणि सासूबाई कोठें आहेत ?"

" त्याहि तुझ्याजवळच आहेत."

" सासूबाई, जातें मी आतां. चुकल्यामुकल्याची क्षमा करा."

लक्ष्मीचे शेवटचे शब्द असे हेच. यानतर तिनें कांहीं शब्द उच्चारले; पण ते सर्व अस्पष्ट व विसंगत असे होते. तिनें आपला प्राण फारच शांतपणें आणि कष्ट न सोसतां सोडला. तिचें प्राणोत्क्रमण होतांच इतका वेळ दुःख गिळून बसलेल्या सगळ्या जणींनीं मोठ्यानीं आक्रोश करण्यास आरंभ केला. विसूकाकांच्या घरांतली गृहदेवता गेली असें गांवांतल्या सगळ्यांना वाटलें. घरांतल्या माणसांना तर जें दुःख झालें, त्याची कल्पनाहि करणें अशक्य होय. यशोदाबाईचा शोक पाहून पाषाणासहि पाझर फुटला असेल;

लक्ष्मीनें प्राण सोडतांच त्या दिनकरवर चरफडून रडत रडत ह्मणाल्या, "कारट्या, घरांतलें रत्न गमावून कशालारे सातासमुद्राच्या पलीकडे गेलास ? दिनकर, पोरा, घर बुडविलेंस, आज आमच्या घरांतली लक्ष्मी गेली ! घराचा घरपणा गेला !" यशोदाबाईचा हा पहिला हुंदका सपतो न सपतो तोंच त्यांना दुसरा हुंदका आला. लक्ष्मीच्या प्रेताला कवटाळून त्या ह्मणाल्या, "दिनकर परत आल्यावर माझी लक्ष्मी कोठें म्हणून मला विचारील, तेव्हां मी त्याला काय सांगूं ? काळानें चोरून नेलेली त्याची वस्तु त्याला कोठून परत देऊं ? सुनेला पुढें करून मागें राहिलेली मी ह्मातारी, हें काळें तोंड लोकांना कसें दाखवूं ?"

शिव शिव ! त्या वेळीं उमा, यमुना, सत्यभामा, यशोदा, लक्ष्मीची आई, तिचा बाप, भास्कर आणि दिवाकर यानीं लक्ष्मीसाठीं जो शोक केला, तो वर्णन करण्यास लेखकाची लेखणी असमर्थ आहे. स्मशानांत चितेवर जेव्हां भास्करनें प्रेत ठेवलें, तेव्हां तो मोठ्यानें आक्रंदून ह्मणाला, "हाय ! आज आमच्या घरांतलें रत्न स्वस्थानीं परत गेलें. आह्मां अभाग्यांना तें लाभलें नाहीं. जा लक्ष्मी, त्या आपल्या देवलोकीं जा. तेथें तरी तुझ्या दुःखाचें परिमार्जन होऊन तुला खरें सुख मिळो !"

---

## प्रकरण पंधरावें.



मुकुंदचा निरोप घेण्यापूर्वींच मालतीनें आपली व्यवस्था करून ठेवली होती. उमरावतीच्या मुलींच्या शाळेला एक व्यवस्थापक व शिक्षक अशा दुहेरी नात्याच्या एका इसमाची जरूर होती. होतां होईल तो या जागे-साठीं एकादी सुशिक्षित स्त्री मिळाल्यास फार चांगलें, असेंहि जाहिरातींत म्हटलें होतें. कर्मधर्मसंयोगानें शाळेच्या चालकांनीं मालतीचाच अर्ज मंजूर केला व अशा रीतीनें पोटाचा प्रश्न सुटल्यावर मालतीनें मुकुंदच्या घराचा त्याग केला होता. उमरावतीस या शाळेच्या इमारतींतच बोर्डिंग असल्यामुळें मालतीची जेवण्याची आणि राहण्याची सोयहि फार चांगली

झाली होती. मालती उमरावतीस येऊन या नव्या परिस्थितींत तिचे कांहीं दिवस गेल्यावर तिच्या डोळ्यापुढें दिनकरची ती रम्य व मनोहर मूर्ति वारंवार दिसूं लागली. इतके दिवस ती दिनकर संबंधानें उदासीनच होती. त्याच्याविषयीं तिच्या मनांत बरा वाईट असा कोणताच विचार येत नसे; परंतु स्वतः तिच्या नवऱ्यानेंच जेव्हां दिनकरविषयीं तिच्यावर वाईट आरोप केला, तेव्हां दिनकरची वागणूक लोकांना संशय यावा अशा प्रकारची होती कीं काय ? याचा तिलाच संशय येऊं लागला, आणि त्या चमत्कारिक विचारामुळें तिचे मन दिनकरच्या रम्यतेकडे ओढ घेऊं लागलें. खरोखरच दिनकरचें आपणावर प्रेम असेल कां ? असा प्रश्न आतां दिवसांतून कितीतरी वेळां तिच्या मनांत उद्भवूं लागला. 'पण प्रेम असलें, तरी उपयोग काय ? मी विवाहित. तेहि विवाहित; तेव्हां त्यांचें माझ्यावर प्रेम असलें काय किंवा माझें त्यांच्यावर असलें काय, त्याचा उपयोग कांहींच नाहीं. ईश्वराच्या कृपेनें आह्मी दोघेंहि अविवाहित असतांच जर तसा योगायोग घडून आला असतां, तर आज दोघेहि सुखी असतो. जाऊं द्या. तें आतां माझ्या नशिबीं नाहीं आणि असल्या निकृष्ट प्रेमाचे विचारहि मनांत न येवो. प्रेम करण्यास माझ्या बधुभगिनी, माझ्या विद्यार्थिनी, माझा स्वदेश, वगैरे अनेक गोष्टी असतां आतां त्या भिकार प्रेमाचे विचार मनांत न आणणें हेंच चांगलें.' अशा प्रकारचा निग्रह मालतीच्या मनांत उत्पन्न होऊन पाशविक प्रेमाविषयीं तिला पूर्ण तिरस्कार वाटूं लागला. तिचें मन जेव्हां इतकें खंबीर झालें, तेव्हां भवितव्यतेनें तिला जरी अगदीं निराळ्या स्थितींत नेऊन टाकलें होतें. तरी ती त्या स्थितींतहि समाधानानें राहूं लागली.

उमरावतीस जेथें हें मालतीचें कन्याविद्यालय होतें, तेथें जवळच एक लहानसा बंगला असून त्यांत एक वकील रहात होते. या वकिलाच्या स्त्रीचें नांव चंद्रभागाबाई असें होतें. चंद्रभागाबाईची सगळ्यांत वडील मुलगी पार्वती, या कन्या शाळेंत जात असल्यामुळें आणि बंगला अगदीं शाळेच्या जवळ असल्यामुळें मालतीची आणि चंद्रभागाबाईची थोड्याच दिवसांत दाट ओळख झाली होती. चार दोन दिवसांनीं मालती त्यांच्या

घरीं फुरसतीच्या वेळीं बसावयाला जात असे. एके दिवशीं मालती त्यांच्या-कडे नेहमींप्रमाणें जाऊन बसली असतां वकीलसाहेबांची स्वारी कोर्टांतून आली. आल्याबरोबर त्यांनीं एक पत्र पार्वतीजवळ देऊन तें आपल्या सौभाग्यवतीस देण्यास सांगितलें. मुलीनें तें पत्र आईच्या हातीं देतांच चंद्रभागाबाईनीं तें उघडलें आणि मालती तेथे असतांच त्यांनीं तें पत्र मनांतल्या मनांत वाचण्यास आरंभ केला. पत्र वाचीत असतां चंद्रभागा-बाईचा चेहरा केव्हां खिन्न होत होता, तर केव्हां प्रसन्नहि दिसे. विशे-षतः खिन्नत्वाचीच झांक त्यांत अधिक होती. पत्र वाचून होतांच मालती ह्मणाली, "कोणाचें तें पत्र? ते वाचून पाहून तुमच्या मनावर बराच परिणाम झाल्यासारखा दिसतो?"

चंद्रभागा ह्मणाली, "इकडच्या स्नेह्यांचें विलायतेहून पत्र आलें आहे. स्नेही कसले! दोघांना बंधु बंधु म्हटलें तरी हरकत नाहीं. पत्रांत कांहीं सुखाचा मजकूर आहे, कांहीं दुःखाचाहि आहे. हें पत्र वाचून पहा. तुह्मांला तें दाखवावयाला कांहीं हरकत नाहीं."

असें म्हणून चंद्रभागानें तें पत्र मालतीच्या हातीं दिलें. वर वर पत्र पाहून ते मालती तसेंच परत करणार होती; पण पत्र उघडून दिनकरचें हस्ताक्षर दिसतांच तिची उदासीनता नाहींशी होऊन तेथें प्रबळ जिज्ञासा उत्पन्न झाली. त्या पत्रांत खालीं लिहिलेला मजकूर होता.

लंडन. ब्रन्सविकस्ट्रीट. ता—

मित्रोत्तम पांडुरंगराव यांसः—

सा. न. वि. वि. तत्त्वज्ञानाच्या परीक्षेंत मी नापास झालों. हें वर्तमान आपणास अगोदरच समजलें असेल, आणि त्यामुळें आप-णास फार वाईट वाटत असेल; परंतु विलायतेस येण्याचा माझा उद्देशच जर निराळा होता, तर मी पास तरी कोठून होणार? माल-तीला पाठविण्यासाठीं जे कागदपत्र मला पाहिजे होते, ते मिळवि-ण्यांतच माझे बरेच दिवस मोडले. आणि इतका प्रयत्न करूनहि मालतीचें मुकुंदबरोबर लग्न झाल्याचें जेव्हां आपणाकडून समजलें; तेव्हां तर मी फारच निराश झालों. तेव्हांपासून अभ्यासाकडे लक्ष

लागेनासें झालें आणि मनाला कशानें ह्मणून समाधान वाटेनासें झालें. माझ्या मनाच्या दुर्बळ स्थितीबद्दल आपण मला दोष द्याल; पण मी तरी काय करूं! माझें मन इतकें दुर्बळ आहे—आतां होतें असें म्हटलें पाहिजे— हें मी कबूल करतों. माझें मन दुर्बळ खरेंच; परंतु इन्टेलेक्चुअल प्रेमाला मर्यादा आहे, हें त्यामुळें मला दिसून आल्यानें माझें मन पुन्हां खंबीर होऊं लागलें आहे. थोड्या दिवसांपूर्वीं दिवाकराकडून घरचें पत्र आलें होतें; परंतु त्यानें घरची काहीं सगळी हकीकत मला कळविली नाहीं. मातोश्री अजारी असून माझ्या वाटेकडे त्यांचे डोळे लागले आहेत, असें त्यानें पत्रांत लिहिलें आहे. माझ्या या निष्ठुर वर्तनाचीं फळें कोणा कोणाला चाखावीं लागणार आहेत, ते परमेश्वरास माहीत. आपण एकदां घरची सगळी हकीकत कळविल्यास फार उपकार होतील.

आपला, नम्र मित्र— दिनकर.

मालतीनें हें पत्र कसें बसें वाचलें खरें, पण तें वाचून होतांच मालतीच्या मुखावर विलक्षण कालिमा पसरून तिच्या हाताला कंप सुटला आणि पत्र तिच्या हातांतून गळून पडलें. हें पाहून चंद्रभागा अर्थातच घाबरून ह्मणाली, " मालतीबाई, तुम्ही असें काय करतां ? "

या प्रश्नानें मालती जणूं शुद्धीवर आली. ती ह्मणाली, "थोड्या दिवसांपूर्वीं मी फार अजारी होतें, तेव्हां पासून केव्हां केव्हां मला असें होतें. जातें मी आतां—थोडा वेळ स्वस्थ पडलें, ह्मणजे बरें वाटतें." असें ह्मणून मालती आपल्या बिऱ्हाडीं गेली. घरीं येऊन ती अंथरुणावर खरोखरच निजली आणि अश्रू ढाळूं लागली. दिनकरनें आपल्यासाठीं केवढा स्वार्थत्याग केला, किती कष्ट सोसले आणि स्वतःचा कसा मानभंग करून घेतला, हें आज त्या पत्रानें मालतीच्या चांगलें लक्षांत आल्यामुळें तिचें अंतःकरण दिनकरविषयीं तिळ तिळ तुटूं लागतें. चार सहा दिवस गेल्यावर मालती पुन्हां चंद्रभागाकडे गेली आणि सहज बोलतां बोलतां ह्मणाली, " चंद्रभागाबाई, तुमच्या त्या विलायतच्या स्नेह्यांना पत्रोत्तर पाठविलें कीं काहीं ? "

" नाहीं अजून. त्यांना काय लिहावें, हेंच आमच्या इकडे सुचेनासें झालें आहे. मालतीबाई, तुम्हांला त्या दिनकररावांची माहिती नाहीं. किती थोर आणि उदार अंतःकरणाचा गृहस्थ; पण भलताच नाद डोक्यांत घेऊन सगळ्या आयुष्याची माती केली. आमच्या इकडे त्यांच्यासाठीं फार वाईट वाटतें. डोळ्यांतून पाणी देखील काढावयाचें होतें. मला देखील त्यांच्यांसाठीं फार वाईट वाटतें, पण काय करणार ? "

' तुम्हांला दिनकररावांची माहिती नाहीं, ' हे चंद्रभागाचे शब्द ऐकून तशा तापदायक मनःस्थितींतहि मालतीला हंसूं आलें. तें हंसूं तसेंच दाबून मालती, म्हणाली, " त्यांचा आणि तुमच्या इकडच्यांचा जर इतका स्नेह असेल, तर त्यांना चांगलें सणसणीत पत्र पाठवून उत्साहित कां करीत नाहीं ? तत्वज्ञानाची परीक्षा नापास झाली, तर झाली. सिव्हिलसर्व्हिसची किंवा ब्यारिस्टरची परीक्षा देऊन ते कां येत नाहींत? एवींतेवीं ते विलायतेस गेले आहेतच. मग त्यांनीं रिकाम्या हातानें कां परत यावें ? "

मालतीची ही सल्ला चंद्रभागाला फारच आवडली. ती म्हणाली, "थांबा मालतीबाई, त्यांनीं आजच पत्राचा मसुदा तयार करून ठेवला होता वाटतें. पाहूया त्यांत त्यांनीं काय लिहिलें आहे तें. " असें म्हणून चंद्रभागा बाहेर गेली आणि पांडुरंगानें पेनसिलीनें एक पत्र खरडून ठेवलें होतें, तें घेऊन आली. पांडुरंगानें घाईघाईनें हा मसुदा तयार केला होता; पण त्याचें अक्षर चंद्रभागाच्या परिचयाचें असल्यामुळें तिनें तें मालतीला चांगल्या रीतीनें वाचून दाखविलें.

उमराती. ता.—

मित्रोत्तम दिनकरराव यांस,

सा. न. वि. वि. आपलें पत्र मिळालें. पाहून फार खेद झाला. तत्त्वज्ञानाच्या परिक्षेंत आपण पास झालां असतां, तर मला आणि आपल्या सर्व मित्र मंडळीस फार आनंद झाला असता. परंतु मानसिक प्रेमाचें खूळ आपल्या डोक्यांत शिरल्यामुळें सगळ्यांची निराशा झाली. तत्त्वज्ञानाची परीक्षा पास झाल्यानें आपणांस मोठ्या हुद्याची नौकरी मिळाली असती, असें कांहीं नाहीं; परंतु त्यामुळें

आपला सन्मान अधिक झाला असता. सिव्हिलसर्व्हिची परीक्षा पुष्कळ देतात, ब्यारिस्टरहि पुष्कळ होतात; पण आतां या दोहों- पैकीं एकादी परीक्षा देऊन मग स्वदेशीं यावें, अशी आह्मा सर्वांची इच्छा आहे. आतां पुन्हा आपण प्रेमविज्ञान शास्त्राचा सूक्ष्मा- सूक्ष्म विचार करण्याच्या भानगडींत पडूं नये अशी माझी व आपल्या सर्व आप्तस्वकीयांची आपणास विनंति आहे. त्या रामपुरांत आपल्या घरांत मद प्रकाश देणारी प्रेम जोत लुकलुक करीत आहे, हे आपण त्या विलास नगरींत विसरू नये. या खेड्यांतल्या गृहदेवतेच्या दिव्यांतलें तेल सपले नाहीं, तोंच आपलें येणें व्हावें, अशी सगळयांची इच्छा आहे. आपल्या मातोश्रीची प्रकृति बरी आहे. मी व आपली वैनी आणि मुलेंबाळें सुखरूप आहेंत. पत्रोत्तर लवकर पाठवावें ही विनंति.

आपला नम्र मित्र पांडुरंग

हें पत्र वाचून होतांच मालती ह्मणाली, "मी ह्मणत होतें, तेंच या पत्रांत लिहिलें आहे. या पत्राचे काय उत्तर येते तेंहि मला दाखवा हो!" असें ह्मणून मालती थोड्या वेळानें आपल्या घरीं गेली. हे पत्र पांडुरंगानें नीट लिहून पाठविलें त्यावेळीं दिनकरची स्त्री लक्ष्मी बरीच आजारी होती आणि ह्मणून दिनकरच्या लक्षांत न येईल, अशा रीतीनें ती गोष्ट त्यानें पत्रांत नमूद केली होती. मालतीला हा सगळा पत्रव्यवहार पाहण्याची किती उत्कंठा होती, हे निराळें सांगावयाला नको. तिची आणि चद्रभागा- ची चांगली ओळख झाल्यामुळें हीं सर्व पत्रे तिला पहावयाला मिळत होतीं. थोड्याच दिवसांनीं दिनकरकडून वरील पत्राचें उत्तर आलें आणि तें मालतीला पहावयालाहि मिळाले.

लंडन. ब्रन्सविकस्ट्रीट ता—

मित्रोत्तम पांडुरंगराव यांस,

कृ. सा न. वि. वि. आपलें कृपापत्र मिळालें. पत्रोत्तर पाठ- विण्यास पुष्कळ विलंब झाला, याबद्दल क्षमा असावी. आपलें उत्साहपूर्ण पत्र वाचून मला खरोखरच फार आनंद झाला. मित्रप्रे-

मासंबंधानें माझ्यासारखा भाग्यवान् कोणी नाहीं, ही गोष्ट आपल्या या पत्रानें माझ्या चांगली लक्षांत आली आणि त्यामुळें मला कल्पनातीत आनंद झाला. इग्लंडांतल्या युनव्हर्सिटींत आणि हिंदुस्थानांतल्या युनव्हर्सिटींत कांहीं कांहीं बाबतींत पुष्कळ फरक आहे. मी परीक्षेंत नापास झालों हें खरें; पण केंब्रिज युनिव्हर्सिटीनें माझे एकंदर निबंध पाहून मला पी. एच. डी. ची पदवी दिली. ब्यारिस्टर होण्याची मला प्रथमपासूनच इच्छा नाहीं. वकिलीचा धंदा प्रामाणिक पणाचा आहे, अशी साक्ष देण्यास वकिलाशिवाय दुसरा कोणीहि साक्षिदार मिळावयाचा नाहीं. तेव्हां असल्या धंद्यासंबधानें माझ्या मनांत जी तेढ आहे, त्याबद्दल मला आपण क्षमा करा. पी. एच. डी. झाल्यानें पोटाचा प्रश्न सुटावयाचा नाहीं, हें मला अगोदरच दिसत होतें आणि ह्मणून मी येथें आल्याबरोबर सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेस बसण्याचेंहि ठरविलें. माझ्या संबंधानें जे कांहीं दाखले पाहिजे होते, ते माझ्या जवळ नसल्यामुळें प्रथम हे दाखले हिंदुस्थानांतून आणवावे लागले आणि नंतर माझा अभ्यास सुरू झाला. ही गोष्ट मी तिकडे मुद्दामच कळविली नाहीं. आणखी सहा महिन्यानीं परीक्षा आहे. पास होईन असें वाटतें. घोड्यावर चांगलें बसतां येणें, हाहि या परीक्षेंतला विषय आहे. हल्लीं रोज संध्याकाळीं मी हा अभ्यास करीत असतों. लंडनसारख्या शहरांत ही बरीच खर्चाची बाब आहे; परतु एका धनिक हिंदुगृहस्थानें मला या बाबतींत चांगली मदत केली आहे. येथें मला माझ्यासारखे बाणेदार वृत्तीचे स्नेही मिळाले आहेत. आपल्या पद्धतिचें खाणें, मला येथें मिळतें. थोडे हात मात्र शिणवावे लागतात. येथें आल्यापासून चहाला मी शिवलों देखील नाहीं. मला या बद्दल सगळे हंसतात. एक दिवस तर मी धोतर नेसून आणि लालभडक दक्षिणी जोडा घालून लडनशहरांतल्या प्रसिद्ध हाइडपार्क मधून हिंडून आलों. लोकांना ती एक गम्मतच वाटली. एका श्रीमान गृहस्थानें घरांत बिछायतीवर घालण्यासाठीं ह्मणून असला लाल जोडा हिंदुस्थानां-

तून आणाविण्यास मला विनंति केली आहे. मातोश्रीची प्रकृती बरी आहे, हें वाचून फार आनंद झाला. माझा तो मिण मिण जळणारा क्षुद्र दीप मी येईपर्यंत विझणार नाहीं, अशी तुह्मी सगळेजण काळजी घ्या. मी तेथें आल्यावर तो क्षुद्र दीप लखलखीत झाल्यावांचून राहणार नाहीं. आपल्या मुलांना आशीर्वाद. वैनींना माझे साष्टांग नमस्कार कळवा. सोवळें नेसून आणि पाटावर बसून जेवण्याची माझी संवय अजून मोडली नाहीं, हें मी उमरावतीस आल्यावर कळेलच.

आपला, नम्र मित्र—दिनकर.

हा क्षुद्र दीप आपण रामपुरास आल्यावर लखलखीत प्रकाश देईल, अशी दिनकरनें आपल्या हृदयांत आशा बाळगली होती; आणि तों पर्यंत तो मिण मिण करणारा दिवा, मालवला जाऊं नये ह्मणून दिनकरनें आपल्या आप्तस्वकीयांना विनंतीहि केली होती; पण अभाग्या, तो पवित्र दीप केव्हांच मालवून ती ज्योत स्वर्गीं लखलख करीत होती. दिनकर, तू शुद्धीवर आलास खरा; पण फार उशीरां आलास. दिनकरचें हें पत्र येण्याच्या थोडेच दिवस अगोदर लक्ष्मीनें जगाचा अखेरचा निरोप घेतला होता. अजून पांडुरंगाला ही हकीकत कळली देखील नव्हती. दिनकर आतां चार सहा महिन्याच्या आंत विलायतेहून येणार या विचारानें तो आणि त्याची स्त्री या दोघांनाहि विलक्षण आनंद झाला होता; परतु इतक्यांत लक्ष्मीच्या स्वर्गवासाची बातमी जेव्हां त्यांना कळली, तेव्हां त्या दोघांच्या निराशेला सीमा उरली नाहीं. मंदमंद जळणारा तो दीप दिनकरच्या हृदय कपाटांतला अंधार पळवून तेथें स्थानापन्न झाला आहे, हें दिनकरच्या पत्रावरून मालतीला दिसून आल्यामुळें तिला देखील आनंद झाला होता आणि आज आपण एका पापांतून मुक्त झालों, असें तिला वाटत होतें; परंतु तिच्या कानावर जेव्हां ती अशुभ वार्ता गेली, तेव्हां मालतीचें मर्मस्थान शतधा विदीर्ण होऊन तिला कल्पनातीत दुःख झालें. कधींहि न पाहिलेल्या लक्ष्मीसाठीं रडून रडून तिनें आपले डोळे कोरडे ठणठणीत करून घेतले. या

सगळ्या अनर्थाच्या मुळाशीं आपण आहों, हें आतां मालतीच्या लक्षांत आल्यामुळें स्वतःचा धिःकार किती करावा हें तिचें तिलाच समजेनासें झालें.

## प्रकरण सोळावें.



नुकतीच संध्याकाळ झाली होती. पश्चिमाकाश तांबडे लाल झालें असून पूर्वेच्या बाजूला एकादी तारका लुकलुक करतांनाहि दिसत होती. अशा वेळी विमुकाकांच्या घरांतून पदराखालीं वारा लागू नये ह्मणून दिवा घेऊन उमा घराच्या बाहेर पडली आणि बागेतल्या विठ्ठल मंदिरांत जाऊन तिने देवाजवळचे दिवे लावले. सगळ्या दिव्यांना भरपूर तेल वगैरे घातल्यावर रोजच्याप्रमाणें देवाच्या पायां पडून तिने प्रार्थना केली आणि पुन्हां मंदिराचें दार लावून ती घरांत जाण्यासाठीं परतली. तितक्यांत बागेच्या फाटकांतून कोणी आंत येत आहे, असें पाहून तिनें ‘ कोण ? ’ ह्मणून प्रश्न केला.

या वेळीं बागेंत दिनकर प्रवेश करीत होता. विलायतेहून मुबईस उतरल्यावर दुसऱ्या दिवशीं त्याला लक्ष्मीसबंधानें सशयित अशी कांहीं गुणगुण समजली. तेव्हां बरोबर सामान वगैरे न घेतां तो तसाच सडा रामपुराला जाण्यास निघाला. उमरावतीच्या स्टेशनावर उतरल्यावर तो कोणाला न भेटतां पायीपायींच रामपुराला गेला. पांच कोस पायीं चालल्यामुळें त्याचे पाय धुळीने भरून नेसते धोतर व अगावरील कपडेहि धुळवटून गेले होते. चेहरा उद्विग्न, म्लान व खिन्न झाला होता आणि या वेळी अकस्मात् दिनकर येईल, अशी कल्पना नसल्यामुळें उमानें अर्थातच त्याला ओळखलें नाही. उमाच्या प्रश्नाला दिनकरनेंहि कांहीं उत्तर दिलें नाहीं. तो दहा पांच पावलें आणखी आंत आल्यावर उमा पुन्हां ह्मणाली, “ कोण ? ”

“ मी दिनकर. ” भरून आलेल्या कंठानें दिनकरनें एवढे शब्द

उच्चारतांच उमानें एकदम टाहो फोडला. " भावोजी, आपल्या गृहांतली गृहदेवता गेली. तुमची वाट पाहून पाहून बिचारीनें प्राण सोडला. "

उमाचा हा आर्तनाद ऐकून दिनकरहि मोठ्याने रडूं लागला. या रडण्यानें घरांत सगळ्यांच्या छातींत धस्स झालें आणि सगळ्याजणी बाहेर आल्या. भास्कर आणि दिवाकर हे दोघेहि बाहेर गांवींच होते. दिनकरला पाहतांच त्याच्या आईनें त्याला कडकडून मिठी मारली आणि ती मोठ्यानें रडूं लागली. " दिनकर, माझ्याजवळ ठेवायला दिलेली ठेव मी गमावली. मी आतां तुझी वस्तु तुला कोठून देऊं ? पहा ! हें घर पहा ! सगळ्या घराची शोभा गेली. देवाने आह्मांला खरी खरी लक्ष्मी दिली होती; पण आमच्या कर्मानें ती आमच्याजवळून नेली ! "

दिनकरची स्थिति या वेळीं कल्पनेच्या बाहेर करुणाजनक झाली होती. विसुकाकांच्या घरांत एकाएकीं रडारड सुरू झाल्याचें पाहून शेजारचे लोक साहजिक घाबरून धांवत आले; पण दिनकरला पाहतांच त्यांना या रडण्याचें कारण समजलें. विशेष परिचित अशा गृहस्थांनीं दिनकरला सहानुभूति दर्शवून हातीं धरलें आणि आंत ओसरीवर आणून बसाविलें. दिनकरनें पहिल्यानेच जो टाहो फोडला तेवढाच. मग त्याला रडूं येईनासें झालें आणि त्याच्या डोळ्यांतून अश्रूहि पडेनातसे झाले. हळू हळू घरांतला हा रडण्याचा ओघ बराच थांबला. आलेल्या गृहस्थांनीं दिनकरला व त्याच्या आईला चार सांतवनाच्या गोष्टी सांगून व थोडा वेळ दिनकर जवळ बसून ते निघून गेले. दिनकरच्या आईनें त्याला आंघोळ घालून मोकळा करून घेतले आणि दोन घास खाण्याविषयींहि त्याला आग्रह केला. आईच्या आग्रहास्तव दिनकरनें पानावर बसल्यासारखें केलें आणि पुन्हां तो ओसरीवर येऊन बसला. थोड्या वेळानें उमावैनीहि तेथें आली. उमावैनीला पाहतांच दिनकरचा कंठ भरून आला. तो ह्मणाला, " वैनी ? "

उमाचेंहि हृदय भडभडून आलें. ती ह्मणाली, "काय भावोजी?"

डोळ्यांतून अश्रूंच्या धारा वहात असतां दिनकर ह्मणाला, " तिनें कोणत्या जागेवर देहत्याग केला ? "

आंतून दिवा लावून आणून उमा ह्मणाली, " या, माझ्यामागें या. "

आहें, असें ती उमाजवळ ह्मणाली. आणि पांडुरंग, प्राणोत्क्रमणाच्या वेळीं ' त्यांना ह्मणावें मालतीबरोबर विवाह करून सुखी व्हा ' असें ती ह्मणाली. पांडुरंग, सांग, आतां मी तिच्यासाठीं कां रडूं नको ? "

दिनकरची ही शोकविव्हल स्थिति पाहून पांडुरंगाचें अंतःकरण कळवळून आलें. दिनकरला आपल्या हृदयाशीं धरून तोहि रडूं लागला. खोलीच्या बाहेर चंद्रभागा उभी होती, तिचेहि डोळे भरून आले. थोडा वेळ स्तब्ध राहून दिनकर ह्मणाला, " पांडुरंग, माझ्या काल्पनिक सुखासाठीं जिनें आनंदानें देह विसर्जन केला, शेवटच्या उछ्वासापर्यंत जिनें माझें कल्याण चिंतिलें आणि अशा रीतीनें जिनें आपलें निस्सीम प्रेम प्रगट केलें, तिच्यावर मनुष्यत्वाचा केवळ आरोप आला होता. ती खरोखर देवता होती. पांडुरंग, तिचें जें माझ्यावर प्रेम होतें, तें खरें प्रेम. आध्यात्मिक प्रेम तें तेंच. तुला नाहीं तसें वाटत ? पांडुरंग, इतके दिवस झालें तें झालें. आतां मीहि याच प्रेमाची कास धरली आहे. मी आतां सगळ्या विश्वावर प्रेम करणार आहें आणि अशा रीतीनें त्या हृदयदेवतेची गांठ घेण्याचा मीं निश्चय केला आहे. "

या नंतर दोघेहि थोडा वेळ स्तब्ध बसले होते. चंद्रभागा तितक्यांत पुढें होऊन ह्मणाली, " भावोजी, आंघोळीला पाणी दिलें आहे. आतां चार आठ दिवस कांहीं मी येथून जाऊं देणार नाहीं. "

चंद्रभागाला पाहतांच दिनकरचें हृदय पुन्हां भडभडून आलें. डोळे पुशीत पुशीत तो ह्मणाला, " वैनी, तुमच्या बहिणीला मी गमाविलें म्हणून माझ्यावर रागावलां नाहींना ? "—

चंद्रभागा सद्गदित होऊन ह्मणाली, " भावोजी, आतां पुन्हां असें डोळ्यांना पाणी आणूं नका. तुम्ही आतां लहान कां आहां ? "

आंघोळ करून दिनकरनें पांडुरंगाबरोबर जेवण उरकून घेतलें आणि पांडुरंग कोर्टांत गेल्यावर तो त्याच खोलींत कांहीं आध्यात्म विषयांचीं पुस्तकें वाचीत पडला. दुपारीं तीन चार वाजण्याच्या सुमारास चंद्रभागा पुन्हां खोलींत आली आणि ह्मणाली, " भावोजी, येथल्या मुलींच्या शाळेची मास्तरीण तुह्मांला भेटावयाला आली आहे. " चंद्रभागाच्या या

शब्दांचा दिनकरवर परिणाम होण्यापूर्वींच तेथें मालती येऊन उभी राहिली दिनकर वाचनांत तल्लीन असल्यामुळें आणि मालतीच्या पहिल्या स्थितींत पुष्कळ फरक पडल्यामुळें त्यानें तिला चटकन् ओळखलें नाहीं. तिच्याकडे पाहून तो ह्मणाला, " कोण आपण ? "

मालतीचे डोळे अश्रूंनीं भरून आले. ती ह्मणाली, " मी मालती."

जणूं विजेचा धक्का बसावा त्या प्रमाणें मालती हें नांव ऐकून दिनकरची स्थिति झाली. आरामखुर्चीवरून उठून बसून तो ह्मणाला, " तुह्मांला मी ओळखलेंच नाहीं. तुमच्या कपाळीं कुंकू कां नाहीं ? "

अतिरिक्त मद्यपानामुळें ब्यारिस्टर मुकुंद यांचा थोड्या दिवसांपूर्वीं अंत झाला. त्यांच्या बरोबर विवाह झाला नसता; पण कमळाबाईनीं मला एका वस्त्रानिशीं घराच्या बाहेर पडण्यास सांगितल्यामुळें अनन्योपाय होऊन मला त्या विवाहास संमति दर्शवावी लागली.

" आतां माझी भेट घेण्याचा तुमचा उद्देश काय ? "

" आपल्या सर्व सुखावर मी पाणी ओतलें. मी आपली अनत अपराधिनी आहें. आपली क्षमा मागावी म्हणून मी आल्यें आहे. "

" मालतीबाई, असें कांहीं आपण मनांत देखील आणूं नका. व्यर्थ संशयामुळें कल्पनाविवश होऊन मींच उलट तुमचे अपराध केले आहेत मलाच आपण क्षमा करा, आणि माझ्यावर एवढी दया करा कीं, यासंबंधानें आतां एक अक्षरहि बोलूं नका. "

" पण माझे अपराध पदरांत घेतल्यावांचून मी येथून जाणार नाहीं. "

" मालतीबाई, तुमचा कांहीं अपराधच नाहीं, आणि तुमची जर तशी समजूत असेल, तर मी तुम्हांला तुमच्या अपराधांची क्षमा करतो. "

मालती यावर कांहीं बोलली नाहीं. कांहींशी संतोष पावूनच ती परत गेली. दिनकर चार पांच दिवस पांडुरंगाकडे राहिला होता. नंतर गांवीं जाऊन तेथें त्यानें प्रवासाची सर्व तयारी केल्यावर सगळयांचे निरोप घेतले आणि तो हिमालयांत आध्यात्म विद्येच्या अभ्यासासाठीं निघून गेला हिमालयांत जाऊन त्यानें काय साध्य केलें आणि तेथें तरी त्याला सुखाचा शोध लागला कीं नाहीं, तें परमेश्वराला माहीत !